# SECOND BOOK OF SANSKRIT

BY

SIR RAMKRISHNA GOPAL BHANDARKAR,

M. A., LL. D., Ph. D., K. C. I. E., &c., &c.

TRANSLATED INTO MARATHI

BY

PRABHAKAR RAMCHANDRA PANDIT

AND REVISED BY

NARAYAN PANDURANG SHASTRI SATHE,

LATE SANSKRIT TUTOR, POONA TRAINING COLLEGE.

---

**ELEVENTH EDITION**—3,000 Copies.

Carried through the press by P. B. Gothoskar, B. A.,
Late Librarian, B. B. R. A. Society.

---



BOMBAY.

MRS. RADHABAI ATMARAM SAGOON.

---

**1931.**



---

Price One Rupee Twelve Annas.

# संस्कृतमन्दिरान्तःप्रवेशिका

नामक

## सर रामकृष्ण गोपाळ भाण्डारकर

ह्यांनीं केलेल्या, संस्कृत दुसऱ्या पुस्तकाचें हें मराठी भाषांतर

**प्रभाकर रामचंद्र पण्डित**

ह्यांनीं केलें होतें, तें

**नारायण पांडुरंग शास्त्री साठे,**

पूना ट्रेनिंग कॉलेज येथील माजी संस्कृताध्यापक,

ह्यांनीं सुधारून तयार केलें.

---

आंवृत्ति अकरावी.—प्रती ३,०००.

---

एशिआटिक सोसायटीच्या मुंबईशाखेचे माजी लायब्रेरीअन पां. भा. गोठोस्कर, बी. ए., यांनीं ही आवृत्ति तपासून तयार केली.

---



---

मुंबई.

मिसेस राधाबाई आत्माराम सगुण.

१९३१.

---

किंमत एक रुपया बारा आणे.

# प्रस्तावना



सुमारें पंधरा वर्षांपूर्वी हिंदुस्थानच्या ह्या भागांत इंग्रजी भाषा जाणणाऱ्या लोकांत संस्कृत विद्येचें ज्ञान कांहीं नव्हतें असें म्हटलें तरी चालेल; परंतु रावबहादूर रामकृष्ण गोपाळ भांडारकर, एम. ए., संस्कृत भाषेचे प्रोफेसर, एल्फिन्स्टन कॉलेज, यांहीं संस्कृत शिकण्याची ही सुलभ रीति शोधून काढिल्या दिवसापासून सर्व जनांस ही उत्तम भाषा शिकण्याची अभिरुचि उत्पन्न होऊन तिचा हल्लीं किती प्रसार झाला आहे हें सांगणेंच नको. जितके म्हणून इंग्रजी शिकणारे आहेत, त्यांचा थोडा बहुत निवेश संस्कृतांत झाला आहेच. ह्याचें कारण पाहूं गेलें असतां त्या सद्गृहस्थांनीं प्रसिद्ध केलेलीं संस्कृत दोन पुस्तकें. हीं पुस्तकें इंग्रजींत लिहिलेलीं असल्यानें त्यांचा उपयोग केवळ ती भाषा जाणणारे करीत असत. परंतु अलीकडे प्रथम पुस्तकाचे महाराष्ट्र व गुजराथी तरजुमे झाल्यानें मराठी व गुजराथी भाषा जाणणारेही त्या भाषांतरांपासून आपलें बहुत हित करून घेत आहेत. द्वितीय पुस्तकाचें गुजराथी भाषांतर झालें असून महाराष्ट्र भाषांतर झालें नाहीं म्हणून मीं विज्ञापना केल्यावरून मूळ पुस्तककर्त्यांनीं मेहेरबानीनें मला हें भाषांतर करण्याची अनुज्ञा दिल्या अन्वयें हें भाषांतर करून विद्वज्जनांस विनयपूर्वक अर्पण केलें आहे. ह्या भाषांतरांत प्रमाद राहून गेले असतील त्यांविषयीं सुजनांनीं क्षमा करावी.

तारीख १ फेब्रुवारी सन १८७७,
मुक्काम बडोदें.

भाषांतरकर्ता.

---

# प्रस्तावना

## दुसऱ्या आवृत्तीची



हें मराठी भाषांतर कैलासवासी वे० शा० सं० रा० रा० प्रभाकर रामचंद्र पंडित ह्यांनीं मूळ पुस्तकाच्या तिसऱ्या आवृत्तीवरून तयार केलें होतें व तें सन १८७७ सालीं सरकारांनीं छापिलें होतें. त्यावर मूळ पुस्तकाच्या दोन आवृत्ति होऊन सहावी आवृत्ति काढण्याचे वेळीं तींत फेरफार करण्याचें काम डाक्तर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचे आज्ञेवरून त्यांचे चिरंजीव रा० रा० श्रीधर रामकृष्ण भांडारकर, एम. ए., यांनीं सुरू केलें. इतक्यांत मराठी भाषांतराच्या प्रती संपल्या. तेव्हां मराठी भाषांतर नव्या आवृत्तीवरून सुधारावें व त्यांत इतर कांहीं दोष असल्यास तेही काढून टाकावे, असा निश्चय मेहेरबान डायरेक्टर साहेब यांनीं करून तें काम मज-वर सोंपविलें. त्याप्रमाणें हें भाषान्तर मूळ पुस्तकाच्या सहाव्या आवृत्तीवरून डाक्तर रा० गो० भांडारकर यांचे नजरेखालीं शोधून सुधारून तयार केलें आहे.

ह्या आवृत्तींत विशेष फेरफार मूळ पुस्तकावरून केले आहेत, ते खालीं लिहिल्याप्रमाणें:—

१ पूर्वीच्या आवृत्तींत पहिला पाठ, विध्यर्थी क्रियापदें व चौथा, सहावा आणि दहावा ह्या गणांतील धातूंचीं विशेष रूपें ह्याविषयीं होता, त्यांपैकीं विध्यर्थी क्रिया-पदांचा एक पाठ करून तो प्रथम पुस्तकाचे शेवटीं घातला; व विशेष रूपांविषयींचे नियम, त्यांच्या स्पष्टीकरणाकरितां संस्कृत व मराठी वाक्यें आणि त्यांपुढें इतर पाठांप्रमाणें कोश ह्यांचा नवा एक पाठ तयार करून तो ह्या पुस्तकाचे आरंभीं घातला आहे.

२ भविष्यकालबोधक, संकेतार्थक व कर्मणि क्रियापदांचा पाठ तृतीय भूतापुढें होता, तो तेथून काढून द्वितीय भूतापुढें घातला आहे. कारण हायस्कूलांत ह्या क्रमानें शिकविण्याची पद्धति पडली आहे.

३ संस्कृत वाक्यें ठिकठिकाणीं अधिक घातलीं आहेत. तीं बहुधा कीर्ति-कौमुदी, भट्टिकाव्य व कविरहस्य ह्या ग्रंथांतील आहेत. ह्यांपैकीं शेवटच्या दोन कवींनीं क्रियापदादिकांचीं जीं विशेष रूपें योजिलीं आहेत, तीं अलीकडच्या

संस्कृतांत फारशीं येत नाहींत असें असतां ह्या पुस्तकांत तद्घटित पद्यें कां घातलीं, असें वाचकांच्या मनांत येईल; परंतु त्याचें समाधान असें आहे कीं, वरील शेवटच्या दोन कवींपैकीं पहिला कवि बाणभट्ट व भवभूति, ह्या सर्वमान्य कवींच्या वेळचाच असावा; आणि दुसरा ह्या कवींच्या मागून दोनशें वर्षांनीं झाला असावा, असें दिसतें. हल्लीं जितके संस्कृत ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांपेक्षां ह्या कवींच्या वेळीं जास्त उपलब्ध असले पाहिजेत; आणि पूर्वोक्त दोन काव्यें करण्यांत कवींचा उद्देश जनांस संस्कृत भाषेचें यथार्थ ज्ञान करून द्यावें हाच असला पाहिजे. म्हणून त्या कवींनीं योजिलेलीं क्रियापदादिकांचीं विशेष रूपें त्यांच्या वेळीं उपलब्ध असलेल्या ग्रंथांतलीं असलीं पाहिजेत. आतां तीं दोन काव्यें करण्यांत कवींचा जो उद्देश, तोच संस्कृतमन्दिरांतःप्रवेशिकाकारांचाही आहे, तेव्हां त्यांनीं आपल्या ग्रंथांत त्या काव्यांतील पद्यें घेतलीं हें योग्यच केलें.

सर्व पाठांतील संस्कृत मराठी कोश एकत्र करून त्यांचा एक कोश बनविला आहे; तसाच मराठी संस्कृत कोश एकत्र करून त्यांचा एक कोश बनविला आहे; आणि हे दोन्ही कोश ग्रंथाच्या शेवटीं दिले आहेत. ही आवृत्ति छापण्यांत नजरचुकीनें कांहीं दोष राहिले असतीलच; ते मला कळविले असतां उपकार होईल. पुढील आवृत्तींत ते दुरुस्त करण्यांत येतील.

पूना ट्रेनिंग कॉलेज,<br>ता. २७ जुलई १८८६ इ०. } नारायण पांडुरंगशास्त्री साठे.

# अनुक्रमणिका.



# संस्कृतद्वितीयपुस्तकम्.

## प्रथमः पाठः ।

### धातुरूपसंबंधी विशेष.

#### प्रथम, चतुर्थ, षष्ठ व दशम ह्या गणांतील.

१ **गुप्** प० प० 'रक्षण करणें,' **धूप्** प० प० 'तापविणें,' **पण्** प० प० 'स्तुति करणें' ह्या अर्थी असल्यास, **पन्** प० प० 'स्तुति करणें,' ह्या सर्व प्रथम गणांतील धातूंस व सहाव्या गणांतील **विच्छ्** ( जाणें ) ह्या धातूस गण विकरण लागण्यापूर्वी **आय्** हा प्रत्यय लागतो. जसें **पणायति, धूपायति,** इत्यादि. हा **आय्** पुढें असतां **गुप्**संबंधी **उकारास** गुण होतो. जसें—**गोपायति.** हा **आय्** *आर्धधातुकप्रकारांत विकल्पानें लागतो. जेव्हां **पण्** व **पन्** ह्या धातूंस **आय्** जोडीत नाहींत, तेव्हां त्यांस आत्मनेपदी प्रत्यय लागतात. जसें—**पणते.**

२ **भ्राश्** आ० प०, **म्लाश्** आ० प० आणि **भ्रम, क्रम्, क्लम्, त्रस्, लष्, ष्ठिव्** व **सम्+यस्,** अथवा उपसर्गरहित **यस्,** हे सर्व प० प० प्रथम आणि चतुर्थ ह्या दोन गणांतील आहेत; व **त्रुट्** प० प० चतुर्थ व षष्ठ गणांतील आहे. जसें—**भ्राशते** अ० **भ्राश्यते** इ०.

३ परस्मैपदी प्रत्यय जोडावयाचे असतां †सार्वधातुक प्रकारांत **क्रम्** धातूचा उपांत्य **अकार** दीर्घ होतो. जसें—**क्रामति** अ० **क्राम्यति**; आत्मनेपदी प्रत्यय जोडल्यास **आक्रमते. ष्ठिव्, क्लम्,** व **आ+चम्** १ ग० ह्यांचा उपांत्य अकार वर सांगितल्याप्रमाणें दीर्घ होतो.

४ **शम्, तम्, दम्, श्रम्,** व **मद्** ह्या चतुर्थ गणांतील धातूंचा स्वर सार्वधातुकप्रकारांत दीर्घ होतो. त्याप्रमाणें चतुर्थ गणांतील **भ्रम्** आणि **क्षम्** ह्या धातूंचाही स्वर सार्वधातुकप्रकारांत दीर्घ होतो. जसें—**शाम्यति, भ्राम्यति** अ० **भ्रमति** इ०. **भ्रम्** ह्याचें **भ्रम्यति** असेंही रूप होतें.

५ **अक्ष्,** आणि तासून बारीक करणें ह्या अर्थी **तक्ष्,** हे धातु प्रथम व पंचम गणांतील आहेत. जेव्हां **तक्ष्** धातूचा अलंकारिक अर्थ निर्भर्त्सना करणें इ० असतो, तेव्हां तो पहिल्याच गणांतील समजावा. जसें—**अक्षति** अ० **अक्ष्णोति.**

६ **ध्मा** 'फुंकणें,' **घ्रा,** 'वास घेणें,' **म्ना** 'विचार करणें,' **ऋ** 'जाणें,'

---

* गणविकरण न होणाऱ्या प्रकारांत.

† गणविकरण होणाऱ्या प्रकारांत.

**सृ** 'धावणें' ह्या अर्थी असल्यास, **यम्** 'दाबणें,' 'नियमन करणें,' आणि **शद्** 'नाश पावणें,' ह्या सर्व प्रथम गणांतील धातूंस सार्वधातुकप्रकारांत **धम्, जिघ्र्, मन्, ऋच्छ्, धौ, यच्छ्** आणि **शीय्**, हे आदेश यथाक्रम होतात. जसें—**धमति, जिघ्रति** इ०. शेवटचा धातु सार्वधातुकप्रकारांत आत्मनेपदी असतो.

७ **गुह्** धातूंतील उपांत्य स्वर उ हा गणविकरण पुढें असतां व स्वरादि पित् प्रत्यय, अ० ज्याच्या योगानें गुण होतो असा स्वरादि प्रत्यय, पुढें असतां दीर्घ होतो. जसें—**गूहति**.

८ **दंश्** प० प०, **सञ्ज्** प० प०, **स्वञ्ज्** आ० प० आणि **रञ्ज्** उ० प० ह्या प्रथम गणांतील सर्व धातूंच्या अनुनासिकाचा लोप विकरण पुढें असतां होतो. जसें—**दशति, स्वजते** इ०.

९ धातूसंबंधी **ॠ** ह्या दीर्घ स्वरास गुण किंवा वृद्धि होत नसल्यास **इर्** असा आदेश होतो; आणि त्यामागें ओष्ठ्य अ० **प्** हा वर्ण असल्यास **उर्** असा आदेश होतो. हा आदेशासंबंधी, आणि वकारांत धातूंतील, **इकार** अ० **उकार** व्यंजन पुढें असतां दीर्घ होतो. जसें—**जॄ** च० ग० **जीर्यति, कॄ** ष० ग० **किरति**, आणि **कॄत्** द० ग० **कीर्तयति** इ०; **दिव्** व **सिव्** च०ग० **दीव्यति** व **सीव्यति** इ०.

१० चतुर्थ गणांतील ओकारांत धातुसंबंधी **ओ** हा स्वर विकरण पुढें असतां लुप्त होतो. जसें—**सो—स्यति, दो—द्यति, शो—श्यति** आणि **छो—छ्यति**.

११ ( धातूंच्या ) शेवटीं ऱ्हस्व अथवा दीर्घ **इ** अथवा **उ** असून सहाव्या गणांतील विकरण **अ** पुढें असतां त्यांस **इय्** व **उव्** हे आदेश यथाक्रम होतात. जसें—**रि—रियति, नु—नुवति, धू—धुवति**. ( पाठ ७ नि० ( २ ) पहा.)

१२ **व्यध्** च० ग० ह्याचें रूप **य** हें विकरण पुढें असतां **विध्** असें होतें. जसें—**विध्यति**.

१३ षष्ठ गणांतील **भ्रस्ज्** व **व्रश्च्** या धातूंचीं रूपें सार्वधातुकप्रकारांत **भृज्ज्** व **वृश्च्** अशीं होतात. जसें—**भृज्जति, वृश्चति**.

१४ जेव्हां **मस्ज्** आणि **सस्ज्** एतत्संबंधी **स्** लुप्त होत नाहीं, तेव्हां त्यास **ज्** असा आदेश होतो. ( पाठ ९ नि० ( १० ) पहा ). जसें—**मज्जति** इ०.

१५ षष्ठ गणांतील **लुप्, लिप्, खिद्, कृत्** व **पिश्**, ह्या धातूंच्या अंत्य वर्णापूर्वी सार्वधातुकप्रकारांत अनुनासिक योजावा. जसें—**लिम्पति**.

१६ दशम गणांतील कांहीं धातु आत्मनेपदीच आहेत. जसें—**तन्त्र्, चित्, भर्त्स्, मन्त्र्, तर्ज्, विद्, दंश्**, इ०; जसें—**तन्त्रयते, चेतयते** इ०.

१७ प्रथम व दशम गणांत असणारे धातु बहुत आहेत. जसें **युज्, पृच्, सह्, वृज्, वृ, जॄ, रिच्, तृप्, दृप्, अर्ह्**, इ० यांचीं रूपें **योजति, योजयति** इ०.

वैषम्यमपि प्राप्ता धैर्यधनाः साधव आत्मनः सच्चरणव्रतं गोपायन्ति ।

स्वजनवियोगेन व्यथितं मे मनो निष्ठाशून्यं भ्रमतीव ।

मार्गे वन्यानां कुसुमानामामोदमुपजिघ्रन्तौ तौ दम्पती ऋषेराश्रममगच्छताम् ।

अयं शीत आकाशवायुस्तव मुखे घर्मजान्स्वेदलवानाचामति ।

नदतः सिंहस्य स्वनं श्रुत्वा यथा सर्वे मृगास्त्रसन्ति तथैव भीमस्य शब्दं श्रुत्वा सर्वे योधा अत्रस्यन् ।

गगनमध्यमारूढस्य सवितुः प्रचण्डेन तापेन क्लान्तोऽयं शिखी तरोरालवाले स्थितं शीतमुदकं पर्याप्तमाचामति ।

निदाघेऽल्पैरपि तोयैर्मालाकारेण या तरोः पुष्टिर्विरच्यते सा किमनल्पान्यपि तोयानि विश्वतो विकिरता वारिदेन जनयितुं शक्या ।

श्रोत्रियायाभ्यागताय वत्सतरीं महोक्षं महाजं वा निर्वपन्ति गृहमेधिनः । तं हि धर्मं धर्मसूत्रकाराः समामनन्ति ।

प्रत्युत्पन्नमतिः प्राप्तां क्रियां कर्तुं व्यवस्यति ।
एतान्यनीकानि महानुभावं गूहन्ति मेघा इव रश्मिवन्तम् ।
यावत् प्रतापनिधिराक्रमते*न भानु-
रह्नाय तावदरुणेन तमो निरस्तम् ।
व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतु-
र्न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ।
लिम्पतीव तमोऽङ्गानि वर्षतीवाञ्जनं नभः ।
असत्पुरुषसेवेव दृष्टिर्निष्फलतां गता ॥
त्वं तेनाभिहितः पथ्यं † किं कोपं न नियच्छसि ॥

---

*आ+क्रम् या धातूची सूर्यादि ताऱ्यांचें उदय पावणें अशा अर्थी योजना करतात तेव्हां हा आत्मनेपदी असतो.

†दुह्-याच्-पच्-दण्ड्-रुधि-प्रच्छि-चि-ब्रू-शास्-जि-मथ्-मुषां । कर्मयुक् स्यादकथितं तथास्यान्नी-हृ-कृष्-वहाम् ॥

वर सांगितलेल्या व त्या अर्थाच्या इतर धातूंस दोन कर्में असतात, असा सामान्य नियम आहे. एकास गौण कर्म व दुसऱ्यास मुख्य कर्म म्हणतात. दुह् पासून मुष् पर्यंत जे धातु व त्या अर्थी जे दुसरे धातु त्यांची योजना कर्मणि झाली

* तद्विद्विषां जरति चेतसि भोगतृष्णा
तेषां वपूंषि विपिनेषु च जारयन्ति ।
सहते शस्त्रसंपातं सहति श्रममाहवे ।
उत्साहयति तच्चित्तमपि जेतुं शचीपतिम् ॥
पूजामर्हति सर्वेषामृषीणामाश्रमेऽप्यसौ ।
अर्हयत्यर्घ्यसत्कारं मधुपर्कं च पावनम् ॥
न क्षाम्यति क्षितीशानामपराधलवानपि ।
अपराधसहस्राणि क्षमते यो द्विजन्मनाम् ॥
नाहिर्दशयते कंचित्तद्देशे गरुडाज्ञया ।
यदि प्रमादाद्दशति तस्मिन्न क्रमते † विषम् ॥
न तर्जति रुषा कंचिन्नीचमप्युपकारिणम् ।
परं तर्जयते दुष्टान् समन्तात्संगतान्मिथः ॥
कोटिभिः पणते नित्यं राष्ट्रे तस्य वणिग्जनः ।
यक्षाश्चापि पणायन्ति तद्विभूतिं गृहे गृहे ‡ ॥
सर्वोऽभिलषति श्रीमानिन्द्रियार्थोपसेवनम् ।
अभिलष्यत्यसौ योगी तेभ्य एव निवर्तनम् ॥
लुम्पाति प्रतिपक्षाणां स लक्ष्मीं बाणवृष्टिभिः ।

---

असतां गौण कर्म प्रथमांत व मुख्य कर्म द्वितीयांत योजितात; आणि **नी, हृ, कृष्** आणि **वह्** ह्यांची व ह्या अर्थी जे इतर धातु त्यांची योजना कर्मणि झाली असतां मुख्य कर्म प्रथमांत व गौण कर्म द्वितीयांत योजितात. जसें–**बलिं याचते वसुधां** ( कर्तरि ); बलीपाशीं पृथ्वी मागतो. **बलिर्याच्यते वसुधां** (कर्मणि), **शतं जयति देवदत्तं** ( कर्तरि ); देवदत्ताचीं शंभर नाणीं जिंकतो; **शतं जीयते देवदत्तः** ( कर्मणि ); **ग्राममजां नयति** ( कर्तरि ); **ग्राममजा नीयते** ( कर्मणि ).

ह्या वाक्यांत बोलणें, सांगणें ह्या अर्थाच्या ( म्ह० ब्रू धातूच्या अर्थाच्या ) **अभि+धा** ह्या धातूचें भू० का० बो० कर्मणि विशेषण **अभिहित** हें योजिलें आहे.

* हा अर्धा श्लोक व ह्या पुढील नऊ श्लोक कृष्ण या नांवाच्या एका प्राचीन राजाच्या गुणवर्णनाचे आहेत. पुढील कित्येक पाठांत ह्याच राजाच्या गुणवर्णनाचे अनेक श्लोक आहेत.

† **क्रम्** हा धातु 'लागू होणें,' ह्या अर्थी योजिला असतां आत्मनेपदी असतो.

‡ विभक्त्यंत नामाची द्विरुक्ति असतां त्याचा अर्थ 'प्रत्येक' असा असतो. जसें **गृहेगृहे** 'प्रत्येक घरांत,' **दिनेदिने** ' प्रति दिवशीं. '

न लुप्यति मतिस्तस्य सकलेऽप्यर्थसंशये ॥
अर्जते धर्ममेवैकमर्थं धर्मार्थमर्जति ।
अर्जयत्यूर्जिताँल्लोकान् स धर्मेणैव शाश्वतान् ॥
सर्वस्य जायते मानः स्वहिताच्च प्रमाद्यति ।
वृद्धौ भजति चापथ्यं नरो येन विनश्यति ॥
भजन्ति विपदस्तूर्णमतिक्रामन्ति संपदः ।
तान्मदान्नावतिष्ठन्ते* ये मते न्यायवादिनाम् ॥
प्राज्ञास्तेजस्विनः सम्यक्पश्यन्ति च वदन्ति च ।
तेऽवज्ञाता महाराज क्राम्यन्ति विरमन्ति † च ॥
जीर्यन्ति जीर्यतः केशा दन्ता जीर्यन्ति जीर्यतः ।
जीवनाशा धनाशा च जीर्यतोऽपि न जीर्यति ॥
अहो खलभुजङ्गस्य विचित्रोऽयं वधक्रमः ।
अन्यस्य दशति श्रोत्रमन्यः प्राणैर्वियुज्यते ॥
विधौ विध्यति सक्रोधे वर्म धर्मः शरीरिणाम् ।
स एव केवलं तस्मादस्माकं जायतां गतिः ॥
विहितस्याननुष्ठानान्निन्दितस्य च सेवनात् ।
अनिग्रहाच्चेन्द्रियाणां नरः पतनमृच्छति ॥

---

१ ईश्वराच्या शक्तीनें हें संसारचक्र फिरतें ( भ्रम् ).

२ त्याच्या कृतघ्नतेमुळें रागावलेला विष्णुदत्त कठोर शब्दांनीं त्याची खरड काढिता झाला ( सम्+तक्ष् ).

३ त्या समाजांत अनेक राजांचे हार ते लगबगीनें उठत असतां एकमेकांच्या खेटाखेटीनें तुटले ( त्रुट् ).

४ क्षमा न करणारा साप आपल्याला पाय लावणाऱ्या मनुष्यास रक्ताच्या इच्छेनें डसतो काय ( दंश् ) ?

५ राम इक्ष्वाकुकुलाचा उपाध्याय ( जो ) वसिष्ठ ( त्यास ) प्रथम नमस्कार करिता झाला व नंतर आपल्या भावास आलिंगिता झाला ( स्वञ्ज् ).

---

* **स्था** ह्या धातूमागें **सम्, अव, प्र,** अ० **वि** हे उपसर्ग असतां तो आत्मनेपदी असतो.

† **रम्** ह्या धातूमागें **वि, आ, परि,** अ० **उप** ह्यांपैकीं उपसर्ग असतां हा परस्मैपदी असतो.

६ इन्द्रजित मारला गेला असतां त्याच्या अकालिक मरणानें झालेला शोक रावणास विस्तवाप्रमाणें भाजिता झाला ( **भ्रस्ज्** ).

७ ज्याच्या योगानें मी वांचतों तें घेऊन जाणारा तूं माझे प्राण घेण्यास प्रयत्न करतोस ( **यस्** ).

८ दिव्याच्या ज्वालेनें भुलविलेला पतंग अकस्मात् तीवर पडला आणि मेला * ( **ऋ** धातु व **मृत्यु** शब्द द्वितीयांत ).

९ हत्तीस परतविण्यास इच्छिणारा अज ( राजा ) त्यास बाणानें टोंचिता झाला ( **व्यध्** ).

१० राम राक्षसांशीं लढत असतां आपल्या शत्रूंपैकीं शेंकडों शत्रूंस आपल्या तीक्ष्ण शस्त्रांनीं तोडिता झाला ( **व्रश्च्** ).

११ रामाचा आत्मा सीतेच्या वियोगानें उत्पन्न झालेल्या शोकांत बुडाला होता ( **मस्ज्** ).

१२ जेव्हां धृतराष्ट्रपुत्रांनीं कृष्णाची बहीण पांचाली हिच्या खेरीज धर्म-राजाचें † सर्व जिंकलें तेव्हां ते त्यास म्हणाले कीं, तुझी बायको पांचाली पणाला लाव ( **पण्** ).

१३ त्या पक्ष्यानें हरण केलेलें रत्न पुनः मिळविण्याकरितां मी मोठा यत्न करिता झालों ( **प्र+यस्** ).

१४ जो मोठ्याशीं वैर ‡ करितो, तो लवकरच नाश पावतो ( **शद्** ).

१५ देवा, मजकडून प्रतिक्षणीं हजारों अपराध केले जातात त्यांची क्षमा कर ( **क्षम्** ).

१६ काय हो ह्या कुमारीचा विलक्षण प्रभाव कीं, जे पदार्थ सचेतन आहेत ( **चित्** ) तेच हिची सेवा करितात असें नाहीं, तर अचेतनही करितात.

१७ जवळच्या नदीच्या तुषारांनीं ओला झालेला हा वारा बागेंतील अतिमुक्त नांवाच्या वेलीला हालवितो ( **धू** ).

१८ जेव्हां अजानें शंख फुंकला ( **ध्मा** ) तेव्हां त्याचे पळालेले शिपाई परत आले आणि शत्रूंचीं सैन्यें झोंपीं गेलेलीं पाहते झाले.

---

* प्रथम भूतकाळांतील आगम **आ** याच्याशीं धातूच्या आरंभींचा स्वर **ऋ** जोडिला असतां दोहोंच्याबद्दल **आर्** होतो. ( प्रथम पुस्तक पान ५७ यांतील नियम पहा. )

† पृ० ३ टीप † पहा.

‡ येथें **वैराय्** हा आत्मनेपदी धातु योजावा. हा **वैर** न० 'विरोध' ह्या-पासून साधलेला नामधातु आहे. ह्याचीं रूपें प्रथम गणांतील आ० प० धातूप्रमाणें होतात. जसें—व० का० तृ० पु० ए० व० **वैरायते**.

# शब्दकोश १.

## धातु.

**अर्ज्** प्र० ग० प० प० आणि द० ग० मिळविणें.

**अर्ह्** प्र० ग० प० प० व द० ग० योग्य असणें.

**ऋज्** प्र० ग० आ० प० मिळविणें.

**कृत्** ष० ग० प० प० कापणें, तोडणें.

**कॄ** ष० ग० प० प० पसरणें; **वि+कॄ** विखरणें, पसरणें.

**कॄत्** द० ग० प्रसिद्ध करणें, स्तुति करणें, गौरव करणें.

**क्रम्** प० प० चालणें; पाऊल टाकणें; आ० प० लागू होणें; **आ+क्रम्** जवळ जाणें, पादाक्रांत करणें, वर जाणें; **अति+क्रम्** पलीकडे जाणें, दूर जाणें.

**क्लम्** प० प० थकणें, खिन्न होणें.

**क्षम्** च० ग० प० प० क्षमा करणें.

**गुह्** प्र० ग० उ० प० गुप्त ठेवणें.

**घ्रा** प्र० ग० प० प० वास घेणें; **उप+घ्रा** वास घेणें.

**चम्** प्र० ग० प० प० पिणें, चाटणें; **आ+चम्** आचमन करणें.

**चित्** द० ग० आ० प० जीव असणें, सचेतन असणें.

**जनय** ( **जन्** धातूचा प्रयोजक धातु ) उत्पन्न करणें; **जनयितुम्** अ० उत्पन्न करण्यास.

**जॄ** प्र० ग० व च० ग० प० प० आणि द० ग० वृद्ध होणें, झिजणें, जीर्ण होणें.

**तक्ष्** प्र० ग० प० प० तासणें; **सम्+तक्ष्** कापून तुकडे करणें, जखमी करणें, निर्भर्त्सना करणें.

**तर्ज्** प्र० ग० प० प० आणि द० ग० आ० प० धाक दाखविणें, निर्भर्त्सना करणें.

**त्रस्** प० प० भयानें कांपणें, भिणें.

**त्रुट्** प० प० तुटणें, कट्कन् मोडणें.

**दंश्** प्र० ग० प० प० आणि द० ग० आ० प० डसणें, नांगी मारणें.

**धू** ष० ग० प० प० हालविणें.

**नद्** प्र० ग० प० प० ध्वनि करणें, गर्जना करणें.

**नश्** उप० वि, नाश पावणें.

**पण्** प्र० ग० स्तुति करणें, पणाला लावणें, क्रयविक्रय करणें.

**भ्रम्** प० प० फिरणें, भटकणें.

**भ्रस्ज्** ष० ग० उ० प० भाजणें.

**मस्ज्** ष० ग० प० प० बुडणें.

**म्ना** प्र० ग० प० प० वारंवार मनन करणें, पुनः पुनः म्हणणें; **सम्+आ+म्ना**, पुनः पुनः म्हणणें, परंपरागत कथा सांगणें, नेमून देणें, नियम करणें.

**यम्** प्र० ग० प० प० नियमन करणें, दाबणें; ह्याच अर्थी **नि** हा उपसर्ग जोडितात.

**यस्** च० ग० प० प० प्रयत्न करणें; ह्याच अर्थी **प्र** हा उपसर्ग जोडितात.

**युज्** उप० **वि**, ( कर्मणि ) निराळें केलें जाणें.

**रच्** उप० **वि**, रचना करणें.

**रम्** उप० **वि**, थांबणें, विराम करणें.

**लष्** प० प० इच्छिणें; **अभि+लष्** विशेष लोभ ( एखाद्या वस्तूविषयीं ) धरणें, इच्छिणें.

**लिप्** ष० ग० उ० प० लेपणें.

**लुप्** च० ग० प० प० गोंधळणें, घोटाळणें; नाहींसें होणें.

**लुप्** ष० ग० उ० प० घेऊन जाणें, लुटणें, तोडणें.

**वप्** प्र० ग० उ० प० वपन करणें, पेरणें; **निर्+वप्** बलि देणें.

**विच्छ्** ष० ग० प० प० जाणें, पोंचणें.

**वृष्** प्र० ग० प० प० वृष्टि करणें.

**व्यध्** च० ग० प० प० टोंचणें, जखमी करणें.

**व्रश्च्** ष० ग० प० प० कापणें, विदारणें.

**शद्** प्र० ग० नाश पावणें, ऱ्हास पावणें.

**श्रि** उप० **सम्**, आश्रय करणें, अवलंबून असणें.

**सञ्ज्** प्र० ग० प० प० लागून असणें; **वि+अति+सञ्ज्** ( **व्यतिषञ्ज्** ) एकत्र करणें.

**सह्** उप० **उद्**, समर्थ असणें, योग्य असणें, योग्य मानणें.

**सो** च० ग० प० प० शेवट करणें, नाश करणें; **वि+अव+सो** निश्चय करणें, प्रयत्न करणें, उद्योग करणें.

**स्था** उप० **अव**, राहणें, वस्ती करणें.

---

**अङ्ग** न० अवयव.

**अञ्जन** न० काजळ.

**अननुष्ठान** न० ( **अनुष्ठान** न० करणें ) न करणें, वगळणें.

**अन्य** सर्व० वि० इतर.

**अनिग्रह** पु० ( **निग्रह** पु० नियमन ) अनियमन.

**अनीक** न० **सैन्य**.

**अपथ्य** न० दुष्ट पदार्थ, दुष्कृत्य.

**अपराधसहस्र** न० ( **सहस्र** न० हजार ) हजार अपराध.

**अभिहित** भू० का० धा० क० **अभि+धा** ह्या धातूचें, बोललेलें.

**अभ्यागत** भू० का० धा० **अभि+गम्** ह्या धातूचें, आलेला.

**अभ्यागत** पु० अतिथि.

**अरुण** पु० सूर्याचा सारथि.

**अर्घ्यसत्कार** पु० ( अर्घ्य न० पूजेचे किंवा अतिथीला सन्मान देण्याचे पदार्थ, **सत्कार** पु० सन्मान ) पूजासाहित्यानें जो सन्मान तो.

**अर्थसंशय** पु० ( **संशय** पु० संदेह, भय ) द्रव्याला भय.

**अल्प** वि० थोडें, **अनल्प** वि० विपुल.

**अवज्ञात** भू० का० धा० क० **अव+ज्ञा** ह्या धातूचें, धिक्कारलेला.

**असत्पुरुषसेवा** स्त्री० ( **सत्** वि० चांगलें, **सेवा** स्त्री० चाकरी ) दुर्जन-सेवा, दुष्ट पुरुषाचें केलेलें काम.

**अहि** पु० साप.

**अह्नाय** क्रि० वि० अ० सत्वर, लौकर, लागलेंच.

**आकाशवायु** पु० आकाशांतील वारा.

**आन्तर** वि० आंतील.

**आमोद** पु० सुगंध.

**आरूढ** भू० का० धा० क० **आ+रुह्** ह्या धातूचें, वर चढलेला.

**आलवाल** न० आळें, वृक्षाच्या भों-वतीं पाण्याकरितां करितात तें.

**आहव** पु० युद्ध.

**इंद्रियार्थोपसेवन** न० ( **इंद्रिय**, **अर्थ** पु० पदार्थ, **उपसेवन** न० उपभोगणें ) इंद्रियांनीं उपभोग्य पदार्थांचा उपभोग.

**उपकारिन्** वि० उपकार करणारा.

**ऊर्जित** वि० उत्तम.

**केश** पु० केंस.

**कोटि** स्त्री० कोटिसंख्या.

**कोप** पु० क्रोध.

**क्लान्त** भू० का० धा० **क्लम्** ह्या धातूचें, थकलेला, म्लान झालेला.

**क्षितीश** पु० ( **क्षिति** स्त्री० पृथ्वी ) भूपति, राजा.

**खलभुजङ्ग** पु० ( **खल** पु० दुष्ट, **भुजङ्ग** पु० साप ) दुष्टरूपी साप.

**खलु** अ० निश्चयार्थी.

**गगनमध्य** पु० न० ( **गगन** न० आकाश, **मध्य** पु० न० मधील भाग ) आकाशाचा मध्य.

**गति** स्त्री० आश्रय.

**गरुडाज्ञा** स्त्री० गरुडाचा ( सर्पवंशा-च्या शत्रूचा ) हुकूम.

**गृहमेधिन्** पु० गृहस्थधर्मानें वागणारा.

**घर्मज** वि० ( **घर्म** पु० उष्णता ) उष्णतेनें उत्पन्न झालेला.

**चेतस्** न० मन.

**जीवनाशा** स्त्री० ( **जीवन** न० जगणें, **आशा** स्त्री० इच्छा ) जग-ण्याची इच्छा.

**तद्देश** पु० त्याचा देश.

**तद्विद्विष्** *पु० त्याचा शत्रु.

**तद्विभूति** स्त्री० त्याचें ऐश्वर्य.

**ताप** पु० उष्णता.

**तावत्** क्रि० वि० तोंपर्यंत, इतक्यांत.

**तूर्णम्** क्रि० वि० सत्वर.

**तेजस्विन्** वि० प्रकाशमान, आपल्या कलानें वागणारा.

**तोय** न० पाणी.

**दम्पती** पु० ( द्विवचनांत ) नवरा-बायको, जोडपें.

**दन्त** पु० दांत.

**दुष्ट** वि० दुर्जन.

---

* शेवटच्या ष् ह्या व्यंजनास ट् अथवा ड् आदेश प्रथमैकवचनीं अथवा व्यंज-नादि प्रत्यय पुढें असतां होतो.

**द्विजन्मन्** पु० ( **द्वि** दोन, **जन्मन्** न० उत्पत्ति ) दोन आहेत जन्म ज्यास असा; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य.

**द्विजिह्व** पु० ( **जिह्वा** स्त्री० जीभ ) दोन जिभांनीं युक्त, साप.

**द्विष्** पु० शत्रु.

**धनाशा** स्त्री० द्रव्याची इच्छा.

**धर्मसूत्रकार** पु० ( **धर्म** पु० श्रुति, स्मृति इत्यादिकांत सांगितलेला सदाचार, **सूत्र** न० नियम ) धर्मसंबंधी नियम बांधणारा.

**धर्मार्थम्** क्रि० वि० धर्माकरितां.

**धैर्यधन** वि० धैर्य हेंच ज्याचें धन असा.

**निदाघ** पु० उन्हाळा, ग्रीष्मऋतु.

**निन्दित** भू० का० धा० क० **निन्द्** ह्या धातूचें, दूषित, दोषार्ह.

**निरस्त** भू० का० धा० क० **निर्+अस्** फेंकणें ह्या धातूचें, दूर घालविलेलें.

**निवर्तन** न० परतणें, वर्ज करणें.

**निष्ठाशून्य** वि० ( **निष्ठा** स्त्री० स्थिरता, **शून्य** वि० रहित ) स्थिरतारहित, चंचल.

**निष्फलता** स्त्री० व्यर्थता.

**नीच** वि० अधम स्थितींतला.

**न्यायवादिन्** वि० ( **न्याय** पु० जें योग्य तें ) योग्य असेल तें बोलणारा.

**पतन** न० पडणें, भ्रष्टता, नाश.

**पथ्य** न० हितकारक.

**पदार्थ** पु० वस्तु.

**परम्** अ० परंतु.

**पर्याप्तम्** क्रि० वि० इच्छानुरूप, पुरेसें.

**पावन** वि० पवित्र, पवित्र करणारें.

**पुष्टि** स्त्री० पोषण.

**प्रचण्ड** वि० उग्र, तीक्ष्ण.

**प्रतापनिधि** पु० उष्णतेचा सांठा.

**प्रतिपक्ष** पु० शत्रु.

**प्रत्युत्पन्नमति** वि० ( **प्रत्युत्पन्न** भू० का० धा० **प्रति+उद्+पद्** ह्या धातूचें ) समयस्फूर्ति ज्यास आहे असा, तीक्ष्ण बुद्धीचा.

**प्रमाद** पु० चुकी.

**प्राण** पु० ( बहुवचनांत ) प्राण.

**बहिरुपाधि** पु० ( **उपाधि** पु० कारण ) बाहेरचें कारण.

**बाणवृष्टि** स्त्री० ( **वृष्टि** स्त्री० वर्षाव ) बाणांचा वर्षाव.

**भानु** पु० सूर्य.

**भोगतृष्णा** स्त्री० ( **भोग** पु० सुख, **तृष्णा** स्त्री० इच्छा ) सुखाची इच्छा.

**मत** न० अभिप्राय, उपदेश.

**मधुपर्क** पु० एखादा पाहुणा आला असतां त्यास मध, दहीं इ० देणें.

**महाज** पु० मोठा मेंढा.

**महानुभाव** वि० कुलीन.

**महाराज** पु० मोठा राजा.

**महोक्ष** पु० ( **महत्** वि० मोठा, **उक्षन्** पु० बैल ) मोठा बैल.

**मान** पु० गर्विष्ठपणा, स्वतःचा मोठेपणा.

**मालाकार** पु० माळी.

**मिथः** क्रि० वि० अ० परस्पर.
**यावत्** क्रि० वि० अ० जोंपर्यंत.
**रण** न० युद्धभूमि.
**रश्मिवत्** पु० ( **रश्मि** पु० किरण ) सूर्य.
**राष्ट्र** न० राज्य.
**रुष्** स्त्री० कोप, क्रोध.
**लक्ष्मी** स्त्री० संपत्ति आणि सौंदर्य ह्यांची देवता; शोभा, वैभव.
**वणिग्जन** पु० ( **वणिज्** पु० व्यापारी, वाणी ) व्यापाऱ्यांचा समूह.
**वत्सतरी** स्त्री० कालवड, पाडी.
**वधक्रम** पु० वध करण्याची रीत.
**वन्य** वि० अरण्यसंबंधी.
**वपुस्** न० शरीर.
**वर्मन्** न० चिलखत.
**वारिद्** पु० मेघ.
**विचित्र** वि० चमत्कारिक, आश्चर्यकारक.
**विपिन** न० अरण्य.
**विश्वतः*** क्रि० वि० अ० चोहोंकडे.
**विहित** भू० का० धा० क० **वि+धा** ह्या धातूचें, धर्मशास्त्रांत सांगितलेलें.
**वृद्धि** स्त्री० भरभराट.
**वैषम्य** न० संकट, विपत्ति.
**व्यथित** भू० का० धा० **व्यथ्** ह्या धातूचें, दुःखित.
**शक्य** वि० होण्याजोगें.
**शचीपति** पु० शचीचा-इंद्राणीचा भर्ता, इंद्र.
**शनैस्** क्रि० वि० अ० हळूहळू.
**शब्द** पु० ध्वनि, शब्द.
**शरीरिन्** वि० देही.
**शरीरिन्** पु० मनुष्य, प्राणी.
**शस्त्रसंपात** पु० ( **शस्त्र** न० हत्यार, **संपात** पु० पडणें ) शस्त्रप्रहार.
**शाश्वत** वि० निरंतर.
**शिखिन्** पु० मोर.
**शीत** वि० थंड.
**श्रम** पु० कष्ट.
**श्रोत्र** न० कान.
**श्रोत्रिय** पु० वेदज्ञ, वेद जाणणारा ब्राह्मण.
**संगत** भू० का० धा० **सम्+गम्** ह्या धातूचें, जमलेला.
**सकल** वि० सर्व, संपूर्ण.
**सक्रोध** वि० रागावलेला.
**सच्चरणव्रत** न० ( **व्रत** न० नियम ) सदाचरणाचा नियम.
**सद्यस्** क्रि० वि० अ० तत्क्षणीं.
**समन्तात्** क्रि० वि० अ० सभोंवतीं.
**सम्यक्** क्रि० वि०अ० बरोबर, चांगलें.
**सेवन** न० सेवा, आश्रय करणें, करीत असणें.
**स्थित** भू० का० धा० **स्था** ह्या धातूचें, असलेलें.
**स्वजनवियोग** पु० संबंधी मनुष्यांची ताटातूट.
**स्वन** पु० ध्वनि, गर्जना.
**स्वहित** न० आपलें कल्याण.
**स्वेदलव** पु० ( **स्वेद** पु० घाम, **लव** पु० बिंदु ) घर्मबिंदु.
**हेतु** पु० कारण.

---

* नामांस **तस्** हा प्रत्यय जोडिला असतां त्यांचा अर्थ पंचम्यन्ताप्रमाणें व कधीं कधीं सप्तम्यन्ताप्रमाणें होतो.

अकस्मात् **सहसा** अ०.
अचेतन **अचेतन** वि०.
**अज** पु० एका राजाचें नांव.
**इक्ष्वाकु** पु० (बहुवचनांत) ज्या वंशांत राम उत्पन्न झाला होता त्या वंशाचें नांव.
इंद्रजित **इन्द्रजित्** पु० रावणाचा पुत्र.
उठत असतां **उत्तिष्ठत्** वि०.
एकमेक **परस्पर** वि०.
ओला **आर्द्र** वि०.
कठोर **परुष** वि०; (शब्द) **परुषाक्षर** वि०.
क्षमा न करणारा **अमर्षण** वि०.
खेटाखेटी **संघट्टन** न०.
ज्वाला **शिखा** स्त्री०.
झोंपीं गेलेला **सुप्त** वि०.
तुषार **शीकर** पु०, **कण** पु०.
पतंग **शलभ** पु०.
परतविण्यास **निवर्तयितुम्** अ०.
पाञ्चाली **पाञ्चाली** स्त्री० पंचाल देशाच्या राजाची मुलगी.
पाय लावणारा **पादेन स्पृशन्.**
कृतघ्नता **कृतघ्नता** स्त्री०.
पुनः मिळविणें **प्रत्यागम** पु०.
प्रथम **प्रथमतः** अ०.
भुलविलेला **लोभित** वि०.
रक्त **शोणित** न०.
रागावलेला **क्रुद्ध** वि०.
लगबगीनें **ससंभ्रमम्** क्रि० वि०.
विलक्षण **अनिर्वचनीय** वि०, **अनिर्वर्णनीय** वि०, **किमपि.**
शक्ति **प्रभाव** पु०.
शेंकडों **शतशः** अ०.
हळूहळू **मन्दम्** क्रि० वि०.
हार **हार** पु०, **माला** स्त्री०.
समाज **समाज** पु०, **सभा** स्त्री०.
संसारचक्र **संचारचक्र** न०.
हरण केलेलें **आक्षिप्त** वि०.

# द्वितीयः पाठः ।

## पंचम व अष्टम गण.

संस्कृतांतील क्रियापदांचे काळ व अर्थ मिळून दहा प्रकार आहेत. त्यांपैकीं चार प्रकारांतील ( वर्तमान काळ, प्रथम भूत काळ, आज्ञार्थ व विध्यर्थ ह्यांतील ) क्रियापदरूपें विलक्षण होतात. त्यासंबंधानें त्यांचे नऊ गण* कल्पिले आहेत व ह्या चार प्रकारांस सार्वधातुप्रकार ( म्ह० गणविकरण होणारे प्रकार ) असें नांव दिलें आहे.

१. ह्या प्रकारांच्या संबंधानें संस्कृतव्याकरणकर्त्यांनीं केलेल्या दहा गणांचे दोन वर्ग कल्पिले आहेत. पहिल्या वर्गांत **प्रथम, चतुर्थ, षष्ठ** व **दशम,**

---

* संस्कृतव्याकरणकर्ते दहा गण करितात, परंतु दशम गणांतील धातूंस **अय** लागतो, तो केवळ पूर्वीं सांगितलेल्या चार प्रकारांतच लागतो असें नाहीं, तर इतरत्रही लागतो.

असे चार गण व दुसऱ्या वर्गांत बाकी राहिलेले म्ह० **द्वितीय, तृतीय, पंचम, सप्तम, अष्टम** आणि **नवम** हे गण घातले आहेत. पहिल्या वर्गाचें सामान्य लक्षण असें आहे कीं, त्याच्या **अंगाचे*** अन्तीं **अ** असतो; व दुसऱ्याचें सामान्य लक्षण असें आहे कीं, त्याचे **अंगाचे** अन्तीं **अ** असत नाहीं.

# द्वितीय वर्गांतील सार्वधातुकप्रकाराविषयीं सामान्य नियम.

२. कांहीं प्रत्यय लागण्यापूर्वी विकरणसहित धातूचें जें विलक्षण रूपांतर होतें, त्या रूपांतरास अनुसरून प्रत्ययाचे दोन प्रकार केले आहेत. एकास **पित्** † आणि दुसऱ्यास **अपित्** अशीं नांवें दिलीं आहेत.

## परस्मैपद.

३. एकवचनी प्रत्यय **पित्** आहेत.

अपवाद—विध्यर्थाचे एकवचनी प्रत्यय **पित्** नाहींत, व आज्ञार्थाच्या द्वितीय पुरुषाचा एकवचनी प्रत्यय **पित्** नाहीं.

४. द्विवचनी व बहुवचनी प्रत्यय **अपित्** आहेत.

अपवाद—आज्ञार्थाच्या प्रथम पुरुषाचे द्विवचनी व बहुवचनी प्रत्यय **पित्** जाणावे.

ह्यावरून असें ठरलें कीं वर्तमान व प्रथम भूत ह्या कालांचे एकवचनी प्रत्यय, आज्ञार्थाच्या तृतीय पुरुषाचा एकवचनी प्रत्यय व प्रथम पुरुषाचे तीनही वचनांचे प्रत्यय **पित्** होत; आणि बाकीचे सारे प्रत्यय **अपित्** होत.

## आत्मनेपद.

५. सर्व प्रत्यय **अपित्** आहेत.

अपवाद—आज्ञार्थाच्या प्रथम पुरुषाचे तीनही प्रत्यय **पित्** जाणावे.

६. **पित्** प्रत्यय लागण्यापूर्वी अंत्य व ऱ्हस्व उपांत्य स्वरास गुण होतो.

## वर्तमानकाल.

७. प्रथम आणि द्वितीय वर्गांचे परस्मैपदी वर्तमानकालाचे प्रत्यय सारखेच आहेत. परंतु आत्मनेपदाचे प्रत्ययांत खालीं लिहिल्याप्रमाणें फेरफार होतो.

---

* प्रथम पुस्तक पान ८२ टीप § पहा.

† ज्यांचा योग असतां गुण किंवा वृद्धि होते ते **पित्**, व ज्यांचा योग असतां हे विकार होत नाहींत ते **अपित्**.

( १ ) प्रथम पुस्तकांत सांगितलेल्या आत्मनेपदी प्रत्ययांतील इच्या जागीं आ होतो. ( २ ) प्रथम पुरुषाच्या एकवचनाचा प्रत्यय ए आहे. ( ३ ) तृतीय पुरुषाच्या बहुवचनी प्रत्ययांतील न्चा लोप होतो. ह्यावरून ठरलेले प्रत्यय खालीं लिहिल्याप्रमाणें:—

## आत्मनेपदी प्रत्यय.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | ए | वहे | महे |
| द्वि० पु० | से | आथे | ध्वे |
| तृ० पु० | ते | आते | अते |

८ सार्वधातुकप्रकारांतील प्रत्यय लावण्यापूर्वी पंचम गणांतील धातूंस नु आणि अष्टम गणांतील धातूंस उ हीं विकरणें लागतात.

### पंचम गण.

चि उ० प० ' एकत्र करणें. '

| | ए० व० | द्वि० व० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | चिनोमि | चिनुवः-चिन्वः | चिनुमः-चिन्मः |
| द्वि० पु० | चिनोषि | चिनुथः | चिनुथ |
| तृ० पु० | चिनोति | चिनुतः | चिन्वन्ति |

येथें चिला नु लागून चिनु असें अंग झालें. मि, सि, ति, हे प्रत्यय पित् असल्यानें उ ह्या अंत्य स्वराचा ओ झाला, म्हणजे चिनुचें चिनो असें रूप झालें. वस्, मस् इत्यादि प्रत्यय अपित् आहेत म्हणून स्वरांत कांहीं फेरफार झाला नाहीं.

( अ ) विकरणांतील उ ह्या स्वरापूर्वी संयोग नसला तर वकारादि व मकारादि प्रत्यय लावितांना विकल्पें उचा लोप होतो, म्हणून चिनुवः-चिन्वः, चिनुमः-चिन्मः अशीं रूपें वर झालीं; व खालींहि चिनुवहे-चिन्वहे, चिनुमहे-चिन्महे अशीं झालीं. परंतु आप् धातूच्या आप्नुवः-आप्नुमः ह्या रूपांत उचा लोप कधींही होत नाहीं, कारण येथें उच्या पूर्वी संयोग ( जोडाक्षर ) आहे.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | चिन्वे | चिनुवहे-चिन्वहे | चिनुमहे-चिन्महे |
| द्वि० पु० | चिनुषे | चिन्वाथे | चिनुध्वे |
| तृ० पु० | चिनुते | चिन्वाते | चिन्वते |

हे सर्व प्रत्यय अपित् असल्यानें नुचा नो झाला नाहीं.

**आप्** प० प० 'मिळविणें.'

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **आप्नोमि** | **आप्नुवः** | **आप्नुमः** |
| द्वि० पु० | **आप्नोषि** | **आप्नुथः** | **आप्नुथ** |
| तृ० पु० | **आप्नोति** | **आप्नुतः** | **आप्नुवन्ति** |

( **ब** ) पंचम गणांतील हलंत धातूंस स्वरादि **अपित्** प्रत्यय लावणें असल्यास ह्या विकरणाच्या **उ**च्या जागीं **उव्** होतो. **आप्** धातु हलंत आहे म्हणून **आप्नुवन्ति** असें रूप झालें.

### अष्टम गण

**तन्** उ० प० 'विस्तार करणें.'

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **तनोमि** | **तनुवः-तन्वः** | **तनुमः-तन्मः** |
| द्वि० पु० | **तनोषि** | **तनुथः** | **तनुथ** |
| तृ० पु० | **तनोति** | **तनुतः** | **तन्वन्ति** |

---

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **तन्वे** | **तनुवहे-तन्वहे** | **तनुमहे-तन्महे** |
| द्वि० पु० | **तनुषे** | **तन्वाथे** | **तनुध्वे** |
| तृ० पु० | **तनुते** | **तन्वाते** | **तन्वते** |

१४ व्या पानांतील ( अ ) नियमास अनुसरून **तनुवः** अथवा **तन्वः** इत्यादि रूपें झालीं.

९ **कृ**=करणें अ० ग० उ० प० ह्या धातूचीं **पित्** प्रत्ययापूर्वी **कर्** आणि **अपित्** प्रत्ययापूर्वी **कुर्** अशीं रूपें सार्वधातुक प्रकारांत होतात.

| | परस्मैपद ए० व० | द्विव० | ब० व० | | आत्मनेपद. ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|---|---|---|---|
| प्र० पु० | **करोमि** | **कुर्वः** | **कुर्मः** | प्र० पु० | **कुर्वे** | **कुर्वहे** | **कुर्महे** |
| द्वि० पु० | **करोषि** | **कुरुथः** | **कुरुथ** | द्वि० पु० | **कुरुषे** | **कुर्वाथे** | **कुरुध्वे** |
| तृ० पु० | **करोति** | **कुरुतः** | **कुर्वन्ति*** | तृ० पु० | **कुरुते** | **कुर्वाते** | **कुर्वते.** |

( **अ** ) **कृ** धातूस वकारादि व मकारादि प्रत्यय लावते वेळेस **उ** ह्या विकरणाचा लोप अवश्य होतो. जसें-**कुर्वः**, **कुर्मः** इत्यादि.

---

*न् च्या नंतर दंत्यवर्गांतील कोणतेंहि अक्षर आलें असतां न् बद्दल ण् होत नाहीं.

यज्ञेषु सोमं सुन्वतेऽध्वर्यवः ।
प्रत्यहं प्रातरुत्थायोपवनं च गत्वा पुष्पाण्यवचिनोमि ।
महात्मनां यशांसि दिक्षु प्रतन्वन्ति कवयः ।
दुःखपीडितामपि मां हृदयमर्मच्छिद्भिर्वचनैः किं पुनर्दुनोषि ।
द्वाःस्थौ पुरुषौ राजकुलस्य द्वारमपावृण्वाते ।
पुण्यकृतः स्वेषां सुचरितानां फलं स्वर्गलोकेऽश्नुवते ।
आर्याः संसारसुखानि त्यक्त्वा किमर्थमरण्यवासमङ्गीकुरुध्वे ।
श्रुतिमनोहरांश्चित्रालापाञ्शृण्मः ।
आकाशं मेघा वृण्वते ।
हे जगन्नायक न वयं चर्मचक्षुषा तव विभूतिमुपवीक्षितुं शक्नुमः ।
यत्त्वं कुरुषे तदन्यथा विधातुं कः शक्नोति ।
केनापि रक्षसा हृतमस्माकं तुरगं वयं विचिनुमः
वारंवारमीश्वरस्याराधनां साधवः कुर्वन्ति ।
सत्कृतिर्मनुष्यस्य कीर्तिं सर्वेषु देशेषु तनोति ।
दुरापमपि लोकेऽस्मिन् यद्यद्वस्त्वभिवाञ्छति ।
तत्तदाप्नोति मेधावी तस्मात्कार्यः समुद्यमः ॥
* न दुनोति दयालुत्वाद्वचसा कंचिदप्यसौ ।
दुरुक्तैरपि दीनानां मनस्तस्य न दूयते ॥
सोमं सुनोति यज्ञेषु सोमवंशविभूषणः ।
पुरः सुवति संग्रामे स्यन्दनं स्वयमेव सः ॥

---

१ तुम्ही आपले मनोविकार जिंकूं शकत नाहीं ( **शक्** ).

२ आम्ही प्रतिवर्षी काशीयात्रा करितों ( **कृ** ).

३ चातक जल मागतो ( **वन्** ) परंतु तें त्यास मिळत नाहीं ( **आप्** ).

४ जें मी बोलतों तें तूं ऐकतोस ( **श्रु** ) ?

५ ती कल्पना मी सांगत नाहीं ( **वि+वृ** ), कारण ती दुष्ट आहे.

६ मी राजवाड्याचे दरवाजे बंद करितों ( **सम्+वृ** ).

७ दोन शिक्षक न्यायशास्त्राचीं तत्वें आपल्या शिष्यांस उघड करून सांगतात ( **वि+वृ** ).

---

* हा व ह्याचे खालचा श्लोक हे **कृष्ण** ह्या नांवाच्या एका प्राचीन राजाच्या गुणवर्णनाचे आहेत.

८ अशा करण्यानें* तुम्ही आपला हलकेपणा उघड ( **आविस्+कृ** ) करितां.

९ कृपण धन सांठवितात ( **सम्+चि** ).

१० सुज्ञ लोक आपलीं कार्यें सुलभ रीतीनें साधितात ( **साध्** ).

११ मी एक प्राणी पाहता झालों; त्याचें शेंपूट जाडें आहे, तें तो नेहमीं हालवितो ( **धु** ).

---

# शब्दकोश २.

## पंचम गणांतील धातु.

**अश्** आ० प० मिळविणें, उपभोगणें, व्यापणें.

**आप्** प० प० संपादन करणें, मिळविणें.

**चि** उ० प० एकत्र करणें; **वि+चि** शोध करणें; **सं+चि** संचय करणें.

**दु** प० प० पीडा देणें, त्रास देणें, दुःख देणें.

**धु** अ० **धू** उ० प० हालविणें.

**धृष्** प० प० धजणें.

**वृ** उ० प० झांकणें; **अप+आ+वृ** उघडणें; **आ+वृ** आवरणें, दाबणें; **वि+वृ** सांगणें, उघड करून सांगणें; **सम्+वृ** बंद करणें.

**शक्** प० प० समर्थ असणें.

**श्रु** ( **शृ** ) † प० प० ऐकणें.

**साध्** प० प० साधणें.

**सु** उ० प० सोमरस काढणें.

---

## अष्टम गणांतील धातु.

**कृ** उ० प० करणें;

**अंगी+कृ** अंगिकार करणें.

**आविस्+कृ** उघड करणें.

**तिरस्+कृ** धिक्कारणें.

**प्रति+कृ** सूड उगविणें, अडथळा करणें.

**वशी+कृ** वश करणें, जिंकणें.

**तन्** उ० प० यज्ञ करणें; **प्र+तन्** पसरणें.

**वन्** आ० प० याचना करणें, मागणें.

---

*येथें तुम्ही याचा गुण दाखविणारें **कृ** धातूचें वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषण योजा.

† सार्वधातुकप्रकारांत होणारीं कितीएक धातूंचीं रूपें कंसांत लिहिलीं आहेत.

**अध्वर्यु** पु० ऋत्विजांपैकीं एक. ह्याचें काम बली तयार करून अग्नींत टाकणें हें होय.

**अन्यथा** अ० अन्य प्रकारानें, नाहीं तर.

**अरण्यवास** पु० ( **अरण्य** न० वन, **वास** पु० राहणें ) वनांत राहणें.

**आराधना** स्त्री० पूजा.

**कार्य** वि० केलें जाण्यास योग्य.

**चर्मचक्षुस्** न० (**चर्मन्** न० कातडें व **चक्षुस्** न० डोळा ) कातड्याचा डोळा.

**चित्रालाप** पु० ( **चित्र** नानाविध, **आलाप** पु० संभाषण ) नानाविध विषयांवरील भाषण.

**जगन्नायक** पु० ( **जगत्** न० जग, **नायक** पु० पति, धनी ) जगत्पति.

**तुरग** पु० घोडा.

**दयालुत्व** न० दयाळूपणा.

**दीन** वि० गरीब, गरजू, दुःखी.

**दुःखपीडित** वि० दुःखानें गांजलेला.

**दुराप** वि० मिळविण्यास कठीण.

**दुरुक्त** न० दुर्भाषण, नीट न उच्चारलेले शब्द.

**दू** च० ग० आ० प० दुःखित होणें.

**द्वाःस्थ** पु० द्वारपाळ.

**द्वार** न० दरवाजा, दार.

**पुण्यकृत्** वि० पुण्यवान ( **पुण्य** न० व **कृ** करणें. )

**पुरस्** क्रि० वि० अ० पुढें.

**प्रत्यहम्** क्रि० वि० अ० (**प्रति** प्रत्येक, **अहन्** न० दिवस ) प्रति दिवशीं.

**यज्ञ** पु० याग.

**राजकुल** न० ( **राजन्** पु० राजा, **कुल** न० घर, वाडा ) राजवाडा.

**वारंवारम्** अ० पुनः पुनः.

**विभूति** स्त्री० शक्ति, मोठेपणा.

**श्रुतिमनोहर** वि० (**श्रुति** स्त्री० कान, **मनोहर** वि० मधुर ) कानाला गोड लागणारा.

**संग्राम** पु० युद्ध.

**संसारसुख** न० संसारांतील सुख.

**सत्कृति** स्त्री० चांगलें वर्तन.

**समुद्यम** पु० उद्योग.

**सू** ष० ग० प० प० प्रेरणा करणें.

**सोमवंशविभूषण** वि० ( **सोम** पु० चंद्र ) चंद्रवंशाला शोभविणारा, चंद्रवंशी राजांस शोभा आणणारा.

**स्यन्दन** पु० रथ.

**स्वयम्** अ० स्वतः.

**हृदयमर्मच्छिद्** वि० ( **हृदय** न० वक्षस्थल, **मर्मन्** न० मर्म, **छिद्** कापणें ) हृदयाच्या मर्माचें भेदक.

---

आपला **स्वीय** वि०.

कल्पना **संकल्प** पु०, **बुद्धि** स्त्री०.

कारण **यतः** अ०, **हि** अ०.

कार्य **कार्य** न०.

कृपण **कदर्य** पु०.

जाडें **स्थूल** वि०, **विपुल** वि०.

तत्त्व **तत्त्व** न०, **नय** पु०.

दरवाजा **द्वार** न०.

दुष्ट **पाप** वि०.

नेहमीं **अनिशम्** अ०.

प्रतिवर्षी **प्रतिसंवत्सरम्** क्रि० वि०.

मनोविकार **मनोधर्म** पु०, **इंद्रियवृत्ति** स्त्री०, **इंद्रिय** न०.

यात्रा **यात्रा** स्त्री०.

शहाणा **दूरदर्शिन्** वि०, **चतुर** वि०.

शिक्षक **अध्यापक** वि०.

सुलभ रीतीनें **सौकर्येण** न० तृ०.

हलकेपणा **लघुता** स्त्री०.

# तृतीयः पाठः ।

## पंचम व अष्टम गण–(पुढें चालू).

## प्रथम भूत अ० अनद्यतनभूत.

परस्मैपदी प्रत्यय प्रथम वर्गाच्या प्रत्ययांप्रमाणें.

आत्मनेपदी प्रत्यय त्याचप्रमाणें, परंतु **इताम्** आणि **इथाम्** यांतील **इ**च्या जागीं **आ** होतो. ( पृ. १४ नि० ( १ ) पहा. )

बहुवचनी तृतीय पुरुषाचा प्रत्यय **अत** असा आहे.

ह्यावरून ठरलेले प्रत्यय खालीं लिहिल्याप्रमाणें:—

**आत्मनेपदी प्रत्यय**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **इ** | **वहि** | **महि** |
| द्वि० पु० | **थास्** | **आथाम्** | **ध्वम्** |
| तृ० पु० | **त** | **आताम्** | **अत** |

**पंचम गण.**

**आप्** प० प० 'मिळणें.'

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **आप्नवम्** | **आप्नुव** | **आप्नुम** |
| द्वि० पु० | **आप्नोः** | **आप्नुतम्** | **आप्नुत** |
| तृ० पु० | **आप्नोत्** | **आप्नुताम्** | **आप्नुवन्** |

**अश्** आ० प० 'व्यापणें.'

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **आश्नुवि** | **आश्नुवहि** | **आश्नुमहि** |
| द्वि० पु० | **आश्नुथाः** | **आश्नुवाथाम्** | **आश्नुध्वम्** |
| तृ० पु० | **आश्नुत** | **आश्नुवाताम्** | **आश्नुवत** |

परस्मैपदी एकवचनाचे सर्व प्रत्यय **पित्** आहेत म्हणून **नु**चा **नो** झाला. **नु** ह्यांतील **उ** ह्या वर्णास **उव्** असा आदेश होतो, म्हणजे **नु** ह्याचें **नुव्** असें रूप होतें. जसें—**आप्नुवन्**, **आश्नुवि** इ०, पृ० १५ ( **ब** ) प्रमाणें.

**चि** आ० प० 'एकत्र करणें.'

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अचिन्वि** | **अचिनुवहि–अचिन्वहि** | **अचिनुमहि–अचिन्महि** |
| द्वि० पु० | **अचिनुथाः** | **अचिन्वाथाम्** | **अचिनुध्वम्** |
| तृ० पु० | **अचिनुत** | **अचिन्वाताम्** | **अचिन्वत** |

## अष्टम गण.

### तन् प० प०

| | ए० व० | द्वि० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अतनवम् | अतनुव-अतन्व | अतनुम-अतन्म |
| द्वि० पु० | अतनोः | अतनुतम् | अतनुत |
| तृ० पु० | अतनोत् | अतनुताम् | अतन्वन् |

आत्मनेपद.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अतन्वि | अतनुवहि-अतन्वहि | अतनुमहि-अतन्महि |
| द्वि० पु० | अतनुथाः | अतन्वाथाम् | अतनुध्वम् |
| तृ० पु० | अतनुत | अतन्वाताम् | अतन्वत |

पृ० १४ (अ) नियमाप्रमाणें अचिन्वहि, अतन्व, अतन्वहि हीं रूपें झालीं.

कृ धातूचीं रूपें:—

| | ए० व० | द्वि० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अकरवम् | अकुर्व | अकुर्म |
| | इ० | इ० | इ० |

पृ० १५ नि० ९ आणि (अ) पहा.

---

देवा वै यज्ञमतन्वत तांस्तन्वानानसुरा अभ्यगच्छन् ।
हे संजय, कुरुक्षेत्रे मामकाः पाण्डवाश्च किमकुर्वत तत्कथय ।
रामादीनानेतुं दूतानयोध्यां प्राहिणोज्जनकः ।
एकस्मिन्निबिडेऽरण्ये वसन्फलमूलादीनामशनेन वृत्तिमकुर्वि ।
कथय नो याः कथा वृद्धेभ्यस्त्वमशृणोः ।
रामं युद्धेऽधृष्णुवन्राक्षसाः ।
उद्यमं कुर्वन्नपि फलं नैवाप्नवं तस्माद्भवितव्यतैवात्रोपालभ्या ।
ईदृशैः कर्मभिर्महत्पुण्यं त्वं समचिनुथाः ।
भो भो अध्वर्यवः सोमं यूयमसुनुध्वं न वेति पृच्छति होता ।
रामलक्ष्मणौ सीतामरण्येऽन्विष्यन्तौ महान्तं कालं* समीहितं नैवाश्नुवाताम् ।
आपतिता आपदः प्रत्यकुर्म भवतां साहाय्येन ।

---

* कालमर्यादा दर्शविणारा शब्द द्वितीयान्त योजितात.

१ राजाचे शत्रु त्याजबरोबर युद्ध करण्यास धजले ( **धृष्** ).

२ शरयूच्या किनाऱ्यावर दशरथ यज्ञ करिता झाला ( **तन्** ).

३ शत्रूची हालचाल पाहण्यास राजाचे प्रधान मला पाठविते झाले ( **प्र+हि** ).

४ किल्ल्याचे दरवाजे आम्ही उघडिते झालों ( **अप+आ+वृ** ).

५ जें तूं करिता झालास ( **कृ** ) तें अद्यापि तुझ्या मित्रांस दुःख देतें ( **दु** ).

६ मी त्या पर्वताच्या शिखरावर चढूं शकलों नाहीं ( **शक्** ).

७ हरवलेलीं पुस्तकें तुम्ही कोठें शोधिते झालां ( **वि+चि** ) ?

८ काल त्या दोन मुली आपल्यासाठीं बागेंत फुलें गोळा करित्या झाल्या (**अव+चि** ). *

९ ते आपला काम, क्रोध आणि लोभ आयासानें आवरिते झाले ( **आ+वृ** ) आणि ब्रह्माचा विचार करून निरंतर सुख मिळविते झाले ( **आप्** ).

१० बभ्रुवाहन अर्जुनास छातींत बाणानें जखमी करिता झाला ( **क्षण्** अ० **क्षिण्** ).

११ युद्धांत योद्धयांचे घोडे मारले गेले, परंतु ते दुसरे मिळविते झाले (**आप्**) आणि पुनः लढले.

१२ तूं व रामा पाप करिते झालां † (**कृ** ), त्यासाठीं तुम्ही दोघे शिक्षेस पात्र आहां.

## शब्दकोश ३.

**क्षण्**, **क्षिण्**, अ० ग० प० प० जखमी करणें.

**हि** पं० ग० प० प० जाणें; **प्र+हि** पाठविणें.

---

**अन्विष्यत्** ( व० का० धा० **अनु+इष्** धातूचें च० ग० प० प० ) शोध करणारा.

**अशन** न० खाणें.

**ईदृश** वि० असें.

**उपालभ्य** वि० निंद्य.

**कुरुक्षेत्र** न० कौरवांच्या लढाईच्या जागेचें नांव.

**गम्** उप० **अभि**, हल्ला करणें.

**निबिड** वि० घन, दाट.

**फलमूलादि** वि० फळें, मुळें वगैरे.

**भवितव्यता** स्त्री० दैव.

---

* येथें आत्मनेपदी रूपाची योजना करावी. धातु उभयपदी असून कर्ता जर क्रियापदाचा उपभोक्ता असेल तर आत्मनेपदी रूपाची योजना करावी. उपभोक्ता जर अन्य असेल तर परस्मैपदी रूपाची योजना करावी.

† क्रियापदाला " आणि " या उभयान्वयी अव्ययानें जोडलेले असे निरनिराळे पुरुषवाचक दोन किंवा अधिक कर्ते असून त्यांपैकीं एक प्रथमपुरुषीं असल्यास, क्रियापद प्रथमपुरुषीं योजावें, नाहीं तर द्वितीय पुरुषीं योजावें.

**मामक** वि० माझा.

**रामादि** वि० (**राम** विशेषनाम आणि **आदि** आरंभ ) राम आणि इतर.

**वृत्ति** स्त्री० उपजीविका.

**वृद्ध** वि० म्हातारा.

**वै** अ० पादपूरणार्थक.

**संजय** पु० एका पुरुषाचें नांव.

**समीहित** वि० आणि न० इच्छिलेलें.

**साहाय्य** न० स्नेह, मदत.

**हे** अ० अहो, अरे, या अर्थी.

**होतृ** पु० ऋत्विजांपैकीं एक. ह्याचें काम मंत्र म्हणण्याचें आहे.

---

अद्यापि **अद्यापि** अ०.

आपल्यासाठीं **आत्मार्थम्** वि०.

काम **काम** पु०.

किनारा **तीर** न०.

किल्ला **दुर्ग** पु०.

चढण्यास **आरोढुम्** ( आ+रुह् धा० प्र० ग० ).

निरंतर **शाश्वत** वि०.

पाहाण्यास **निरूपयितुम्** ( नि+रूप् धा० द० ग० ).

बभ्रुवाहन **बभ्रुवाहन** पु० अर्जुनाचा मुलगा.

मारिलेला **हत** भू० का० धा० क०.

लोभ **लोभ** पु०.

शरयू ( अयोध्येजवळची नदी ) **सरयू** स्त्री०.

शिक्षा **दण्ड** पु०.

सुख **सुख** न०.

हरवलेला **नष्ट** भू० का० धा० वि०.

हालचाल **व्यापार** पु०.

---

# चतुर्थः पाठः ।

## पंचम व अष्टम गण—( पुढें चालू )

## परस्मैपद.

### आज्ञार्थ.

१ दुसऱ्या वर्गांत घातलेल्या गणांतील धातूंच्या, आज्ञार्थी द्वितीय पुरुषीं एकवचनाचा प्रत्यय **हि** आहे. पंचम गणांतील अजंत धातूंपुढील **हि**चा लोप होतो. अष्टम गणांतील सर्व धातूंपुढील **हि**चा लोप होतो. ह्यावरून ठरलेले प्रत्यय खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **आनि** | **आव** | **आम** |
| द्वि० पु० | **हि** | **तम्** | **त** |
| तृ० पु० | **तु** | **ताम्** | **अन्तु** |

आप् पं० ग०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | आप्नवानि | आप्नवाव | आप्नवाम |
| द्वि० पु० | आप्नुहि | आप्नुतम् | आप्नुत |
| तृ० पु० | आप्नोतु | आप्नुताम् | आप्नुवन्तु |

सु पं० ग०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | सुनवानि | सुनवाव | सुनवाम |
| द्वि० पु० | सुनु | सुनुतम् | सुनुत |
| तृ० पु० | सुनोतु | सुनुताम् | सुन्वन्तु |

येथें प्रथम पुरुषाचीं तीनही वचनें **पित्** असल्यानें **नु**चा **नो** झाला. त्या **नो**पुढें आकारादि प्रत्यय असल्यानें **नव्** आणि प्रत्ययाच्या आधींचा **आ** मिळून **नवा** असें झालें; म्हणून **आप्नवानि, आप्नवाव**, इ.

द्वितीय पुरुषाचीं तीनही वचनें आणि तृतीय पुरुषाचें द्विवचन व बहुवचन हीं **अपित्** आहेत.

### विध्यर्थ.

२ प्रथम भूतकालाच्या प्रत्ययापूर्वी **या** लावावा. तृतीय पुरुषाचा बहुवचनी प्रत्यय **युस्** आहे. प्रत्यय खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | याम् | याव | याम |
| द्वि० पु० | यास् | यातम् | यात |
| तृ० पु० | यात् | याताम् | युस् |

चि पं० ग०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | चिनुयाम् | चिनुयाव | चिनुयाम |
| द्वि० पु० | चिनुयाः | चिनुयातम् | चिनुयात |
| तृ० पु० | चिनुयात् | चिनुयाताम् | चिनुयुः |

## आत्मनेपद.

### आज्ञार्थ.

३ वर्तमान व प्रथम भूत ह्या कालांप्रमाणें आज्ञार्थांतही आत्मनेपदी प्रथम वर्गाच्या धातूंच्या प्रत्ययांतील **इ**च्या जागीं दुसऱ्या वर्गांत **आ** होतो, आणि तृतीय पुरुषी बहुवचनाच्या **न्**चा लोप होतो. म्हणून प्रत्यय खालीं लिहिल्याप्रमाणें:—

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | ऐ | आवहै | आमहै |
| द्वि० पु० | स्व | आथाम् | ध्वम् |
| तृ० पु० | ताम् | आताम् | अताम् |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | चिनवै | चिनवावहै | चिनवामहै |
| द्वि० पु० | चिनुष्व | चिन्वाथाम् | चिनुध्वम् |
| तृ० पु० | चिनुताम् | चिन्वाताम् | चिन्वताम् |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अश्नवै | अश्नवावहै | अश्नवामहै |
| द्वि० पु० | अश्नुष्व | अश्नुवाथाम् | अश्नुध्वम् |
| तृ० पु० | अश्नुताम् | अश्नुवाताम् | अश्नुवताम् |

आत्मनेपदी आज्ञार्थाच्या प्रथम पुरुषाचे सर्व प्रत्यय **पित्** आहेत, म्हणून येथें **नु**चा **नो** होऊन नंतर **नव्** झालें.

### विध्यर्थ.

४ पहिल्या वर्गातील गणांच्या आत्मनेपदी विध्यर्थी प्रत्ययांप्रमाणेंच ह्या विध्यर्थाचे प्रत्यय होत.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | चिन्वीय | चिन्वीवहि | चिन्वीमहि |
| द्वि० पु० | चिन्वीथाः | चिन्वीयाथाम् | चिन्वीध्वम् |
| तृ० पु० | चिन्वीत | चिन्वीयाताम् | चिन्वीरन् |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अश्नुवीय | अश्नुवीवहि | अश्नुवीमहि |
| द्वि० पु० | अश्नुवीथाः | अश्नुवीयाथाम् | अश्नुवीध्वम् |
| तृ० पु० | अश्नुवीत | अश्नुवीयाताम् | अश्नुवीरन् |

ह्या सर्व रूपांत **नु**चा **नुव्** पृ० १५ ( **ब** ) नियमाप्रमाणें झाला.

५ अष्टम गणांतील धातूंचीं रूपें **चि** धातूच्या रूपांप्रमाणें होतात. भेद इतकाच कीं, **नु** हें विकरण न लावतां **उ** हें लावावें. विध्यर्थी **यादि** प्रत्यय लावणें असल्यास **कृ** धातूस **उ** हें विकरण लागत नाहीं. जसें—**कुर्यात्.**

### आज्ञार्थ.

## आत्मनेपद.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | तनवै | तनवावहै | तनवामहै |

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| द्वि० पु० | तनुष्व | तन्वाथाम् | तनुध्वम् |
| तृ० पु० | तनुताम् | तन्वाताम् | तन्वताम् |

## परस्मैपद.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | तनवानि | तनवाव | तनवाम |
| द्वि० पु० | तनु | तनुतम् | तनुत |
| तृ० पु० | तनोतु | तनुताम् | तन्वन्तु |

### प० प० विध्यर्थ.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | कुर्याम् | कुर्याव | कुर्याम |
| द्वि० पु० | कुर्याः | कुर्यातम् | कुर्यात |
| तृ० पु० | कुर्यात् | कुर्याताम् | कुर्युः |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| तन्वीय | आ० | प० | विध्यर्थ | प्र० | पु० | ए० | व० |
| तनुयाम् | प० | प० | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| कुर्वीय | आ० | प० | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| करवाणि | प० | प० | आज्ञार्थ | ,, | ,, | ,, | ,, |
| कुरु | ,, | ,, | ,, | द्वि० | पु० | ए० | व० |
| करवै | आ० | प० | ,, | प्र० | पु० | ए० | व० |

वर लिहिलेलीं कृ धातूचीं कुर् व कर् अशीं रूपें १५ व्या पानांतील नवव्या नियमाप्रमाणें झालीं.

---

खादिरं यूपं कुर्वीत स्वर्गकामः खादिरेणैव वै यूपेन देवाः स्वर्गं लोकमजयंस्तथैवैतद्यजमानः खादिरेण यूपेन स्वर्गं लोकं जयति ।

दुःखसंतापेन पच्यन्त इव मेऽङ्गान्युत्क्वथ्यत इव हृदयं प्लुष्यत इव दृष्टिर्ज्वलतीव शरीरम् । अत्र यत्प्राप्तकालं तत्करोतु भवान् ।

वत्स प्रसन्नोऽस्मि ते कथय किं ते प्रियं करवाणि ।

हे ऋत्विजोऽद्य सुत्यादिने सोमं सुनुध्वम् ।

कथं नाम प्रभोरादेशमुल्लङ्घयितुं शक्नुयाम् ।

एतैरालापैरात्मनः कार्पण्यं मापावृणुष्व ।

राजन्यनुरागमाविष्कुर्वतां जना यतस्तेषां संकटानि नश्येयुः ।

आत्मनः पुत्राणां प्रवृत्त्युपलब्धये दासं श्रीनगरं प्रहिणु ।

राजन्प्रीताः स्मः शुश्रूषया तवैतया तस्मात्सर्वैर्गुणैरुपेतं पुत्रमवाप्नुहि ।

शृणुत रे पौराः । अयं वसन्तसेनाघातकश्चारुदत्तो वधस्तम्भं नीयते तद्यदीदृशं कर्म केऽपि कुर्वीरन्दण्डमप्येतादृशं प्राप्नुयुः ।

मृतं शरीरमुत्सृज्य काष्ठलोष्टसमं क्षितौ ।
विमुखा बान्धवा यान्ति* धर्मस्तमनुगच्छति ॥
तस्माद्धर्मं सहायार्थं नित्यं संचिनुयाच्छनैः ।
धर्मेण हि सहायेन तमस्तरति दुस्तरम् ॥
पूर्वे वयसि तत्कुर्याद्येन वृद्धः सुखं वसेत् ।
यावज्जीवेन तत्कुर्याद्येनामुत्र सुखं वसेत् ॥
श्वःकार्यमद्य कुर्वीत पूर्वाह्णे चापराह्णिकम् ।
न हि प्रतीक्षते मृत्युः कृतमस्य न वा कृतम् ॥

---

१ चाकर गालिचांनीं जमीन झांको ( स्तृ ).

२ ब्राह्मण पृथ्वी हिंडोत आणि नळाचा शोध करोत ( वि+चि ).

३ जर तो मला आज्ञा करील तर तें मी करीन ( कृ ).

४ तुमच्या शत्रूंस धिक्कारूं नका ( तिरस्+कृ ), कारण ते प्रतापी आहेत.

५ दुर्बल मनुष्य शहाणे असल्यास त्यांनीं सबलांशीं लढाई मारूं नये (धृष्).

६ सोमयज्ञांत ऋत्विजांनीं सोमवल्लीचा रस काढावा ( सु ).

७ तो काय बोलतो तें ऐक ( श्रु ); 'तूं मूर्ख आहेस' असें तो म्हणतो.

८ विद्याभ्यासासाठीं तुम्ही आपल्या मुलांस इंग्लंडास पाठवावें ( प्र+हि ) असें मी इच्छितों.

९ जोंपर्यंत तो आपल्याशीं हितबुद्धि आहे तोंपर्यंत आपण आपलीं कामें साधावीं ( साध् ).

१० त्या निरुपद्रवी पाखरांस पीडा देऊं नका ( दु ).

---

* या ( जाणें ) प० प० द्वि० ग० ह्या धातूचें वर्तमान काळ तृतीय पुरुषाचें अनेकवचन.

# शब्दकोश ४.

**अनुराग** पु० प्रीति, सद्बुद्धि.
**अमुत्र** अ० परलोकीं.
**आपराह्णिक** वि० दिवसाच्या उत्तर भागासंबंधी.
**आलाप** पु० भाषण.
**ईक्ष्** उप० **प्रति**, वाट पहाणें.
**उपेत** भू० का० धा० क० **उप+इ** ह्या धातूचें, सहित, युक्त.
**ऋत्विज्** पु० यजमान यज्ञांत होमादि क्रिया करण्याकरितां जे ब्राह्मण नेमितो त्यांपैकीं प्रत्येक.
**एतादृश** वि० असा.
**कथं नाम** अ० कसें बरें.
**कार्पण्य** न० नीचपणा.
**काष्ठलोष्टसम** वि० ( **काष्ठ** न० लांकूड, **लोष्ट** पु० ढेंकूळ, **सम** सारिखा ) लांकूड आणि ढेंकूळ ह्यांसारिखा.
**क्वथ्** प्र० ग० प० प०, उप० **उद्**, उकळणें, शिजणें.
**क्षिति** स्त्री० पृथ्वी.
**खादिर** वि० खैराच्या झाडाचा.
**चारुदत्त** पु० एका मनुष्याचें नांव.
**ज्वल्** प्र० ग० प० प० जळणें, पेटणें, भडकणें.
**तद्** क्रि० वि० म्हणून.
**तमस्** न० पाप, दुःख.
**दुस्तर** वि० दुर्लंघ्य, उल्लंघण्यास कठीण.
**दुःखसंताप** पु० ( **दुःख** न०, **संताप** पु० दाह ) दुःखापासून होणारा दाह, मनोव्यथा.
**पूर्वाह्ण** पु० दिवसाचा प्रथम भाग.
**प्रसन्न** ( भू० का० धा० **प्र+सद्** धातूचें ) संतुष्ट.
**प्रवृत्त्युपलब्धि** स्त्री० (**प्रवृत्ति** स्त्री० खबर, **उपलब्धि** मिळविणें ) खबर मिळविणें.
**प्राप्तकाल** वि० (**प्राप्त** भू० का० धा० **प्र+आप्** धातूचें, मिळविलेलें, **काल** पु० वेळ ) ज्याचा काल प्राप्त झाला आहे असें, ज्या प्रसंगीं जें योग्य तें.
**प्रीत** भू० का० धा० क० **प्री** ह्या धातूचें, संतुष्ट.
**प्लुष्** प्र० ग० प० प० जाळणें.
**यजमान** पु० यज्ञ करणारा.
**यावज्जीवेन** क्रि० वि० जीव आहे तोंपर्यंत.
**यूप** पु० यज्ञांतील पशु बांधण्याचा खांब.
**लङ्घ्** प्र० व द० ग० उ० प० जाणें; **उद्+लङ्घ्** ओलांडणें, मोडणें ( आज्ञा, नियम इ० )
**वधस्तम्भ** पु० ( **वध** मारणें आणि **स्तम्भ** खांब) फांशी देण्याचा खांब.
**वसंतसेनाघातक** पु० ( **वसंतसेना** स्त्री० एका स्त्रीचें नांव, **घातक** पु० नाशक ) वसंतसेनेचा वध करणारा.
**विमुख** वि० तोंड फिरविलेला, पाठमोरा.
**शनैः** क्रि० वि० अ० हळूहळू.
**शुश्रूषा** स्त्री० सेवा.

**श्वःकार्य** न० दुसऱ्या दिवशीं करावयाचें कृत्य.
**सहाय** पु० मदत करणारा, साथी.
**सुत्यादिन** न० सोमयज्ञांत सोमवल्लीचा रस पिण्याचा दिवस.
**स्तृ** पं० ग० उ० प० आच्छादणें; उप० **सम्.**
**स्वर्गकाम** पु० स्वर्गाची इच्छा करणारा.

---

आज्ञा करणें **आ+दिश्** ष०ग०प०प०.
काम **कार्य** न०.
गालिचा **कुथ** पु०
जमीन **भूमि** स्त्री०.
नलराजा **नल** पु०.
निरुपद्रवी **अनपकारिन्** वि०.
प्रतापी **प्रबल** वि०.
रस **रस** पु०.
विद्याभ्यास **अध्ययन** न०.
शहाणा **प्राज्ञ** पु०.
हितबुद्धि **स्निग्ध** ( **स्निह्** धातूचें भू० का० धा० वि० ), **सस्नेह** वि०.

---

# पंचमः पाठः ।

## नवम गण.

### वर्तमान व आज्ञार्थ.

१ नवव्या गणाचें विकरण **ना** आहे. व्यंजनादि **अपित्** प्रत्ययांपूर्वी **ना** ह्यास **नी** असा आदेश होतो, आणि स्वरादि **अपित्** प्रत्ययांपूर्वी **न्** होतो.

दुसऱ्या वर्गांतील धातूंचे सार्वधातुकप्रकारांतील प्रत्यय पूर्वोक्त तीन पाठांत सांगितले आहेत.

**क्री** उ० प० विकत घेणें.

**वर्तमान** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **क्रीणामि** | **क्रीणीवः** | **क्रीणीमः** |
| द्वि० पु० | **क्रीणासि** | **क्रीणीथः** | **क्रीणीथ** |
| तृ० पु० | **क्रीणाति** | **क्रीणीतः** | **क्रीणन्ति** |

आ० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **क्रीणे** | **क्रीणीवहे** | **क्रीणीमहे** |
| द्वि० पु० | **क्रीणीषे** | **क्रीणाथे** | **क्रीणीध्वे** |
| तृ० पु० | **क्रीणीते** | **क्रीणाते** | **क्रीणते** |

आज्ञार्थ प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | क्रीणानि | क्रीणाव | क्रीणाम |
| द्वि० पु० | क्रीणीहि | क्रीणीतम् | क्रीणीत |
| तृ० पु० | क्रीणातु | क्रीणीताम् | क्रीणन्तु |

आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | क्रीणै | क्रीणावहै | क्रीणामहै |
| द्वि० पु० | क्रीणीष्व | क्रीणाथाम् | क्रीणीध्वम् |
| तृ० पु० | क्रीणीताम् | क्रीणाताम् | क्रीणताम् |

**पित्** व **अपित्** प्रत्ययांच्या संबंधानें **ना** ह्या विकरणास जे जे विकार झाले ते ध्यानांत ठेवावे.

२ हलंत परस्मैपदी धातूंचें आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचन फक्त **आन** हा प्रत्यय लागून होतें. जसें:—**मुष्** चोरणें याचें रूप **मुषाण** ( तूं चोरी कर ) असें होतें.

मुष् प० प० चोरणें.

आज्ञार्थ.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | मुष्णानि | मुष्णाव | मुष्णाम |
| द्वि० पु० | मुषाण | मुष्णीतम् | मुष्णीत |
| तृ० पु० | मुष्णातु | मुष्णीताम् | मुष्णन्तु |

---

अग्नितप्तं सुवर्णं विलिनाति* ।
प्रियायै दातुं पुष्पस्रजं † ग्रथ्नामि ।
दोहनकाले वत्सं स्तम्भे बध्नन्ति ।
अस्मिन्नरण्ये मार्गं कर्तुं तरूंल्लुनीहि ।
अयं तव सदाचारस्ते लक्ष्मीं पुष्णातु ।
युद्धेषु वीराः शत्रूणां शिरोभिर्भूमिमास्तृणते ।
उद्धतं गच्छन्त्यास्तव गलितमुत्तरीयं गृहाणैतत् ।
विवाहविधौ कन्यायाः पाणिं वरो गृह्णाति ।

---

* पृ० ३२ ही ( * ) टीप पहा.
† पृ० ३१ ही ( † ) टीप पहा.

सुवर्णशतं दत्त्वा वयमश्वं महाजवं क्रीणीमहे ।
अपेक्षितं वृणतां भवन्त इत्यस्मानवदत्कृपालुर्भगवान् ।
रुद्रो देवानवददहं वरं वृणै । वृणीष्वेति तेऽभाषन्त ।
पावकस्तीर्थोदकं च पापकृतः पुनीत इति ब्राह्मणा वदन्ति ।

क्षणध्वंसिनो मनुजा वयमनाद्यनन्तस्य परमेश्वरस्य कथं तत्त्वं जानीमः ।

अस्मिन्महति दुर्भिक्षे धान्यं न लभ्यते ततः किमश्नाम कथं च जीवितं धारयाम ।

*धूनोति चम्पकवनानि धुनोत्यशोकं
चूतं धुनाति धुवति स्फुटितातिमुक्तम् ।
वायुर्विधूनयति चम्पकपुष्परेणू-
स्तत्कानने धवति चन्दनमञ्जरीश्च ॥
बाणावलिं किरत्याजौ करोति शरमण्डपम् ।
कृणोति करिणः शत्रोः स कृणाति हयान्परान् ॥
स्तम्भते पुरुषः प्रायो यौवनेन धनेन च ।
न स्तभ्नाति क्षितीशोपि न स्तभ्नोति युवाप्यसौ ॥
कृणात्यसौ द्विषां दर्पं शिरस्तेषां निकृन्तति ।
कीर्तयन्ति गुणांस्तस्य विस्मयेन दिवौकसः ॥
स्तृणोति बाणजालैः स रणे वीरवरूथिनीम् ।
तच्छिरोभि†स्तृणात्युर्वीं तृणराजफलैरिव ॥
स्वप्नेऽपि नानृतां वाणीं संगृणाति स भूपतिः ।
यस्य संगिरते किंचित्तस्मै तत्प्रतिपादयेत् ‡ ॥
लिनाति धर्म एवासौ नेन्द्रियार्थेषु लीयते ॥

---

* ह्या पाठांत व ह्या पुढच्या पाठांत अशा वर्णनाचीं दिलेलीं पद्यें कृष्ण ह्या नांवाच्या राजाच्या वर्णनाचीं आहेत.

† विसर्गापुढें श्, ष् अथवा स् हा वर्ण असून त्यापुढें कठोर व्यंजन असतां विसर्ग विकल्पें लुप्त होतो.

‡ प्रयोजक धातूचीं रूपें दहाव्या गणांतील धातूच्या रूपांप्रमाणें होतात, असा सामान्य नियम आहे.

**प्रीणाति यः सुचरितैः पितरं स पुत्रो**
**यद्भर्तुरेव हितमिच्छति तत्कलत्रम् ।**
**तन्मित्रमापदि सुखे च समक्रियं य-**
**देतत्त्रयं जगति पुण्यकृतो लभन्ते ॥**

---

१ वारा झाडांचे शेंडे हालवितो ( **धू** ).

२ पैसा चोरूं नका ( **मुष्** ); कारण जे पैसा चोरतात त्यांस राजाचे कामगार दंड करितात.

३ आम्ही उपवासाच्याही दिवशीं कांहीं खात नाहीं ( **अश्** ).

४ हल्लीं ब्राम्हण मुसलमानांपासूनहि दक्षिणा घेतात ( **ग्रह्** ).

५ मजसाठीं तूं मुंबईस धान्याचे ढीग विकत घे ( **क्री** ).

६ गोविंदा झाडाच्या खांद्या कापितो ( **लू** ).

७ नारायणास तलावांत पाण्यानें भांडें भरूं द्या ( **पॄ** ).

८ त्यांच्या कपटाच्या मसलती तूं जाणत नाहींस ( **ज्ञा** ).

९ ज्या वासना त्यांस वारंवार आडमार्गानें नेतात त्या त्यांस आवरूं द्या ( **नि+ग्रह्** ).

१० माझ्या घरीं येणाऱ्या प्रत्येक मनुष्यास नेहमीं मी खुष करितों ( **प्री** ).

११ मी येथें बहुत कालपर्यंत राहिलों; मला जाण्यास परवानगी द्या (**अनु+ज्ञा**).

१२ हे देवहो ! जेव्हां पापी जन तुमचें केवळ स्मरण करितात तेव्हां तुम्ही त्यांस पावन करितां ( **पू** ).

---

# शब्दकोश ५.

## नवम गणांतील धातु.

**अश्** प० प० खाणें.

**क्री** उ० प० विकत घेणें.

**क्लिश्** प० प० पीडा देणें.

***क्षुभ्** प० प० क्षोभणें, खवळणें.

**†ग्रन्थ्** प० प० एकत्र करणें, रचना करणें.

**ग्रह्** ( **गृह्** ) उ० प० घेणें; **नि+ग्रह्** आवरणें, दाबणें.

**ज्ञा** ( **जा** ) उ० प० जाणणें; **अनु+ज्ञा** परवानगी देणें.

**पुष्** प० प० पुष्ट करणें.

**प्री** उ० प० प्रीति करणें, संतुष्ट करणें.

**प्लुष्** प० प० जाळणें.

**बन्ध्** प० प० बांधणें.

**मी** उ० प० नाश करणें.

---

*क्षुभ् धातूस लागणाऱ्या विकरणांतील न् चा ण् होत नाहीं; जसें **क्षुभ्नाति-क्षुभ्नीतः-क्षुभ्नन्ति.**

† या गणांतील धातूंच्या उपांत्य अनुनासिकाचा लोप होतो.

**मुष्** प० प० चोरी करणें.
**श्री** उ० प० शिजविणें, पाक करणें.
**स्तम्भ्** प० प० प्रतिबंध करणें, कडक होणें, उन्मत्त होणें.
*__पू__ उ० प० पवित्र करणें,
**ली** प० प० वितुळणें, निमग्न होणें; **वि+ली**, वितुळणें.
**लू** उ० प० कापणें, तोडणें.
**स्तॄ** उ० प० आच्छादणें; **आ+स्तॄ** पसरणें, आच्छादणें.
**कॄ** उ० प० ठार मारणें, नाश करणें.
**गॄ** प० प० उप० **सम्**, बोलणें, उच्चारणें.
**जॄ** प० प० जीर्ण होणें, वृद्ध होणें.
**धू** उ० प० हालविणें.
**पॄ** प० प० भरणें.
**दॄ** प० प० फाडणें.
**वॄ** उ० प० मागणें, निवडून घेणें, वरणें.

---

**अग्नितप्त** वि० ( **अग्नि** व **तप्त** तापविलेलें ) विस्तवानें तापविलेलें.
**अनाद्यनन्त** वि० ( **अनादि** आदिरहित, **अनंत** अंतरहित ) ज्यास आदि व अंत नाहीं असा.
**अपेक्षित** न० ( भू० का० धा० क० **अप+ईक्ष्** ह्या धातूचें ) इच्छिलेलें.
**अशोक** पु० एका जातीच्या झाडाचें नांव.
**आजि** पु० स्त्री० युद्ध.
**उत्तरीय** न० पांघरावयाचें वस्त्र.
**उद्धतम्** भू० का० धा० **उद्+हन्** धातूचें, ( येथें क्रियाविशेषणाप्रमाणें योजिलें आहे ) गैरसावधपणानें.
**उर्वी** स्त्री० पृथ्वी.
**करिन्** पु० हत्ती.
**कलत्र** न० भार्या, पत्नी.
**कॄ** पं० ग० उ० प० ठार मारणें.
**कृपालु** वि० दयाळू.
**क्षणध्वंसिन्** वि० ( **क्षण**, **ध्वंसिन्** नष्ट होणारा ) क्षणांत नाश पावणारा.
**क्षितीश** पु० ( **क्षिति** स्त्री० पृथ्वी ) भूपति, राजा.
**गलित** भू० का० धा० **गल्** धातूचें, गळालेलें.
**गॄ** ष० ग० प० प० गिळणें; **सम्+गॄ** आ० प० वचन देणें.
**चन्दनमञ्जरी** स्त्री० चन्दनाची मञ्जरी.
**चम्पकपुष्परेणु** पु० ( **चम्पक** पु० चाफ्याचें झाड, **रेणु** पु० पराग ) चाफ्याच्या फुलांतील पराग.
**चम्पकवन** पु० चाफ्यांच्या झाडांचा समूह.
**चूत** पु० आम्रवृक्ष; न० आम्रवृक्षाचें फळ.
**तच्छिरस्** न० त्याचें मस्तक.
**तत्कानन** न० ( **कानन** न० वन, बाग ) त्याचें वन, त्याची बाग.

---

*__पू__ आदिकरून अकरा धातूंचे अन्त्य स्वर सार्वधातुकप्रकारामध्यें ऱ्हस्व होतात.

**तीर्थोदक** न० ( **तीर्थ** न० पवित्र पदार्थ, जसा नदी, **उदक** न० पाणी ) पवित्र उदक.

**तृणराजफल** न० ( **तृणराज** पु० ताडवृक्ष ) ताडवृक्षाचें फळ.

**त्रय** न० तिन्हींचा समुदाय.

**दत्त्वा** अ० **दा** देणें ह्या धातूचें, देऊन.

**दर्प** पु० गर्व.

**दोहनकाल** पु० ( **दोहन** न० दोहणें, **काल** पु० वेळ ) दूध काढण्याची वेळ.

**धू** ( **धून्** ) द० ग०, उप० **वि**, हालविणें.

**धू** प्र० ग० उ० प० हालविणें, गति देणें.

**पर** ( सर्व० ) वि० इतर, अन्य पक्षाचा, दुसऱ्याचा.

**परमेश्वर** पु० जगन्नियन्ता, देव.

**प्रति+पादय** ( प्रयोजक **प्रति+पद्** ह्या धातूचें ) उ० प० देणें.

**पापकृत्** वि० ( **पाप** न० पातक, **कृत्** केलेला ) ज्यानें पाप केलें आहे असा, पापी.

**पावक** पु० अग्नि.

**पुष्पस्रज्** स्त्री० ( **पुष्प** न०, **स्रज्** स्त्री० माळ ) फुलांची माळ.

**प्रायस्** अ० बहुतकरून.

**बाणजाल** न० ( **जाल** न० समूह ) बाणसमूह.

**मनुज** पु० मनुष्य.

**महाजव** वि० ( **महत्** मोठा, **जव** वेग ) मोठा वेगवान्.

*__युवन्__ पु० तरुण पुरुष, तरुण.

**यौवन** न० तारुण्य.

**रुद्र** पु० शिव.

**ली** च० ग० आ० प० चिकटणें, वितुळणें, गर्क होणें, निमग्न होणें.

**वर** पु० वर, देणगी.

**वह्नि** पु० विस्तव.

**विवाहविधि** पु० ( **विवाह** पु० लग्न आणि **विधि** पु० संस्कार ) विवाहसंस्कार.

**विस्मय** पु० आश्चर्य.

**वीरवरूथिनी** स्त्री० ( **वरूथिनी** स्त्री० सेना ) शूर शिपाई ज्यांत आहेत असें सैन्य.

**शरमण्डप** पु० न० बाणांचें छत.

**सदाचार** पु० ( **सत्** वि० चांगला, **आचार** पु० रीत ) चांगली रीत.

**समक्रिय** वि० ( **सम** वि० सारखें, **क्रिया** स्त्री० वर्तन ) ज्याचें वर्तन सारखें असा.

**सुवर्णशत** न० ( **सुवर्ण** पु० सोन्याचें नाणें, **शत** न० शंभर ) सोन्याचीं शंभर नाणीं.

**स्तम्भ्** † प्र० ग० आ० प० आणि पं० ग० प० प० कडक होणें, गर्विष्ठ होणें.

**स्तम्भ** पु० खांब.

**स्तृ** पं० ग० उ० प० आच्छादणें, पसरणें.

**स्फुटितातिमुक्त** न० विकसलेलें अतिमुक्तवेलीचें फूल.

**स्वप्न** पु० स्वप्न.

**हय** पु० घोडा.

---

* ह्या शब्दाचीं रूपें विशेष प्रकारचीं होतात ( पाठ १६ पहा ).

† हा धातु अनेक गणांत आहे. त्यांपैकीं हा नवव्या गणांत असतां जसा ह्याचा अनुनासिक सार्वधातुकप्रकारांत लुप्त होतो, तसा पांचव्या गणांत असतांही होतो. पृष्ठ ३१ टीप † पहा.

आडमार्गानें **उत्पथम्** क्रि० वि०.
उपवासाचा दिवस **उपवासदिन** न०.
कपटाची मसलत **कपटप्रबंध** पु०.
केवळ **केवलम्** क्रि० वि०.
खांदी **शाखा** स्त्री०.
भांडें **कुम्भ** पु०.
मुसलमान **यवन** पु० परदेशीय, ग्रीक लोक (प्राचीन काळीं).
राजाचे कामदार **राजपुरुष** पु०.
राहिलों **स्थित** वि०.
हल्लीं **संप्रति** अ०.

---

## षष्ठः पाठः ।

### नवम गण (पुढें चालू.)

### प्रथम भूत.

**परस्मैपद.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अक्रीणाम् | अक्रीणीव | अक्रीणीम |
| द्वि० पु० | अक्रीणाः | अक्रीणीतम् | अक्रीणीत |
| तृ० पु० | अक्रीणात् | अक्रीणीताम् | अक्रीणन् |

**आत्मनेपद.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अक्रीणि | अक्रीणीवहि | अक्रीणीमहि |
| द्वि० पु० | अक्रीणीथाः | अक्रीणाथाम् | अक्रीणीध्वम् |
| तृ० पु० | अक्रीणीत | अक्रीणाताम् | अक्रीणत |

### विध्यर्थ.

**परस्मैपद.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | क्रीणीयाम् | क्रीणीयाव | क्रीणीयाम |
| द्वि० पु० | क्रीणीयाः | क्रीणीयातम् | क्रीणीयात |
| तृ० पु० | क्रीणीयात् | क्रीणीयाताम् | क्रीणीयुः |

परस्मैपदी विध्यर्थाचे प्रत्यय **अपित्** असून व्यंजनादि आहेत, म्हणून **ना** च्यास **नी** आदेश झाला. (नि० १ पृ० २८ पहा.)

आत्मनेपद.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | क्रीणीय | क्रीणीवहि | क्रीणीमहि |
| द्वि० पु० | क्रीणीथाः | क्रीणीयाथाम् | क्रीणीध्वम् |
| तृ० पु० | क्रीणीत | क्रीणीयाताम् | क्रीणीरन् |

प्र० पु० प्रथम भूत मन्थ् प० प० अमथ्नाम्–अमथ्नीव–अमथ्नीम.

( पृ० ३१ टीप † पहा. )

" " " " लू प० प० अलुनाम्–अलुनीव–अलुनीम.

( पृ० ३२ टीप * पहा. )

" " " " लू आ० प० अलुनि–अलुनीवहि–अलुनीमहि, इ०.

---

कार्तिक्येकादश्यां कथयत कान्पदार्थानाश्नीत ।

क्व तानि वस्त्राणि यानि त्वमक्रीणीथाः ।

रे परिचारक किमर्थमद्य भूमिं कटैर्नास्तृणाः ।

यज्ञांस्तन्वाना वयं बहून् पशून् यूपे देवेभ्योऽबध्नीम ।

तस्मिन् देशे मया सार्धं योद्धुं बहवो भटा आगतास्तानहमेकाकी शस्त्रास्त्रैरमृद्नाम् ।

न कन्यायाः शुल्कं गृह्णीयादिति शास्त्रप्रतिषेधे सत्यपि केचिदुदरंभरयो ब्राह्मणा गृह्णन्त्येव ।

दमयन्त्याः स्वयंवरकाले बहवो राजानो मामियं वृणीत मामियं वृणीतेति मन्यमानाः कुण्डिनपुरमागता रङ्गं प्राविशन् । नलं बुवूर्षुर्दमयन्ती रङ्गागतान्नृपान्प्रेक्षमाणा नलतुल्याकृतीन्पञ्च पुरुषानपश्यत् । ततः संदेहान्नाभ्यजानान्नलं नृपम् । तेषां चत्वारो नलरूपधारिण इन्द्रादयो देवा इति ज्ञात्वाभाषत । कथं देवाञ्जानीयां कथं च नलं नृपं बोधेयम् । यदा सा देवाञ्शरणं गता तदा ते स्वीयानि रूपाण्याविरकुर्वन् । पश्चान्नलं नृपं दमयन्त्यवृणीत । अनन्तरं देवानां कोपं प्रतिकर्तुं तावुभौ स्तुतिभिस्तानप्रीणीताम् । ततो देवा नलं वरैरन्वगृह्णन् ।

**यत्कृतेऽरीन् व्यगृह्णीम समुद्रमतराम च ।**
**सा हतेति वदन् राममुपातिष्ठन्मरुत्सुतः ॥**

---

१ मंदारपर्वताची रवी करून देव समुद्राचें मंथन करिते झाले ( **मन्थ्** ).

२ मी आपलीं पुस्तकें व सामान विकता झालों ( **वि+क्री** ), परंतु पुष्कळ पैसे मिळाले नाहींत.

३ इन्द्र आपल्या वृत्र नांवाच्या शत्रूचें चूर्ण करिता झाला ( **मृद्** ). तो ब्राह्मण होता, म्हणून इन्द्र ब्रह्महत्या करिता झाला. तीपासून आम्ही त्यास शुद्ध न करिते झालों ( **पू** ).

४ तूं ऋषींचीं वचनें केव्हां एकत्र करिता झालास ( **ग्रन्थ्** ) ?

५ जर तूं देवांस आपल्या भक्तीनें संतुष्ट ( **प्री** ) करशील तर ते तुजवर कृपा करतील ( **अनु+ग्रह्** ).

६ रामलक्ष्मण सीतेसहित ह्या वनांत राहिले आणि फळें व मुळें खाते झाले (**अश्**).

७ मीं असें करूं नको म्हणून सांगितलें असतांही * तूं बागेंत देंठांपासून फुलें कां तोडता ( **प्र+वि+लू** ) झालास ?

८ जर मीं गोविंदाचीं पुस्तकें घेतलीं ( **ग्रह्** ) तर शिक्षक मला रागें भरेल.

९ विराटाच्या देशांत पांडव एक वर्षपर्यंत † राहिले हें तुम्हांस माहित नव्हतें काय ( **ज्ञा** ) ?

---

# शब्दकोश ६.

## नवम गणांतील धातु.

**क्री** उप० **वि** ‡ आ० प० विकणें.

**ग्रह्** उप० **अनु**, कृपा करणें, आगत-स्वागत करणें; **वि+ग्रह्**, युद्ध करणें.

**ज्ञा** उप० **अभि**, ओळखणें.

**मन्थ्** प० प० घुसळणें.

**मृद्** प० प० कुटणें, कुट्टन चूर करणें, चूर करणें.

---

* येथें सन् षष्ठी योजा. (अनादर गम्यमान असतां सतिसप्तमीच्या जागीं सन् षष्ठी ही योजितात; "मीं असें करूं नको म्हणून सांगितलें असतां" ह्याबद्दल निवारयतोऽपि मम असें योजावें. )

† पृ० २० टीप* पहा.

‡ क्री ह्या धातूमागें परि, वि अथवा अव हा उपसर्ग असतां तो आत्मनेपदीच असतो.

**इन्द्रादि** पु० ( **इन्द्र** आणि **आदि** प्रथम, इन्द्रप्रमुख ) इन्द्र आणि इतर.

**उदरम्भरि** वि० ( **उदर** न० पोट, **भृ** भरणें ) उदरभरण करणारा, आपल्याच पोटाकडे ज्याचें लक्ष असा.

**एकाकिन्** वि० एकटा.

**कट** पु० चटई.

**कार्तिक्येकादशी** स्त्री० ( **कार्तिकी** स्त्री० कार्तिकमासासंबंधी, **एकादशी** स्त्री० अकरावी ) कार्तिकाचा अकरावा दिवस.

**कुण्डिनपुर** न० एका शहराचें नांव, विदर्भदेशाची अ० वऱ्हाड प्रांताची राजधानी.

**कोप** पु० राग.

**चत्वारः** ( पु० संख्याबोधक प्रथमा बहुवचनांत ) चार.

**दमयन्ती** स्त्री० एका स्त्रीचें नांव, नलाची बायको.

**नलतुल्याकृति** वि० ( **नल** पु०, **तुल्य** वि० सारखी, **आकृति** स्त्री० आकार ) नलासारख्या आकृतीचा.

**नलरूपधारिन्** ( **नल**, **रूप** न० आकार आणि **धारिन्** वि० धरणारा ) ज्यानें नलाचें रूप घेतलें आहे असा.

**पञ्च** ( प्रथमेचें व द्वितीयेचें बहुवचन ) पांच.

**परिचारक** पु० सेवक.

**भट** पु० योद्धा.

**मरुत्सुत** पु० वायुपुत्र, मारुति, शूर वानर रामभक्त.

**यत्कृते** अ० जिच्याकरितां.

**रङ्ग** पु० रंगभूमि, सभा.

**रङ्गागत** वि० सभेंत आलेला.

**रूप** न० आकृति.

**वुवूर्षु** वि० वरण्याची इच्छा करणारी.

**शस्त्रास्त्र** न० सर्व जातींचीं शस्त्रें.

**शास्त्रप्रतिषेध** ( **शास्त्र** न० धर्मशास्त्र, **प्रतिषेध** पु० निषेध ) धर्मशास्त्रांत सांगितलेला निषेध.

**शुल्क** पु० न० नवरी विकत घेण्याकरितां तिच्या आईबापांस द्रव्य देतात तें.

**संदेह** पु० संशय.

**सार्धम्** अ० (तृतीयांताशीं योजितात) सह, बरोबर.

**स्था** उप० **अव**, राहणें, वस्ती करणें; **उप+स्था**, जवळ जाणें.

**स्वयंवरकाल** पु० ( **स्वयंवर** पु० स्वतः वर पसंत करणें, **काल** पु० वेळ) स्वतः वर पसंत करण्याची वेळ.

---

इन्द्राचा शत्रु **वृत्र** पु०.

दैंठ **बंधन** न०.

ब्रह्महत्या **ब्रह्महत्या** स्त्री०.

भक्ति **देवनिष्ठा** स्त्री०, **भक्ति** स्त्री०.

मूळ **मूल** न०.

रवि **मन्थनदण्ड** पु०, **मन्थान** पु०.

रागें भरणें **निर्+भर्त्स्** द० ग० आ० प०; **प्रति+आ+दिश्** ष० ग०.

वचन **उक्ति** स्त्री०, **वचन** न०.

विराट **विराट** पु० (एका राजाचें नांव).

सामान **गृहोपस्कर** पु०.

---

# सप्तमः पाठः ।

## द्वितीय गण.

### वर्तमान व आज्ञार्थ.

१ ह्या गणास विकरण नाहीं; धातूसच प्रत्यय लागतात.

**या** द्वि० ग० प० प० 'जाणें.'

**वर्तमान.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **यामि** | **यावः** | **यामः** |
| द्वि० पु० | **यासि** | **याथः** | **याथ** |
| तृ० पु० | **याति** | **यातः** | **यान्ति** |

**आज्ञार्थ.**

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **यानि** | **याव** | **याम** |
| द्वि० पु० | **याहि** | **यातम्** | **यात** |
| तृ० पु० | **यातु** | **याताम्** | **यान्तु** |

ह्या धातूंत कांहीं फेरफार होत नाहीं; केवळ प्रत्यय लागून रूपें होतात. **स्ना, रा, ला, पा** 'रक्षण करणें', **ख्या, मा, भा, प्सा, श्रा,** आणि **दा** 'कापणें', हे धातु ह्याचप्रमाणें चालतात. आकारान्त धातूंशिवाय ह्या गणांतील बहुतेक धातु अनियमित प्रकारानें चालतात. त्यांपैकीं कित्येकांच्या विशेषांविषयीं लिहितों.

२ **अपित्** प्रत्यय पुढें असतां **अस्** धातूंतील **अ**चा लोप होतो; जसें-**स्तः** तृ० पु० द्विव०, **सन्ति** तृ० पु० ब० व०.

**अस्** प० प० 'असणें.'

**वर्तमान.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अस्मि** | **स्वः** | **स्मः** |
| द्वि० पु० | **असि** | **स्थः** | **स्थ** |
| तृ० पु० | **अस्ति** | **स्तः** | **सन्ति** |

नियमाप्रमाणें द्वितीय पुरुषाच्या एकवचनाचें रूप **अस्सि** असें झालें पाहिजे होतें, परंतु तेथें एका **स्**चा लोप होतो.

अस् प० प० 'असणें.'

**आज्ञार्थ.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **असानि** | **असाव** | **असाम** |
| द्वि० पु० | **एधि** | **स्तम्** | **स्त** |
| तृ० पु० | **अस्तु** | **स्ताम्** | **सन्तु** |

आज्ञार्थी प्रथम पुरुषाचे सर्व प्रत्यय **पित्** आहेत म्हणून **अस्** धातूंतील **अ**चा लोप न होतां **असानि, असाव, असाम** अशीं रूपें झालीं. आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचन नियम सोडून **एधि** असें होतें.

स्थलविशेषीं ह्या धातूस आत्मनेपदी प्रत्यय लागून जीं रूपें होतात तीं अशीं:—

अस् आ० प० 'असणें.'

**वर्तमान.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **हे** | **स्वहे** | **स्महे** |
| द्वि० पु० | **से** | **साथे** | **ध्वे** |
| तृ० पु० | **स्ते** | **साते** | **सते** |

येथें सर्व प्रत्यय **अपित्** आहेत म्हणून अचा लोप झाला. प्रथम पुरुषाच्या एकवचनांत **स्**चा **ह्** होतो, आणि खालीं लिहिलेल्या नियमाप्रमाणें **ध्वे**पूर्वी **स्**चा लोप होतो.

( १ ) **धादि** प्रत्ययापूर्वी **स्**चा लोप होतो.

३ **शी** 'निजणें' ह्या धातूस सर्व पुरुषीं व सर्व वचनीं गुण होतो. ह्या धातूस तृतीय पुरुषाच्या ब० व० प्रत्ययापूर्वी **र्** हा वर्ण जोडावा.

**शी** आ० प०

**वर्तमान.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **शये** | **शेवहे** | **शेमहे** |
| द्वि० पु० | **शेषे** | **शयाथे** | **शेध्वे** |
| तृ० पु० | **शेते** | **शयाते** | **शेरते** |

### आज्ञार्थ.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **शयै** | **शयावहै** | **शयामहै** |
| द्वि० पु० | **शेष्व** | **शयाथाम्** | **शेध्वम्** |
| तृ० पु० | **शेताम्** | **शयाताम्** | **शेरताम्** |

**शी** ह्याचें **शे** असें रूप होऊन स्वरादि प्रत्यय पुढें असतां **शय्** असें होतें, आणि **शये, शयाथे** इ० रूपें होतात. **अते** आणि **अताम्** यांस **र्** लागल्या-कारणानें **रते** आणि **रताम्** अशीं रूपें होतात.

४ धातूच्या शेवटच्या ऱ्हस्व उकारास व्यंजनादि **पित्** प्रत्यय पुढें असतां **वृद्धि** होते, म्हणजे उकारास **औ** असा आदेश होतो.

(२) धातूच्या शेवटच्या ऱ्हस्व अथवा दीर्घ इकारास व उकारास स्वरादि **अपित्** प्रत्यय पुढें असतां **इय्** आणि **उव्** हे आदेश यथाक्रम होतात.

### नु प० प०

### वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **नौमि** | **नुवः** | **नुमः** |
| द्वि० पु० | **नौषि** | **नुथः** | **नुथ** |
| तृ० पु० | **नौति** | **नुतः** | **नुवन्ति** |

### आज्ञार्थ.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **नवानि** | **नवाव** | **नवाम** |
| द्वि० पु० | **नुहि** | **नुतम्** | **नुत** |
| तृ० पु० | **नौतु** | **नुताम्** | **नुवन्तु** |

**मि, सि** इत्यादि व्यंजनादि **पित्** प्रत्यय पुढें आले म्हणून **नौमि, नौषि** इत्यादि रूपें झालीं. आज्ञार्थी प्रथम पुरुषाचे तीनही प्रत्यय **पित्** आहेत, परंतु ते स्वरादि असल्यानें **नुचा नौ** झाला नाहीं. **नवानि, नवाव,** इ० रूपांत **नुं**तील **उ**चा गुण ( पृ० १३ नि० ६ प्रमाणें ) होऊन **नो** झाला. त्यापुढें स्वरादि प्रत्यय आला म्हणून **नव्** असें झालें. **यु** "जोडणें" हा धातु याचप्रमाणें चालवावा.

५ **स्तु** आणि **रु** ह्या धातूंपुढील व्यंजनादि प्रत्ययास विकल्पें **ई** आगम होतो.

**स्तु** प० प० 'स्तुति करणें.'

**वर्तमान.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **स्तौमि-स्तवीमि** | **स्तुवः-स्तुवीवः** | **स्तुमः-स्तुवीमः** |
| द्वि० पु० | **स्तौषि-स्तवीषि** | **स्तुथः-स्तुवीथः** | **स्तुथ-स्तुवीथ** |
| तृ० पु० | **स्तौति-स्तवीति** | **स्तुतः-स्तुवीतः** | **स्तुवन्ति** |

**ति** आणि अशा दुसऱ्या **पित्** प्रत्ययांपूर्वी उकारास वृद्धि होते, ( नि० ४ पृ० ४० पहा ). परंतु पांचव्या नियमाप्रमाणें प्रत्ययांपूर्वी **ई** आली म्हणजे तो स्वरादि प्रत्यय होतो, या कारणास्तव **स्तु** ह्यांतील उकारास वृद्धि न होतां गुण होऊन **स्तुचें स्तो** असें झालें. **ईति** हा स्वरादि प्रत्यय आला म्हणून **स्तव्** होऊन **स्तवीति** असें रूप झालें. व्यंजनादि **अपित्** प्रत्ययापूर्वी ज्या वेळेस **ई** येते त्या वेळेस धातूच्या अंत्य उचा **उव्** होतो ( नि० ( २ ) पृ० ४० पहा ). जसें:—**स्तुवीतः**; **अन्ति** हा प्रत्यय व्यंजनादि नाहीं यास्तव **ई** आगम झाला नाहीं, म्हणून याचें एकच रूप झालें.

वर सांगितलेल्या नियमाप्रमाणें आज्ञार्थाचीं रूपें करावीं.

**स्तौतु-स्तवीतु** तृ० पु० ए० व०; **स्तुहि-स्तुवीहि** द्वि० पु० ए० व०; **स्तवानि** प्र० पु० ए० व०, **स्तवाव** प्र० पु० द्विव०, इ०.

आत्मनेपदी रूपें याचप्रमाणें करावीं. **स्तुते-स्तुवीते** तृ० पु० ए० व०, **स्तुवाते** तृ० पु० द्विव०, **स्तुवते** तृ० पु० ब० व०.

रु धातूचीं रूपें याचप्रमाणें करावीं.

६ ब्रू धातू पुढील व्यंजनादि **पित्** प्रत्ययास **ई** आगम होतो.

ब्रू प० पं० 'बोलणें.' वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **ब्रवीमि** | **ब्रूवः** | **ब्रूमः** |
| द्वि० पु० | **ब्रवीषि** | **ब्रूथः** | **ब्रूथ** |
| तृ० पु० | **ब्रवीति** | **ब्रूतः** | **ब्रुवन्ति** |

शेवटलें रूप नि० (२) पृ० ४० प्रमाणें झालें. आत्मनेपदी रूपें-**ब्रूते** तृ० पु० ए० व०, **ब्रुवाते** तृ० पु० द्विव०, **ब्रुवते** तृ० पु० ब० व०. आज्ञार्थ परस्मैपदी प्र० पु० **ब्रवाणि**, इ०.

७ खालीं लिहिलेलीं वर्तमान काळाचीं पांच अनियमित रूपें एका गौण धातूचीं आहेत. त्या धातूचा अर्थ 'बोलणें' असा आहे. तृ० पु० ए० व० **आह**, तृ० पु० द्विव० **आहतुः**, तृ० पु० ब० व० **आहुः**; द्वि० पु० ए० व० **आत्थ**, द्वि० पु० द्विव० **आहथुः**.

८ सू 'प्रसवणें' आ प० याचे आज्ञार्थी प्रथम पुरुषाचे सर्व प्रत्यय **अपित्** आहेत. **सुवै** प्र० पु० ए० व०, **सुवावहै** प्र० पु० द्विव०, **सुवामहै** प्र० पु० ब० व०, **सूष्व** द्वि० पु० ए० व०. वर्तमान काळाचीं **सूते, सुवाते, सुवते,** इत्यादि रूपें नियमाप्रमाणें होतात.

९ **रुद्, स्वप्, श्वस्, अन्** व **जक्ष्** ह्या धातूंपुढील यकारादि प्रत्यय शिवाय करून कोणत्याही व्यंजनादि प्रत्ययामागें **इ** आगम होतो. जसें-**रोदिमि, रुदिवः**, इ०.

रुद् प० प० 'रडणें.' वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **रोदिमि** | **रुदिवः** | **रुदिमः** |
| द्वि० पु० | **रोदिषि** | **रुदिथः** | **रुदिथ** |
| तृ० पु० | **रोदिति** | **रुदितः** | **रुदन्ति** |

ह्याच नियमाप्रमाणें आज्ञार्थ-**रुदिहि** द्वि० पु० ए० व०, **रोदानि** प्र० पु० ए० व०. याचप्रमाणें दुसरे धातु चालवावे. **जक्ष्** धातूस तृ० पु० ब० व० प्रत्यय लावितांना **न्**चा लोप होतो; जसें-**जक्षति**. ह्याविषयीं पुढें सांगण्यांत येईल.

१० **इ** 'जाणें' प० प० हा धातु पृ० ४० नि० (२) ह्यास अपवादक आहे. स्वरादि **अपित्** प्रत्यय पुढें आला असतां **इ**चा **य्** होतो.

इ प० प० 'जाणें.' वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **एमि** | **इवः** | **इमः** |
| द्वि० पु० | **एषि** | **इथः** | **इथ** |
| तृ० पु० | **एति** | **इतः** | **यन्ति** |

आज्ञार्थ प्र० पु० **अयानि**, इ०.

अधि+इ आ० प० 'अभ्यास करणें.' वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अधीये** | **अधीवहे** | **अधीमहे** |
| द्वि० पु० | **अधीषे** | **अधीयाथे** | **अधीध्वे** |
| तृ० पु० | **अधीते** | **अधीयाते** | **अधीयते** |

शेवटच्या तीन रूपांतून **अधि** हा उपसर्ग निराळा केला असतां, **इते, इयाते, इयते,** अशीं रूपें राहातात. ह्यांत **इ** ह्या धातूपुढें **आते** आणि **अते** हे स्वरादि प्रत्यय असल्यामुळें इकारास **इय्** असा आदेश झाला आहे असें दिसून येतें. ह्याप्रमाणें इतर रूपांत जाणावें.

प्रथम पुरुषीं आज्ञार्थाचीं रूपें **अध्ययै, अध्ययावहै, अध्ययामहै.** ह्यांत इकारास गुण **ए** होऊन **अय्** झाला. त्यास **ऐ** प्रत्यय जोडून **अयै** इत्यादि रूपें झालीं.

**आस्** आ० प० 'बसणें.' आज्ञार्थ.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **आसै** | **आसावहै** | **आसामहै** |
| द्वि० पु० | **आस्स्व** | **आसाथाम्** | **आध्वम्** |
| तृ० पु० | **आस्ताम्** | **आसाताम्** | **आसताम्** |

**ध्वम्** पुढें असल्यानें **स्**चा लोप झाला. पृ० ३९ नि० ( १ ) पहा.

---

**अस्मिञ्जगति ये सन्ति कवयस्तान्नमस्कृत्यैतं ग्रन्थमारभे ।**

**पृच्छ बालकः किं रोदिति ।**

**हे कृपानिधे जगदात्मंस्त्वां ब्रह्मादयः सर्वे देवाः स्तुवन्त्यृषयश्च सर्वे ।**

**ईदृशं त्वां शरणमुपैमि । प्रसीद पाहि मां नरकाद्घोरात् ।**

**अस्यां पाठशालायां बालकाः काव्यमधीयते ।**

**तरुषु मधुरं रुवन्ति पक्षिणो वायुश्च शीतलो वाति तस्माद्रम्यमिदं स्थानम् । अत्रैव वृक्षमूले शिलामध्यासामहै* ।**

**भो भोः पौराः क्व गतोऽस्माकं महाराजः । किं ब्रूथ । देव्या सह क्रीडाशैलमध्यास्त इति । एवमस्तु । अहं तत्र गच्छामि सर्वं च वृत्तं कथयामि ।**

**अकिञ्चनो वितृष्णश्च सुखं स्वपिति रात्रौ ।**

**ये प्राणन्ति जीवन्ति च तेषां जडानां चादिहेतुं मे ब्रूहि ।**

---

*__शी, आस्__ व __स्था__ हे धातु __अधि__ उपसर्गपूर्वक असल्यास ज्या स्थळीं क्रिया घडते त्या स्थलाचा वाचक शब्द द्वितीयान्त योजावा.

वत्से समाश्वसिहि समाश्वसिहि। अयमागतस्तव पुत्रको यं त्वं मृतं मन्यसे।

गोविन्दः स्मितेनात्मनः कोपमपह्नुते।

अश्विनौ मदनमपि सौन्दर्येऽतिशयाते।

रात्रावुदयते चन्द्रो दिवोदयति भास्करः।
उदेति स सदैवोग्रं नोदीयन्ते च विद्विषः॥
प्राणिनामुपकाराय प्राणिति प्रियदर्शनः।
प्राण्यते पुण्यपुरुषः श्रेयसे यशसे च सः॥
स स्तौति भास्करं भक्त्या नौति पापहरं हरम्॥
एधि* कार्यकरस्त्वं मे गत्वा प्रवद राघवम्।
दिदृक्षुर्मैथिली राम पश्यतु त्वाविलम्बितम्॥
ते जन्मभाजः खलु जीवलोके येषां मनो ध्यायति विश्वनाथम्।
वाणी गुणान्स्तौति कथां शृणोति श्रोत्रद्वयं ते भवमुत्तरन्ति॥
† धर्मदूषण नूनं त्वं नाजाना नाशृणोरिदम्।
निराकृत्य यथा बन्धूँल्लघुत्वं यात्यसंशयम्॥
‡ भूमौ शेते दशग्रीवो महार्हशयनोचितः।
नेक्षते विह्वलं मां च न मे वाचं प्रयच्छति॥
समाश्वसिमि केनाहं कथं प्राणिमि दुर्गतः।
लोकत्रयपतिर्भ्राता यस्य मे स्वपिति क्षितौ।
रोदिम्यनाथमात्मानं बन्धुना रहितस्त्वया।
प्रमाणं नोपकाराणामवगच्छामि यस्य ते॥
आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः।
शेते निपद्यमानस्य चराति§ चरतो भगः॥
गाधोदके मत्स्य इव सुखं विन्देत कस्तदा।
अनवाप्तेषु कामेषु मृत्युरभ्येति मानवम्॥

---

* ह्या पद्यांत सीतेचें मारुतीशीं भाषण आहे.

† ह्या पद्यांत इन्द्रजिताचें बिभीषणाशीं भाषण आहे.

‡ ह्या व पुढच्या दोन पद्यांत बिभीषणाचा रावणाविषयीं शोक आहे.

§ चरातिचें चराति हें रूप नियम सोडून केलें असावें, अथवा छंदासाठीं र् दीर्घ केला असावा.

जातमेवान्तकोऽन्ताय जरा चान्वेति देहिनम् ।
अनुषक्ता द्वयेनैते भावाः स्थावरजङ्गमाः ॥
निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु
लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् ।
अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा
न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥

---

१ गोविंदाच्या वचनावर आम्ही विश्वास ठेवीत नाहीं ( **वि+श्वस्** ).

२ जे निंदेस पात्र आहेत त्यांची तुम्ही स्तुति करितां ( **स्तु** ).

३ गोमतीच्या कांठीं पक्षी निजतात ( **शी** ).

४ हे मुला, रडूं नको ( **रुद्** ); ही तुझी आई आपल्या हातांत खाऊ घेऊन येत आहे ( **अभि+आ+इ** ).

५ ह्या दोन गाई प्रतिवर्षी वासरें वितात ( **सू** ).

६ जनक रामाचा सासरा होता हें तुला ठाऊक नाहीं ( **अव+इ** ) काय ?

७ शाळेंत तूं व तुझा भाऊ कोणता विषय शिकतां ( **अधि+इ** आ० प० ) ?

८ मनुष्यें पर्वतांच्या शिखरांवर मोठ्या श्रमानें श्वासोच्छ्वास करितात ( **नि+श्वस्** ).

९ या ठिकाणचे लोक फार गरीब आहेतसें मला वाटतें ( **भा** ).

१० गरीब आणि अनाथ ह्यांस पीडा देतो असा कोणी मनुष्य आहे काय ( **प्र+अन्** ) ?

११ आळशी मनुष्य फार वेळ निजतो ( **स्वप्** ).

१२ खऱ्या देवास सोडून जे दुसऱ्यास भजतात ( **उप+आस्** ) त्यांस मोक्ष मिळत नाहीं.

१३ घोडा हें जनावर कशा प्रकारचें असतें हें आम्हांस सांगा ( **ब्रू** ).

---

## शब्दकोश. ७

### द्वितीय गणांतील धातु.

**अन्** प० प० श्वासोच्छ्वास करणें; **प्र+अन्** श्वासोच्छ्वास करणें, जिवंत असणें.

**अस्*** प० प० असणें.

**आस्** आ० प० बसणें; **अधि+आस्** बसणें; **उप+आस्** भजणें, उपासना करणें.

---

* अस् आणि ब्रू ह्या धातूंचीं रूपें फक्त सार्वधातुकप्रकारामध्यें होतात.

**इ** प० प० जाणें; **शरणम्+उप+इ** शरण जाणें; **अभि+इ** जवळ जाणें; **आ+इ** येणें; **अव+इ** जाणणें; **उद्+इ** उदय पावणें, भरभराट होणें.

**इ** उप० **अधि,** आ० प० अभ्यास करणें.

**ख्या** प० प० सांगणें.

**जक्ष्** प० प० खाणें.

**दा** प० प० कापणें.

**नु** प० प० वाखाणणें, स्तुति करणें.

**पा** प० प० पालन करणें, रक्षण करणें.

**प्सा** प० प० खाणें.

***ब्रू** उ० प० बोलणें.

**भा** प० प० दिसणें, वाटणें, प्रकाशणें.

**या** प० प० जाणें.

**यु** प० प० जोडणें.

**रा** प० प० देणें.

**रु** प० प० ध्वनि करणें, ओरडणें.

**रुद्** प० प० रडणें, शोक करणें.

**ला** प० प० देणें अथवा घेणें.

**वस्** आ० प० वस्त्र नेसणें, पोशाक करणें.

**वा** प० प० वाहणें ( वारा इत्यादिकांचें).

**शी** आ० प० झोंप घेणें; **अति+शी** मागें टाकणें.

**श्रा** प० प० शिजविणें.

**श्वस्** प० प० दम टाकणें; **नि+श्वस्** श्वासोच्छ्वास करणें; **वि+श्वस्** भरंवसा ठेवणें; **सम्+आ+श्वस्** धैर्य धरणें, शांत होणें.

**सू** आ० प० विणें, प्रसवणें.

**स्तु** उ० प० स्तुति करणें.

**स्ना** प० प० स्नान करणें.

**स्नु** प० प० पाझरणें, स्रवणें.

**स्वप्** प० प० झोंप घेणें.

**ह्नु** आ० प० गुप्त ठेवणें; **अप** अथवा **नि+ह्नु** गुप्त ठेवणें.

---

**अकिञ्चन** वि० (अ अभावार्थी, **किञ्चन** न० कांहीं ) ज्यापाशीं कांहीं नाहीं असा, दरिद्री.

**अण्** च० ग० आ० प०, उप० **प्र,** श्वासोच्छ्वास करणें, जिवंत असणें.

**अनाथ** वि० आश्रयहीन, दुबळा.

**अनुषक्त** ( अनु आणि **सक्त-सञ्ज्** धातूचें भू० का० धा० क० ) अनुसरलेला.

**अन्त** पु० शेवट, नाश.

**अन्तक** पु० यम.

**अय्** प्र० ग० आ० प०, उप० **उद्,** उदय पावणें.

**अवलम्बितम्** क्रि० वि० लौकर, सत्वर.

**अश्विन्** पु० ( हा शब्द नेहमीं द्विवचनांत योजितात ) अश्विनीकुमार, आवळे जावळे देवांचे वैद्य.

**असंशयम्** क्रि० वि० निश्चयानें.

**आदिहेतु** पु० मूळ कारण.

---

* ४५ व्या पृष्ठांतील टीप * पहा.

**आसीन** वि० बसणारा. ( वर्त० का० धा० आस् धातूचें ).

**आहव** पु० युद्ध. [ पावणें.

**इ** प्र० ग० प० प०, उप० **उद्**, उदय

**ई** च० ग० आ० प०, उप० **उद्**, उदय पावणें, वर जाणें.

**उग्रम्** क्रि० वि० भयंकरपणें, जोरानें.

**उपकार** पु० उपकृति, दुसऱ्याचें बरें करणें.

**ऊर्ध्व** वि० उभा, वरचा.

**कार्यकर** वि० कार्य करणारा ( दुसऱ्याचें ).

**काव्य** न० कविता, कवन.

**कृ** उप० **नमस्**, नमस्कार करणें. [देणें.

**कृ** उप० **निस्+आ**, दूर करणें, सोडून

**कृपानिधि** पु० ( **कृपा** स्त्री० दया, **निधि** पु० ठेवा) दयेचा ठेवा, फार दयाळू.

**क्रीडाशैल** पु० ( **क्रीडा** स्त्री० करमणूक, **शैल** पु० पर्वत ) क्रीडेकरितां जो पर्वत तो, उच्चस्थल.

**क्षिति** स्त्री० पृथ्वी, जमीन.

**खलु** अ० निश्चयार्थी.

**गाधोदक** न० ( **गाध** वि० उथळ, **उदक** पाणी ) उथळ पाणी.

**गोमती** स्त्री० एका नदीचें नांव.

**घोर** वि० भयंकर.

**चल्** उप० **प्र** आणि **वि**, दूर करणें, एकीकडे करणें.

**जगदात्मन्** पु० ( **जगत्** न० जग, **आत्मन्** पु० आत्मा ) जगाचा आत्मा.

**जड** वि० निर्जीव, अचेतन.

**जन्मभाज्** वि० जन्मलेला; पु० मनुष्य.

**जीवलोक** पु० प्राण्यांचा लोक, मृत्युलोक.

**दरिद्र** वि० गरीब, दरिद्री.

**दिदृक्षु** वि० पाहाण्यास इच्छिणारा.

**दिवा** क्रि० वि० अ० दिवसास.

**दुर्गत** वि० दुःखी, विपद्ग्रस्त.

**देहिन्** पु० शरीरी, मनुष्य.

**द्वय** न० दोन वस्तूंचा समुदाय.

**धर्मदूषण** वि० योग्य रीत सोडून वागणारा.

**ध्यै** प्र० ग० प० प० विचार करणें.

**नरक** पु० आणि न० नरक, निरय.

**निपद्यमान** ( **नि+पद्** धातूचें वर्त० का० धा० ) पडून राहणारा.

**नीतिनिपुण** वि० ( **नीति** स्त्री० राजनीति अ० शहाणपण, **निपुण** वि० निष्णात ) राजनीतींत निष्णात, उत्तम शहाणा.

**नूनम्** अ० निश्चयानें.

**न्याय्य** वि० योग्य.

**पथः** ( **पथिन्** पु० ह्याचें पंचमीचें एकवचन ) मार्गापासून.

**पद** न० पाऊल.

**पापहर** वि० पाप दूर करणारा.

**पुण्यपुरुष** पु० सदाचारी मनुष्य.

**प्रमाण** न० माप, विस्तार.

**प्रियदर्शन** वि० ज्याकडे पाहिलें असतां संतोष होतो असा.

**ब्रह्मन्** न० ब्रह्म.

**ब्रह्मादि** ( **ब्रह्मन्** पु०, **आदि** प्रथम ) ब्रह्मदेव आदिकरून.

**भग** पु० देव, भरभराट.
**भव** पु० संसार.
**भाव** पु० वस्तु, पदार्थ.
**भास्कर** पु० सूर्य.
**भिन्न** वि० निराळें.
**मधुरम्** क्रि० वि० गोड.
**महाराज** पु० मोठा राजा.
**महार्हशयनोचित** वि० ( **महार्ह** वि० मोठ्या किंमतीचें, **शयन** न० बिछाना, **उचित** वि० योग्य ) मोठ्या किंमतीच्या बिछान्यावर शयन करण्यास योग्य.
**मानव** पु० मनुष्य.
**मैथिली** स्त्री० मिथिलदेशाच्या राजाची मुलगी, सीता.
**यथेष्टम्** क्रि० वि० यथेच्छ.
**युगान्तर** न० ( **युग** न० कृत, त्रेता इ०; **अन्तर** दुसरें ) अन्य युग.
**रम्य** वि० मनोहर.
**रहित** वि० हीन, वियुक्त.
**राघव** पु० रघुवंशांतील पुरुष.
**लघुत्व** न० हलकेपणा.
**लोकत्रयपति** पु० ( **त्रय** न० तिहींचा समुदाय, **पति** पु० धनी ) स्वर्ग, मृत्यु व पाताळ ह्या तीन लोकांचा स्वामी.
**वत्सा** स्त्री० प्रिय मुलगी.
**वितृष्ण** वि० ( **वि** रहित, **तृष्णा** स्त्री० इच्छा ) निरिच्छ.
**विश्** उप० **सम्** आणि **आ,** शिरणें, आंत येणें.
**विश्वनाथ** पु० जगाचा स्वामी.
**विह्वल** वि० दुःखित, विकळ.
**वृक्षमूल** न० ( **वृक्ष** पु० झाड, **मूल** न० मूळ ) झाडाचें मूळ.
**वृत्त** न० घडलेली गोष्ट.
**शीतल** वि० थंड, गार.
**श्रोत्रद्वय** न० दोन कान.
**सद्** ( **सीद्** ) प्र० ग० प० प० बसणें; **प्र+सद्** प्रसन्न होणें.
**सायम्** अ० संध्याकाळीं.
**स्थावरजंगम** वि० ( **स्थावर** वि० न हालणारें, **जंगम** वि० हालणारें ) चराचर.
**स्मित** न० गालांत हंसणें.
**हर** पु० शिव.

---

अनाथ **निराश्रय** वि०.
आळशी **अलस** वि०. **तंद्रिल** वि०.
उंच **उच्च** वि०.
कशा प्रकारचें **कीदृश** वि०.
खरा देव, खरा **सत्यस्वरूप** वि०, देव **परमात्मन्** पु०.
खाऊ **मोदक** पु० न०.
गरीब **दीन** वि०.
घेऊन **गृहीत्वा.**
पात्र असणें **अर्ह्** प्र० ग० प० प०.
पीडा देणें **अप+कृ** अ० ग० अथवा **नि+कृ, पीड्** द० ग०.

प्रतिवर्षी **प्रतिसंवत्सरम्** अ०.
वचन **उक्ति** स्त्री०, **वचन** न०, **वचस्** न०.
वासरूं **वत्स** पु०.
विषय **विषय** पु०.
श्रम **कष्ट** न०, **असौकर्य** न०.
सासरा **श्वशुर** पु०.
ह्या ठिकाणचा **अत्रत्य** वि०.

---

# अष्टमः पाठः ।

## द्वितीय गण—( पुढें चालू. )

### प्रथम भूत अथवा अनद्यतन भूत व विध्यर्थ.

१. प्रथम भूतकाळीं आकारांत धातूंच्या तृतीय पुरुषीं बहुवचनीं क्रियापदाचा प्रत्यय विकल्पें **उस्** आहे. **उस्** प्रत्यय पुढें असतां धातूंच्या अंत्य स्वराचा लोप होतो.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अयाम्** | **अयाव** | **अयाम** |
| द्वि० पु० | **अयाः** | **अयातम्** | **अयात** |
| तृ० पु० | **अयात्** | **अयाताम्** | **अयान्-अयुः** |

येथें **उस्** प्रत्यय लावण्यापूर्वी **या** धातूंतील आचा लोप होऊन प्रथम भूतकाळाचा अ आगम झाल्यानें **अय्** झालें; नंतर **उस्** प्रत्यय होऊन **अय्+उस्=अयुः** असें झालें.

### विध्यर्थ.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **यायाम्** | **यायाव** | **यायाम** |
| द्वि० पु० | **यायाः** | **यायातम्** | **यायात** |
| तृ० पु० | **यायात्** | **यायाताम्** | **यायुः** |

विध्यर्थी प्रत्यय पूर्वी पृ० २३ नि० २ ह्यांत सांगितल्याप्रमाणें.

२. **अस्** धातूपुढील **स्** व **त्** ह्या प्रथम भूतकाळाच्या प्रत्ययांमागें **ई** आगम होतो.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **आसम्** | **आस्व** | **आस्म** |
| द्वि० पु० | **आसीः** | **आस्तम्** | **आस्त** |
| तृ० पु० | **आसीत्** | **आस्ताम्** | **आसन्** |
| विध्य० तृ० पु० | **स्यात्** | **स्याताम्** | **स्युः**, इ०. |

३. **रुद्**, **स्वप्**, **श्वस्**, **अन्** व **जक्ष्** ह्या धातूंपुढील प्रथम भूतकाळाच्या **स्** व **त्** ह्या प्रत्ययांस अ अथवा **ई** आगम होतो.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अरोदम्** | **अरुदिव** | **अरुदिम** |
| द्वि० पु० | **अरोदीः-अरोदः** | **अरुदितम्** | **अरुदित** |
| तृ० पु० | **अरोदीत्-अरोदत्** | **अरुदिताम्** | **अरुदन्** |

पृ० ४२ नि० ९ प्रमाणें **अरुदिताम्** इत्यादि रूपांत **इ** आगम झाला. **जक्ष्** धातूच्या तृ० पु० बहुवचनाचा प्रत्यय **उस्** याविषयीं पुढें सांगण्यांत येईल.

विध्यर्थी तृ० पु० **रुद्यात्** ए० व०, **रुद्याताम्** द्विव०, **रुद्युः** ब० व०.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **शी** | प्र० भू० तृ० पु० | **अशेत** | **अशयाताम्** | **अशेरत** |
| | विध्य० तृ० पु० | **शयीत** | **शयीयाताम्** | **शयीरन्** |

**शी**च्या गुणाविषयीं नि० ३ पृ० ३९ पहा आणि प्रत्ययांविषयीं नि० १ पृ० १९ व नि० ४ पृ० २४ पहा.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **स्तु** | प्र० भू० तृ० पु० | **अस्तौत्** / **अस्तवीत्** | **अस्तुताम्** / **अस्तुवीताम्** | **अस्तुवन्** | प० प० |
| | | **अस्तुत** / **अस्तुवीत** | **अस्तुवाताम्** | **अस्तुवत** | आ० प० |
| | विध्यर्थ तृ० पु० | **स्तुयात्** / **स्तुवीयात्** | **स्तुयाताम्** / **स्तुवीयाताम्** | **स्तुयः** / **स्तुवीयुः** | प० प० |
| | | **स्तुवीत** | **स्तुवीयाताम्** | **स्तुवीरन्** | आ० प० |

नि० ४ पृ० ४० प्रमाणें वृद्धि आणि नि० ५ पृ० ४० प्रमाणें विकल्पें **ई** आगम झाला.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ब्रू | प० प० | प्र० भू० तृ० पु० | **अब्रवीत्** | **अब्रूताम्** | **अब्रुवन्** |
| | आ०प० | प्र० भू० तृ० पु० | **अब्रूत** | **अब्रुवाताम्** | **अब्रुवत** |
| | प० प० | विध्य० तृ० पु० | **ब्रूयात्** | **ब्रूयाताम्** | **ब्रूयुः** |
| | आ०प० | विध्य० तृ० पु० | **ब्रुवीत** | **ब्रुवीयाताम्** | **ब्रुवीरन्** |

नि० ६ पृ० ४१ पहा.

**इ** प्र० भू० तृ० पु० **ऐत्** **ऐताम्** **आयन्**

**इ** हा स्वरादि धातु असल्यानें प्र० भू० काळीं **अ** बद्दल **आ** आगम होतो; म्हणजे धातूच्या मागें भूतकाळीं जो अ लागतो त्याबद्दल प्र० पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें.अजादि धातूपूर्वी **आ** होतो. **आ** ह्या आगमापुढें एकवचनीं **ए** आणि अन्य ठिकाणीं **इ** आली असतां वृद्धि होते. ( प्र० पु० पृ० ५७ पहा ). तृ० पु० ब० व० **इ+अन्** ह्यांचें **यन्** ( नि० १० पृ० ४२ पहा ) आणि **आ** आगम झाल्यानें **आयन्** असें झालें.

**अधि+इ** आ० प० प्र० भू० तृ० पु० **अध्यैत** **अध्यैयाताम्** **अध्यैयत.**

**आताम्** प्रत्ययापूर्वी **इ**चा **इय्** होऊन **इयाताम्** [ नि० ( २ ) पृ० ४० ], **आ** ह्या आगमाशीं मिळून **ऐयाताम्** आणि **अधि** या उपसर्गाशीं मिळून **अध्यैयाताम्** झालें. सर्व अजादि प्रत्ययांपूर्वी याचप्रमाणें होतें. विध्यर्थी तृ० पु० **अधीयीत** इ०.

**आस्** प्र० भू० द्वि० पु० **आस्थाः** **आसाथाम्** **आध्वम्.**

---

**अहरहः स्नात्वा संध्यामुपासीत ।**

**दशरथस्य भार्या कौसल्या चैत्रे नवम्यां तिथौ मध्याह्ने पुत्रं रामं प्रासूत ।**

**पारिक्षितस्य जनमेजयस्य सत्रं सारमेयोऽभ्यैत् ।**

**तत्र च जनमेजयस्यर्त्विजस्तमताडयन् ।**

**सोऽरोदीद्रुदंश्च मातरमयात् ।**

**मातापृच्छद्वत्स किं रोदिषि ।**

**सोऽब्रवीज्जनमेजयस्य सत्रमायं तत्र केऽपि मां प्राहरन् ।**

**मातावदत्किं त्वमकरोः । किं तानस्पृशः ।**

**सोऽभाषत नाहं मर्यादामत्यायम् ।**

**सरमा सत्रभूमिं गत्वोच्चैर्वाचाब्रूत ।**

अयं मे पुत्रको* न युष्मानस्पृशत्तत्किमेनमनपराधिनमताडयत ।

तां न कोऽपि प्रत्यभाषत । तेन क्रुद्धा सा देवशुनी सरमा जनमेजयं शप्त्वा गृहमयात् ।

द्रोणाच्छस्त्रविद्यामध्यैयत पाण्डवाः कुशलवौ वाल्मीकेरध्यैयातां कर्णश्च परशुरामादध्यैत ।

अभिवाद्य गुरुं ब्रूयादधीष्व † भगवन्निति ।

अनिषण्णे गुरौ नासीत ।

विदेहानुपयन्तो वयमेकरात्रं गङ्गायास्तीरेऽवसाम तत्र च पूर्वरात्रे नाना रम्याः कथाः कृत्वानन्तरमस्वपिम ।

ब्रूयात्क्षमी गभीरोऽसीति बत युधिष्ठिरं प्रभुं को न ।

कथमहं बली स्यां कथं मयि प्रजा विश्वस्युः कथं च प्रकृतयो मामुपासीरन्नित्येवं चिन्तयतस्तस्य रात्रिरयात् ।

ततः प्रामुह्यतां वीरौ राघवावरुतां तथा ।
उष्णं च प्राणितां दीर्घमुच्चैर्व्याक्रोशतां तथा ॥
यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महोदधौ ।
समेत्य च व्यपेयातां तद्वद्भूतसमागमः ॥

---

१ धृतराष्ट्राचे पुत्र पांडवांशीं द्यूत खेळते झाले आणि त्यांची सर्व संपत्ति हरण करिते झाले. मग पांडव वनांत गेले ( इ ).

२ तेथें पुष्कळ ब्राह्मण त्यांच्यामागें गेले ( अनु+इ ).

३ तेव्हां युधिष्ठिर त्यांस म्हणाला ( ब्रू ) कीं, आम्ही हल्लीं निर्धन आहों ( अस् ) व तुम्हांस अन्न देण्याला समर्थ नाहीं; तर तुम्हीं आमच्यामागें येऊं नये ( अनु+इ ).

४ आम्ही आपल्यासाठीं अन्न मिळविण्यास समर्थ आहों ( अस् ) असें ब्राह्मण म्हणाले ( ब्रू ).

५ नंतर युधिष्ठिर त्यांस न नाकारिता झाला ( प्रति+आ+ख्या ).

---

* क हा लघुत्व दर्शविणारा प्रत्यय आहे.

† अधि+इ ह्या धातूचा प्रयोग येथें शिकविणें ह्या अर्थी केला आहे.

६ परंतु ब्राह्मणांनीं आपल्या अन्नासाठीं खपावें असें तो इच्छित नव्हता (**इष्**).

७ नंतर मी काय करूं असें तो गुरूस विचारता झाला.

८ सूर्याचा स्तव कर ( **स्तु** ) असें तो सांगता झाला.

९ युधिष्ठिर नंतर सूर्यास स्तविता झाला ( **स्तु** ), आणि जेव्हां सूर्य प्रसन्न झाला तेव्हां त्यापासून त्यास ( युधिष्ठिरास ) एक पात्र मिळालें. त्यापासून त्यांना पाहिजे तितकें अन्न मिळे.

१० सगराच्या स्त्रिया पुष्कळ पुत्रांतें प्रसवत्या झाल्या ( **सू** ).

११ गेल्या रात्रीं मी झोंप न घेता झालों ( **स्वप्** ).

१२ गंगेच्या उदकांत तूं केव्हां स्नान करिता झालास ( **स्ना** ) ?

१३ कृष्ण मथुरेस गेला तेव्हां व्रजस्त्रिया रडत्या झाल्या ( **रुद्** ).

१४ मी काशीस न्यायशास्त्र शिकलों ( **अधि+इ** ).

१५ जर मी हस्तिनापुरास असतों ( **अस्** ) तर कपटद्यूतानें पांडवांची संपत्ती हरण करणें योग्य नाहीं असें धृतराष्ट्राला सांगतों ( **ब्रू** ).

१६ दुर्जनाच्या वचनावर कोणीहि विश्वास ठेवूं नये ( **वि+श्वस्** ).

---

# शब्दकोश ८.

**अनपराधिन्** वि० निरपराधी.
**अनिषण्ण** वि० न बसलेला.
**अहरहः** अ० प्रतिदिवशीं.
**आप्** पं० ग०, उप० **अव,** मिळविणें.
**इ** उप० **वि** आणि **अप,** निराळें होणें; **सम्+आ+इ** एकत्र होणें.
**उच्चैः** क्रि० वि० अ० मोठ्यानें.
**उष्णम्** क्रि० वि० ऊन, कढत.
**एकरात्र** न० एक रात्र.
**कर्ण** पु० सूर्याच्या एका मुलाचें नांव.
**क्षमिन्** वि० सहनशील, क्षमा करणारा.
**कुश** पु० (व) **लव** पु० रामाचे मुलगे.
**क्रुश्** प्र० ग० प० प०, उप० **वि** आणि **आ,** मोठ्यानें रडणें, शोक करणें.
**गभीर** वि० गंभीर, खोल.
**चैत्र** पु० चैत्र महिना.
**जनमेजय** पु० परिक्षिताचा मुलगा व अर्जुनाचा पणतू.
**तद्वत्** अ० त्याप्रमाणें.
**तिथि** पु० आणि स्त्री० तिथि, महिन्यापैकीं एक दिवस.
**दीर्घम्** क्रि० वि० फार वेळ, मोठ्यानें.
**देवशुनी** स्त्री० देवांची कुत्री.
**द्रोण** पु० एका व्यक्तीचें नांव.
**नवमी** स्त्री० नवमी तिथि.
**नाना** अ० भिन्न, अनेक.
**पारिक्षित** पु० परिक्षिताचा मुलगा.
**पूर्वरात्र** पु० ( **पूर्व** प्रथम, **रात्रि** स्त्री० **रात्र** ) रात्रीचा पहिला भाग.

**प्रकृति** स्त्री० प्रजा, प्रधानादि कामगार.

**बत** अ० खेदार्थी, विस्मयार्थी इ०.

**भाष्** प्र० ग० आ० प०, उप० **प्रति**, उत्तर देणें.

**भूतसमागम** पु० प्राण्यांचा समागम.

**मध्याह्न** पु० ( **मध्य** न० मध्यभाग, **अहन्** न० दिवस ) दोन प्रहर, दिवसाचा मध्यभाग.

**मर्यादा** स्त्री० हद्द, सीमा.

**महोदधि** पु० मोठा समुद्र.

**मुह्** उप० **प्र**, मूर्छित होणें.

**वाल्मीकि** पु० एका ऋषीचें नांव.

**विदेह** पु० एका देशाचें नांव. ( बहुवचनांत प्रयोग करावा ).

**शप्** प्र० ग० उ० प० शाप देणें; **शप्त्वा** अ० शाप देऊन.

**शस्त्रविद्या (शस्त्र व विद्या)** स्त्री० युद्धकला, युद्धज्ञान.

**सत्र** न० यज्ञ. **सत्रभूमि** यज्ञाची जागा, यज्ञमण्डप.

**सरमा** स्त्री० देवांच्या कुत्रीचें नांव.

**संध्या** स्त्री० सन्धिवेला ( सकाळीं, सायंकाळीं व मध्याह्नकाळीं ब्राह्मण प्रार्थना करितात ती ).

**सारमेय** पु० सरमेचा मुलगा, कुत्रा.

---

अन्न **अन्न** न०.

इच्छिणें **अप+ईक्ष्** प्र० ग० आ० प०.

कपटद्यूत **कपटद्यूत** न०.

खपणें **परिश्रमं कृ** अ० ग० उ० प०.

गुरु **उपाध्याय** पु०, **पुरोहित** पु०.

गेल्या रात्रीस **गतायां रात्रौ** स्त्री०.

दुर्जन **शठ** पु०, **खल** पु०, **दुरात्मन्** पु०.

द्यूत करणें **दिव्** च० ग०, **दीव्यति** तृ० पु० ए० व० वर्त० का०.

निर्धन **धनहीन** वि०.

पात्र **स्थाली** स्त्री०.

मथुरा स्त्री० **मथुरा**, एका स्थलाचें नांव.

मिळविणें **अर्ज्** प्र० ग० प० प०.

मोठ्यानें **उच्चैः** अ०.

योग्य **युक्त** ( **युज्** धातूचें भू० धा० ), **उचित** वि०.

व्रजस्त्रिया **व्रजाङ्गनाः** स्त्री० प्र० ब० व०.

सगर **सगर** पु०.

हरण करणें **अप+हृ** प्र० ग०.

# नवमः पाठः ।

## द्वितीयगण—( पुढें चालू. )

ह्या गणांतील अवशिष्ट राहिलेल्या धातूंस प्रत्यय लावितांना संधीच्या संबंधानें जीं रूपांतरें होतात तीं खालीं देतों.

१ **ह्**कारांत धातूंपुढें अनुनासिक व अंतःस्थ शिवाय करून कोणतेंही व्यंजन आलें असतां अथवा * कोणताहि वर्ण पुढें नसतां त्या **ह्**चा **ढ्** होतो.

जसें—**लिह्** ह्यापुढें **ति** हा तृतीय पुरुषीं एकवचनी **पित्** प्रत्यय आल्यानें नि० ६ पृ० १३ प्रमाणें पहिल्यानें **लेह्+ति**, नंतर **लेढ्+ति**, कारण **ति** ह्या प्रत्ययांतील **त्** अंतःस्थ अ० अनुनासिक नाहीं.

२ कोणत्याहि वर्गांतील चवथ्या वर्णापुढें प्रत्ययाचा आदि **त्** अ० **थ्** आला असतां त्याचा **ध्** होतो. जसें **लेढ्** यांतील **ढ्** हा **ट**वर्गांतील चवथा आहे म्हणून **ति** अक्षरांतील **त्** ह्या वर्णास **ध्** असा आदेश होऊन **लेढ्+धि** असें झालें. मूर्धन्याचा आणि दंत्याचा संयोग करणें असल्यास दंत्याच्या त्या त्या वर्णाच्या जागीं मूर्धन्य यथानुक्रम होतो ( प्र० पुस्त० टीप* पृ० २१ पहा ). या नियमाप्रमाणें **लेढ्+ढि** असें झालें.

३ **ढ्** पुढें **ढ्** असल्यास पहिल्या **ढ्**चा लोप होतो, आणि त्यापूर्वीचा ( **ऋ** शिवाय ) स्वर ऱ्हस्व असल्यास तो दीर्घ होतो; ह्याप्रमाणें **लेढि** असें रूप झालें. तृतीय पुरुषाच्या द्विवचनाचा प्रत्यय **तस्** लावणें असल्यास नि० १ प्रमाणें **लिढ्+तस्** झालें, नि० २ प्रमाणें **लिढ्+धस्** व नंतर **लिढ्+ढस्** आणि नि० ३ प्रमाणें **लीढः** असें झालें; **तस्** प्रत्यय **अपित्** आहे म्हणून गुण झाला नाहीं ( नि० ४ पृ० १३ पहा ). तृतीय पुरुषाचा बहुवचनी प्रत्यय **अन्ति** आहे. हा स्वरादि असल्यानें कांहीं फेरफार होत नाहीं, जसें—**लिह्+अन्ति=लिहन्ति.** द्वितीय पुरुषाचा एकवचनी प्रत्यय **सि पित्** असल्यानें **लेढ्+सि** झालें ( नि० १ पहा ). प्रथम पुस्तकाचें पृ० २१ यांतील *सूचनेप्रमाणें **सि**ची **षि** करण्यापूर्वी विशेष नियम लागू करावयाचा तो:—

---

*कोणताहि वर्ण पुढें नसतां म्हणजे त्याच शब्दाच्या अ० रूपाच्या अवयवांपैकीं वर्ण पुढें नसतां, जसें **लिह्**, **धुक्** इ०; ह्यावरून असें समजूं नये कीं पुढें दुसरा शब्द देखील येऊं नये. कोणताहि वर्ण पुढें नसतां असें जेथें जेथें सांगण्यांत येईल, तेथें तेथें वर सांगितल्याप्रमाणें समजावें. S-522.

४ **ढ्** अ० **ष्** ह्यापुढें **स्** आला असतां **ढ्**चा अ० **ष्**चा **क्** होतो.

ह्या नियमाप्रमाणें **लेक्+सि** झालें, नंतर प्र० पुस्त० पृ० ८८ ह्यांतील † टीपेप्रमाणें **सि**ची **षि** होऊन **लेक्षि** असें रूप झालें.

**वर्तमान** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **लेह्मि** | **लिह्वः** | **लिह्मः** |
| द्वि० पु० | **लेक्षि** | **लीढः** | **लीढ** |
| तृ० पु० | **लेढि** | **लीढः** | **लिहन्ति** |

**लीढः** द्वि० पु० द्विव० आणि **लीढ** द्वि० पु० ब० व०, हीं रूपें **लीढः** तृ० पु० द्विवचनाप्रमाणें झालीं. **मि, वः, मः** ह्या प्रत्ययांपूर्वी कांहीं संधि झाला नाहीं. कारण **मि** व **मः** हे प्रत्यय अनुनासिकादि आहेत. **वः** हा प्रत्यय अंतःस्थादि आहे.

**वर्तमान** आ० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **लिहे** | **लिह्वहे** | **लिह्महे** |
| द्वि० पु० | **लिक्षे** | **लिहाथे** | **लीढ्वे** |
| तृ० पु० | **लीढे** | **लिहाते** | **लिहते** |

हीं रूपें पूर्वोक्तनियमांप्रमाणें करावीं.

( १ ) दुसऱ्या वर्गांतील कोणत्याहि धातूच्या अंगाच्या शेवटीं व्यंजन असून तें अनुनासिक व अंतःस्थ व्यंजनें ह्यांहून निराळें असल्यास त्या अंगास आज्ञार्थी प० प० द्वि० पुरुषीं एकवचनीं **धि** हा प्रत्यय लागतो.

**आज्ञार्थ.**

| | प० प० | | | | आ० प० | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | ए० व० | द्विव० | ब० व० | | ए० व० | द्विव० | ब० व० |
| प्र० पु० | **लेहानि** | **लेहाव** | **लेहाम** | प्र० पु० | **लेहै** | **लेहावहै** | **लेहामहै** |
| द्वि० पु० | **लीढि** | **लीढम्** | **लीढ** | द्वि० पु० | **लिक्ष्व** | **लिहाथाम्** | **लीढ्वम्** |
| तृ० पु० | **लेढु** | **लीढाम्** | **लिहन्तु** | तृ० पु० | **लीढाम्** | **लिहाताम्** | **लिहताम्** |

प्र० पु० तीनहि वचनें **पित्** आहेत. प० प० द्वितीय पु० ए० वचन प्रत्यय **अपित्** आहे.

५ धातु **द**ादि व **ह्**कारांत असून त्यांपुढें पहिल्या नियमाप्रमाणें व्यंजन आल्यास त्या **ह्**चा **घ्** होतो.

जसें **दुह्** धातूस **ति** हा **पित्** प्रत्यय लावला म्हणजे **दोघ्+ति**, नि० २ प्रमाणें **दोघ्+धि** नंतर.

६ शब्दांत अथवा रूपांत अनुनासिकाशिवाय कोणतेंहि व्यंजन असून त्या पुढें (अव्यवहित) कोणत्याहि वर्गाचें तिसरें अथवा चवथें व्यंजन आलें असतां त्या पूर्व व्यंजनाचे जागीं त्याचे वर्गांतील तिसरें होतें. तें पूर्व व्यंजन ष् असल्यास त्याचे जागीं ड् हें व्यंजन होतें.

ह्या नियमाप्रमाणें **दोग्+धि=दोग्धि.** असेंच **दुग्धः** द्विव० होतें. **दुहन्ति** ह्या बहुवचनांत कांहीं संधिविषयींचा फेरफार होत नाहीं. द्वितीय पुरुषाच्या एकवचनाची **सि** पुढें आली असतां नि० ५ प्रमाणें **दोघ्+सि** असें होतें. प्रथम पुस्तक पृ० ५ टीप* हीस अनुसरून संधि करण्यापूर्वी दुसरा कांहीं फेरफार होतो तो असाः—

७ **ब्, ग्, द्,** एतदादि धातूंच्या अंतीं वर्गांतील चवथें व्यंजन असून पुढें **स्, ध्व्,** किंवा कांहींच न आलें तर **ब्**च्या जागीं **भ्, ग्**च्या जागीं **घ्,** आणि **द्**च्या जागीं **ध्,** अशीं व्यंजनें होतात.

ह्या नियमाप्रमाणें **धोघ्+सि,** प्रथम पुस्तकाच्या पांचव्या पानांतील* ह्या टिपेंत सांगितल्या नियमानें **धोक्+सि** आणि त्याच पुस्तकाच्या ८८ व्या पानांतील † ह्या टिपेवरून **धोक्+षि=धोक्षि** असें रूप होतें.

## वर्तमान.

### परस्मैपद.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **दोग्धि** | **दुग्धः** | **दुह्यः** |
| द्वि० पु० | **धोक्षि** | **दुग्धः** | **दुग्ध** |
| तृ० पु० | **दोग्धि** | **दुग्धः** | **दुहन्ति** |
| आ० प० तृ० पु० वर्त० | **दुग्धे** | **दुहाते** | **दुहते** |
| „ „ द्वि० पु० „ | **धुक्षे** | **दुहाथे** | **धुग्ध्वे** इ० |
| प० प० तृ० पु० आज्ञार्थ | **दोग्धु** | **दुग्धाम्** | **दुहन्तु** इ० |
| आ० प० तृ० पु० „ | **दुग्धाम्** | **दुहाताम्** | **दुहताम्** |
| „ „ द्वि० पु० „ | **धुक्ष्व** | **दुहाथाम्** | **धुग्ध्वम्** इ० |

(२) (अ) अंतःस्थादि व अनुनासिकादि प्रत्यय शिवाय करून बाकीच्या व्यंजनादि **अपित्** प्रत्ययांपूर्वी **हन्** धातूंतील **न्**चा लोप होतो, आणि स्वरादि प्रत्यय आला असतां उपांत्य **अ**चा लोप होतो.

(ब) **जहि** हें आज्ञार्थी द्वितीय पुरुषाच्या एकवचनाचें रूप होय.

(क) ह्या धातूच्या **ह्** पुढें **न्** अव्यवहित आला म्हणजे **ह्**चा **घ्** होतो.

८ शब्दांत अथवा रूपांत **न्** अ० **म्** असून पुढें अनुनासिकाशिवाय कोणतेंहि व्यंजन आलें तर **न्** व **म्** ह्यांच्या जागीं पुढें येणाऱ्या व्यंजनाच्या वर्गांतील अनुनासिक होतो आणि पुढें **ह्, स्, श्,** व **ष्** आले तर अनुस्वार होतो.

प० प० **वर्तमान.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **हन्मि** | **हन्वः** | **हन्मः** |
| द्वि० पु० | **हंसि** | **हथः** | **हथ** |
| तृ० पु० | **हन्ति** | **हतः** | **घ्नन्ति** |

येथें द्वितीय व तृतीय पुरुषांच्या द्विवचनीं आणि द्वितीय पुरुषाच्या बहुवचनीं अंतःस्थादि व अनुनासिकादि प्रत्यय शिवाय करून व्यंजनादि **अपित्** प्रत्यय आल्याकारणानें **न्**चा लोप झाला, आणि **सि** पूर्वी आठव्या नियमाप्रमाणें त्याचा अनुस्वार झाला. **अन्ति** अजादि **अपित्** प्रत्यय आहे म्हणून **हन्** धातूंतील उपांत्य अचा लोप झाल्यानें **ह्न्+अन्ति** आणि नियम (२) (क) प्रमाणें **घ्नन्ति** झालें.

स्थलविशेषीं हा धातु आत्मनेपदी होतो तेव्हां ह्याचीं वर्तमान काळाचीं रूपें खालीं लिहिल्याप्रमाणें होतात.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **घ्ने** | **हन्वहे** | **हन्महे** |
| द्वि० पु० | **हसे** | **घ्नाथे** | **हध्वे** |
| तृ० पु० | **हते** | **घ्नाते** | **घ्नते** |

वरील ( २ ) ( अ ) ह्या नियमांत सांगितल्याप्रमाणें अंतःस्थादि व अनुनासिकादि प्रत्यय शिवाय करून व्यंजनादि **अपित्** प्रत्ययांपूर्वी **न्**चा लोप झाला; आणि स्वरादि प्रत्ययांपूर्वी अचा लोप होऊन **ह्**चा **घ्** झाला.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प० प० आज्ञा० तृ० पु० | **हन्तु** | **हताम्** | **घ्नन्तु** |
| ,, ,, ,, द्वि० पु० ए० व० | **जहि** | | |
| ,, ,, ,, प्र० पु० ए० व० | **हनानि** | | |
| आ० प० आज्ञार्थ तृ० पु० | **हताम्** | **घ्नाताम्** | इ० |

( ३ ) **ईड्** व **ईश्** ह्या धातूंपुढें **स्** अ० **ध्व्** एतदादि प्रत्यय असतां **इ** आगम होतो, परंतु प्रथम भूतकाळीं द्वितीय पुरुषाच्या बहुवचनाच्या **ध्व्** पूर्वी होत नाहीं.

९ **श्**कारांत व **छ्**कारांत धातूंपुढें आणि **व्रश्च्, भ्रस्ज्, सृज्, मृज्, यज्, राज्, भ्राज्,** या धातूंपुढें अंतःस्थ व अनुनासिक ह्यांशिवाय कोणतेंहि व्यंजन आलें असतां अथवा कोणताही वर्ण पुढें नसतां ह्यांच्या अंत्यांस **ष्** होतो.

**ईश्** आ० प० वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **ईशे** | **ईश्वहे** | **ईश्महे** |
| द्वि० पु० | **ईशिषे** | **ईशाथे** | **ईशिध्वे** |
| तृ० पु० | **ईष्टे** | **ईशाते** | **ईशते** |

**ते** प्रत्यय लागण्यापूर्वी **श्**चा **ष्** झाला. नंतर **त्**चा **ट्** होऊन **ते**चा **टे** झाला. मग **ईष्टे** असें झालें. **से** व **ध्वे** हे प्रत्यय लागण्यापूर्वी त्यांमागें **इ** आगम होऊन **ईशिषे** व **ईशिध्वे** अशीं रूपें झालीं.

आज्ञार्थ तृ० पु० **ईष्टाम्** **ईशाताम्** **ईशताम्**

,, प्र० पु० ए० व० **ईशै**

( ४ ) **पित्** प्रत्यय पुढें असतां **मृज्** धातूच्या उपांत्य **ऋ**कारास **वृद्धि** नित्य होते व **स्वरादि अपित्** प्रत्यय पुढें असतां विकल्पानें होते.

**मृज्** प० प० वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **मार्ज्मि** | **मृज्वः** | **मृज्मः** |
| द्वि० पु० | **मार्क्षि** | **मृष्ठः** | **मृष्ठ** |
| तृ० पु० | **मार्ष्टि** | **मृष्टः** | **मृजन्ति-मार्जन्ति** |

नवव्या नियमाप्रमाणें **ति** व **तस्** इ० प्रत्ययांपूर्वी अंत्य **ज्**चा **ष्** होऊन **मार्ष्टि, मृष्टः** इ० रूपें झालीं. सर्व पुरुषांच्या एकवचनांत **ऋ** ह्या वर्णास वरील नियमानें वृद्धि झाली आणि तृ० पुरुषाच्या बहुवचनांत विकल्पें झाली.

**सि** पूर्वी **ज्**चा **ष्** नि० ९ प्रमाणें होऊन नंतर **ष्**चा **क्** झाला ( नि० ४ पृ० ५६ पहा ) आणि **सि**ची **षि** होऊन **मार्क्षि** असें रूप झालें.

आज्ञा० तृ० पु० **मार्ष्टु, मृष्टाम्, मृजन्तु** अ० **मार्जन्तु.**

,, द्वि०पु०ए०व० **मृड्ढि.** येथें नि० ( १ ) पृ० ५६ प्रमाणें प्रत्यय **धि** आहे. **मृज्**च्या **ज्**चा **ष्** नि० ९ प्रमाणें झाला आणि **ष्**चा **ड्** झाला ( नि० ६ पृ० ५७ पहा ).

( ५ ) **वश्** धातूस **अपित्** प्रत्यय लागण्यापूर्वी **व**ला संप्रसारण होतें, म्हणजे **व्**च्या जागीं **उ** होतो.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **वश्मि** | **उश्वः** | **उश्मः** |
| द्वि० पु० | **वक्षि** | **उष्ठः** | **उष्ठ** |
| तृ० पु० | **वष्टि** | **उष्टः** | **उशन्ति** |

आज्ञा० द्वि० पु० ए० व० **उड्ढि.**

**वश्+ति–वष्+ति** (नि० ९ पृ० ५८ पहा), **वष्+टि=वष्टि** (टीप* पृ० २१ प्रथ० पुस्तक पहा).

**वश्+सि–वष्+सि** (नि० ९ पृ० ५८ पहा), **वक्+सि** (नि० ४ पृ० ५६ पहा), **वक्+षि=वक्षि; उष्टः** इ० वर सांगितल्याप्रमाणें.

**वश्+धि** [नि० (१) पृ० ५६ पहा], **उश्+धि–उष्+धि, उष्+ढि** (टीप* पृ० २१ प्रथ० पुस्त०), नि० ६ पृ० ५७ प्रमाणें **उड्ढि.**

(६) **शास्** धातूपुढें व्यंजनादि **अपित्** प्रत्यय आला म्हणजे धातूंतील **आ**च्या जागीं **इ** आदेश होतो.

(७) **शास्, जक्ष्, चकास्, दरिद्रा** व **जागृ** ह्या धातूंस तृ० पु० बहुवचनाचा प्रत्यय लावितांना **न्**चा लोप होतो.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **शास्मि** | **शिष्वः** | **शिष्मः** |
| द्वि० पु० | **शास्सि** | **शिष्ठः** | **शिष्ठ** |
| तृ० पु० | **शास्ति** | **शिष्टः** | **शासति** |

**शास्** धातूचें आज्ञार्थी द्वि० पु० ए० व० **शाधि** असें होतें, आणि **चकास्** धातूचें **चकाद्धि** अ० **चकाधि** असें होतें.

**शास्+तस्** नि० (६) प्रमाणें **शिस्+तस्; शिष्+तस्** (**स्**चा **ष्** होऊन), **शिष्+टस्** (टीप* पृ० २१ प्र० पु० पहा), **शिष्टः.** नि० (७) प्रमाणें **शास्+अति** (**अन्ति** नाहीं) **शासति. जागृ** प० प० **जागर्ति जागृतः जाग्रति.**

आज्ञा० द्वि० पु० ए० व० **ागृहि.**

,, प्र० पु० ,, **जागराणि.**

(८) स्वरादि **अपित्** प्रत्ययांपूर्वी **दरिद्रा** धातूंतील **आ**चा लोप होतो आणि व्यंजनादि **अपित्** प्रत्ययांपूर्वी **आ**च्या जागीं **इ** होते. तृ० पु० **दरिद्राति, दरिद्रितः, दरिद्रति,** इ०.

(९) **विद्** धातूचीं आज्ञार्थी सर्व रूपें विकल्पानें **विदाम्** या पुढें **कृ** धातूचीं आज्ञार्थी रूपें लावून होतात.

आज्ञा० तृ० पु० **वेत्तु** अ० **विदांकरोतु, वित्ताम्** अ० **विदांकुरुताम्, विदन्तु** अ० **विदांकुर्वन्तु.**

वर्त० तृ० पु० **वेत्ति, वित्तः, विदन्ति** इ०

१० संयोगाचा (म्ह० जोडाक्षराचा) पूर्व अवयव **स्** अ० **क्** असून तो संयोग शब्दांच्या शेवटीं असल्यास अ० अनुनासिक किंवा अंतःस्थ व्यंजना-शिवाय कोणतेंही व्यंजन त्यापुढें असल्यास **स्** अ० **क्** ह्याचा लोप होतो.

ह्याप्रमाणें **चक्ष्+ते,** ह्यांत **क्ष्** मध्यें पूर्व अवयव **क्** आहे आणि त्यापुढें **ते** आला आहे आणि **ते** ह्यांतील **त्** अंतःस्थ अथवा अनुनासिक नाहीं; म्हणून **क्ष्**तील **क्**चा लोप झाला. मग राहिला **चष्+ते,** ह्याचें प्र० पु० टीप* पृ० २१ प्रमाणें **चष्टे** असें झालें. द्वितीय पुरुषाचें ए० व० प्रथमतः **चक्ष्+से;** वरच्या-प्रमाणें **क्**चा लोप होऊन **चष्+से;** नि० ४ पृ० ५६. प्रमाणें **चक्+से;** नंतर प्र० पु० टीप † पृ० ८८ प्रमाणें **से**चा **षे** होऊन **चक्षे** असें रूप झालें.

**चक्ष्** आ० प० वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **चक्षे** | **चक्ष्वहे** | **चक्ष्महे** |
| द्वि० पु० | **चक्षे** | **चक्षाथे** | **चड्ढ्वे** |
| तृ० पु० | **चष्टे** | **चक्षाते** | **चक्षते** |

**चक्ष्+ध्वे,**—नि० १० प्रमाणें **चष्+ध्वे,** (टीप* पृ० २१ प्र० पु०) **चष्+ढ्वे** आणि पृ० ५७ नि० ६ प्रमाणें **चड्ढ्वे.**

आज्ञार्थी तृ० पु० **चष्टाम्, चक्षाताम्** इ०.

**द्विष्—द्वेष्टि** प० प० तृ० पु० ए० व० वर्तमान इ०.

**दिह्—देग्धि** प० प० तृ० पु० ए० व० वर्तमान इ०.

---

**सविता वै प्रसवानामीष्टे*।**
**गोपः सायं धेनूर्दोग्धि † पयः।**

---

* ईश् धातुचें कर्म षष्ठयन्त असतें.

† दुह् व चक्ष् ह्यांस दोन कर्मे बहुधा असतात.

अधुनाखिलं भरतवर्षं महाप्रतापा आंग्लभौमाः प्रशासति ।

तस्मिन्पुष्पे भ्रमरौ मधु लीढः ।

अग्निमीडे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् ।

योऽस्मान्द्वेष्टि यं च वयं द्विष्मस्तं घ्नन्त्विमान्यस्माभिः पठ्यमानानि मन्त्राक्षराणि ।

हे जगन्नाथाखिलस्यैतस्य वस्तुजातस्य त्वमीशिषे ।
हे दीनबन्धो यद्यन्मे नम्रस्य पापं भवेत्तत्तत्प्रतिजहि ।
शत्रुं हन्तुं शरान्विषेण देग्धि ।
आचक्ष्व क्व मामेकाकिनीमत्र विहायाकरुण यासि ।
यं मां धर्ममाचष्टे * तमेव प्रत्यहमाचरामि ।
 ङ्क्ष्वे

वत्से न युक्तं ते मङ्गलकाले रोदितुं प्रमृड्ढ्यश्रूणि । अथवा सख्यौ प्रमृष्टाम् ।

भाष्यकृत्पतञ्जलिः कात्यायनस्य वचनानि विस्तरतो व्याचष्टे ।
शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ।
शास्त्यरीन् धर्ममाशास्ते कीर्तिमाशंसते पराम् ।
स शंसति सतां वृत्तं विशास्त्युत्पथास्थितान् ॥
ईट्टे त्रिविष्टपास्थाने तत्कीर्तिं वासवः स्वयम् ।
ईडयन्ति नरेन्द्राश्च भूमावुद्भूतविस्मयाः ।

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥
य एनं † वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥
करोति पापं योऽज्ञानान्नात्मनो वेत्ति च क्षयम् ।
प्रद्वेष्टि साधुवृत्तांश्च स लोकस्यैति वाच्यताम् ॥
प्राप्य चाप्युत्तमं जन्म लब्ध्वा चेन्द्रियसौष्ठवम् ।
न वेत्त्यात्महितं यस्तु स भवेदात्मघातकः ॥

---

* मागील पृष्ठावरील † टीप पहा.

† हें आत्म्यास अनुलक्षून म्हटलें आहे.

१ दिवसांतून किती वेळां तूं गाईची धार काढितोस ( **दुह्** ) ?

२ फुलांवरून भुंग्याला उडवूं नका; त्यास मध चाटूं द्या ( **लिह्** ).

३ जे अविचारानें जीव मारितात ( **हन्** ) ते कधींही सुख पावत नाहींत.

४ ज्या ज्या वेळेस रस्त्यानें राजे जातात त्या त्या वेळेस शहरांतील लोक रस्ते झाडितात ( **सम्+मृज्** ).

५ रात्रीच्या शेवटच्या प्रहरांत ऋषींचे शिष्य जागतात ( **जागृ** ), आणि वेद शिकतात.

६ मगध देशाची राजधानी राजगृह ही होती किंवा पाटलिपुत्र ही होती हें आम्हांस माहित नाहीं ( **विद्** ).

७ चांगल्या मनुष्यांचा द्वेष करूं नका ( **द्विष्** ).

८ राणी व तिचे वंशज आम्हांवर चिरकाल राज्य करोत ( **शास्** ).

९ आपण हें सूत्र आम्हांस उघड करून सांगा ( **वि+आ+चक्ष्** ).

---

# शब्दकोश ९.

## द्वितीय गणांतील धातु.

**ईड्** आ० प० स्तुति करणें.

**ईश्** आ० प० धनी असणें, अंमल चालविणें.

**चकास्** प० प० प्रकाशणें.

**चक्ष्** * आ० प० बोलणें; **आ+चक्ष्** सांगणें; **वि+आ+चक्ष्** स्पष्ट करून सांगणें.

**जागृ** प० प० जागणें.

**दरिद्रा** प० प० गरीब असणें.

**दिह्** उ० प० सारविणें, लेपणें.

**दुह्** उ० प० दूध काढणें, दोहणें.

**द्विष्** उ० प० द्वेष करणें.

**मृज्** प० प० स्वच्छ करणें, पुसणें; **प्र+मृज्** पुसून टाकणें; **सम्+मृज्** झाडणें.

**लिह्** उ० प० चाटणें.

**वश्** प० प० इच्छिणें, प्रकाशणें.

**विद्** † प० प० जाणणें.

**शास्** प० प० अंमल चालविणें, व्यवस्था करणें, शिक्षा लावणें.

**हन्** प० प० ठार मारणें.

---

* हा धातु फक्त सार्वधातुक प्रकारांत व द्वितीय भूतांत योजितात. आर्धधातुक प्रकारांत व विकल्पानें द्वितीय भूतांत ह्या धातूचे ऐवजीं **ख्या** हा उभयपदी धातु योजितात.

† ह्या धातूच्या वर्तमान कालाचीं रूपें द्वितीय भूताचे प्रत्यय लागूनही होतात **वेद, विदतुः, विदुः** इ०. ( पाठ १३ पहा ).

**अकरुण** वि० ( **अ** अभावार्थी व **करुणा** स्त्री० ) निर्दय, ज्याला दया नाहीं असा.

**आत्मघातक** पु० न० ( **आत्मन्** आपण, **घातक** नाशक ) स्वतःचा नाश करणारा.

**आत्महित** न० ( **आत्मन्** आपण, **हित** कल्याण ) आपलें हित.

**इंद्रियसौष्ठव** न० ( **इन्द्रिय** न० अवयव अ० इन्द्रिय, **सौष्ठव** न० सौन्दर्य, चांगुलपणा ) इन्द्रियांची यथायोग्य स्थिति.

**ईड्** द० ग० स्तुति करणें.

**उत्पथास्थित** वि० ( **उत्पथ** पु० दुर्मार्ग, **आस्थित** भू० का० धा० **आ+स्था** धातूचें ) ज्यानें दुर्मार्ग धरिला असा.

**उद्भूतविस्मय** वि० ( **उद्भूत** भू० का० धा० **उद्+भू** 'उद्भवणें' ह्या धातूचें, उद्भवलेला ) ज्याचे मनांत आश्चर्य उद्भवलें असा.

**उभ** सर्व० दोघे.

**कात्यायन** पु० एका मोठ्या वैय्याकरणाचें नांव.

**क्षय** पु० नाश, ऱ्हास.

**जगन्नाथ** पु० ( **जगत्** न० त्रैलोक्य, **नाथ** पु० धनी ) जगांचा धनी, जगत्पति.

**तत्कीर्ति** स्त्री० त्याची कीर्ति.

**त्रिविष्टपास्थान** न० ( **त्रिविष्टप** न० **स्वर्ग, आस्थान** न० सभा ) स्वर्गांतील सभा, देवांची सभा.

**दीनबंधु** पु० ( **दीन** वि० गरीब, अनाथ, **बंधु** पु० भाऊ ) गरिबांचा बंधु.

**देव** वि० प्रकाशणारा.

**नम्र** वि० गरीब, लीन.

**नरेन्द्र** पु० राजा.

**पठ्यमान** ( वर्त० का० धा० क० **पठ्** म्हणणें अ० वाचणें ह्या धातूचें ) पठन केलें जात आहे असें.

**पतञ्जलि** पु० महाभाष्य ह्या नांवाचा व्याकरणसंबंधी मोठा ग्रंथ करणारा.

**पुरोहित** पु० उपाध्याय.

**प्रपन्न** वि० ( **प्र+पद्** धातूचें भू० का० धा० ) शरण आलेला.

**प्रसव** पु० उत्पन्न केलेला पदार्थ, उत्पन्न.

**भाष्यकृत्** पु० भाष्य करणारा, टीकाकार.

**मङ्गलकाल** पु० ( **मङ्गल** न० शुभ, **काल** पु० वेळ ) शुभ वेळ.

**मन्त्राक्षर** न० वेदाचें अ० मंत्राचें अक्षर.

**वस्तुजात** न० ( **वस्तु** न० आणि **जात** न० समूह ) वस्तूंचा समूह.

**वाच्यता** स्त्री० दोषीपणा, निन्द्यता.

**वासव** पु० इन्द्र.

**विस्तरतः** अ० तपशीलवार.

**विहाय** ( भू० का० धा० अ० **वि+हा** धातूचें ) टाकून.

**शंस्** प्र० ग० आ० प०, उप० **आ**, आशा करणें.

**शास्** प्र० ग० प० प०, उप० **वि**, ठार मारणें.

**शास्** द्वि० ग० आ० प०, उप० आ, इच्छिणें.

**संयमिन्** पु० योगी, ज्यानें आपलीं इंद्रियें वश केलीं आहेत असा.

**सर्वभूतानि** न० ( प्रथमा व द्वितीया ह्यांचें बहुवचन ) सर्व वस्तु.

**सवितृ** पु० सूर्य.

**साधुवृत्त** वि० ( **साधु** वि० चांगलें, **वृत्त** न० वर्तन) चांगल्या वर्तणुकीचा.

**सायम्** अ० संध्याकाळीं.

**हन्तृ** वि० ठार मारणारा.

---

अविचारानें **रभसात्, मोहात्.**

आपण **भवान्, भगवान्** प्रथमेचें एकवचन.

उडविणें **प्र+चुद्** द० ग०.

कधीं नाहीं **न कदा** अ०.

किती वेळां **कतिकृत्वः** अ०.

ज्या ज्या वेळेस **यदा यदा तदा तदा.**

पाटलिपुत्र **पाटलिपुत्र** न० मगध देशांतील एका शहराचें नांव.

प्रहर **याम** पु० ( **तुरीयो भागः** ).

मगध **मगधाः** ब० व० एका देशाचें नांव अ० त्यांतील राहणारे लोक.

भुंगा **भ्रमर** पु०.

रस्ता **रथ्या** स्त्री०.

राजगृह **राजगृह** न० मगध देशांतील एका शहराचें नांव.

राजधानी **राजधानी** स्त्री०.

वंशज **वंश्य** वि०, **कुलज** वि०.

शेवटला **चरम** वि०.

सूत्र **सूत्र** न०.

---

# दशमः पाठः ।

## द्वितीय गण ( समाप्त )

### प्रथम भूतकाल.

१ प्रथम भूतकालाच्या द्वितीय व तृतीय पुरुषांच्या एकवचनी प्रत्ययांतील **स्** व **त्** ह्यांचा लोप मागें व्यंजन असतां होतो.

२ शब्दांच्या अथवा धातूंच्या रूपाच्या अंतीं अनुनासिकाशिवाय कोणतेंहि व्यंजन आलें असतां त्याचे जागीं त्याचे वर्गांतील पहिलें अथवा तिसरें व्यंजन होतें. **ष्** च्या स्थानीं **ट्** अ० **ड्** होतो.

( अ ) प्रथम भूतकाळीं तृ० पु० ए० व० प्रथमतः **अलिह्+त्** असें आहे. मग नि० ६ पृ० १३ प्रमाणें **अलेह्+त्**, वरच्या पहिल्या नियमानें **त्**चा लोप होऊन **अलेह्** असें राहतें, नि० १ पृ० ५५ प्रमाणें **अलेढ्** होऊन ह्या निय-

मानें **अलेट्** अ० **अलेड्** असें होतें. ह्याचप्रमाणें द्वितीय पुरुषीं एकवचनाच्या **स्**चा लोप होऊन **अलेट्** अ० **अलेड्** असें होतें.

**लिह्** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अलेहम्** | **अलिह्व** | **अलिह्म** |
| द्वि०पु० | **अलेट्-ड्** | **अलीढम्** | **अलीढ** |
| तृ० पु० | **अलेट्-ड्** | **अलीढाम्** | **अलिहन्** |

**अलीढाम्** हें रूप वर्त० तृ० पु० द्विव० **लीढः** ह्याप्रमाणेंच झालें ( मागील पाठ पहा ).

आ० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अलिहि** | **अलिह्वहि** | **अलिह्महि** |
| द्वि०पु० | **अलीढाः** | **अलिहाथाम्** | **अलीढ्वम्** |
| तृ० पु० | **अलीढ** | **अलिहाताम्** | **अलिहत** |

( ब ) **अदुह्+त्**–पृ० १३ नि० ६ प्रमाणें **अदोह्+त्**, पृ० ६५ नि० १ प्रमाणें **अदोह्**, पृ० ५६ नि० ५ प्रमाणें **अदोघ्**, पृ० ५७ नि० ७ प्रमाणें **अधोघ्**, पृ० ६५ नि० २ प्रमाणें **अधोक्** अ० **अधोग्**. **स्** हा प्रत्यय जोडिला असतांही **अधोक्** अ० **अधोग्** असेंच होतें.

**दुह्** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अदोहम्** | **अदुह्व** | **अदुह्म** |
| द्वि० पु० | **अधोक्–ग्** | **अदुग्धम्** | **अदुग्ध** |
| तृ० पु० | **अधोक्–ग्** | **अदुग्धाम्** | **अदुहन्** |

आ० प० तृ० पु० **अदुग्ध–अदुहाताम्–अदुहत.** नि० २ पृ० ५५ प्रमाणें **थ्** चा **ध्** होऊन द्वि० पु० ए० व० **अदुग्धाः** असें होतें.

( क ) **अहन्+त्=अहन्** नि० १ पृ० ६५ पहा; **अहन्+ताम्**–नि० ( २ ) ( अ ) पृ० ५७ प्रमाणें **न्**चा लोप होऊन **अहताम्** असें द्विव० झालें. **अहन्+अन्** ( ब० व० )–पृ० ५७ नि० ( २ ) ( अ ) प्रमाणें **अह्न्+अन्** व पृ० ५७ नि० ( २ ) ( क ) प्रमाणें **अघ्नन्.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अहनम्** | **अहन्व** | **अहन्म** |
| द्वि० पु० | **अहन्** | **अहतम्** | **अहत** |
| तृ० पु० | **अहन्** | **अहताम्** | **अघ्नन्** |
| आ०प०तृ०पु० | **अहत** | **अघ्नाताम्** | **अघ्नत** इ० |

(ङ) **अमृज्+त्**–पृ० ५९ (नि० ४) प्रमाणें **अमार्ज्+त्**, पृ० ६५ नि० १ प्रमाणें **अमार्ज्**, पृ० ५८ नि० ९ प्रमाणें **अमार्ष्**, पृ० ६५ नि० २ प्रमाणें ***अमार्ट्–ड्**. ह्याप्रमाणेंच द्वि० पु० ए० व० **अमार्ट्–ड्**.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र०पु० | **अमार्जम्** | **अमृज्व** | **अमृज्म** |
| द्वि०पु० | **अमार्ट्-ड्** | **अमृष्टम्** | **अमृष्ट** |
| तृ०पु० | **अमार्ट्-ड्** | **अमृष्टाम्** | **अमृजन्-अमार्जन्** |

(१) **विद्, शास्, जक्ष्, चकास्, दरिद्रा** व **जागृ** या धातूंच्या प्र० भू० कालाच्या तृ० पु० बहुवचनाचा प्रत्यय **उस्** आहे.

**द्विष्** धातूस हा **उस्** प्रत्यय विकल्पानें लागतो.

३ प्र० भू० द्वि० पु० एक वचनाच्या प्रत्ययापूर्वी धातूंच्या अंत्य **द्**काराच्या स्थानीं विकल्पानें **र्** अ० विसर्ग होतो. जसें–**अवेद्+स्=अवेत्** अ० **अवेद्** अ० **अवेः**.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अवेदम्** | **अविद्व** | **अविद्म** |
| द्वि०पु० | **अवेः-अवेत्-अवेद्** | **अवित्तम्** | **अवित्त** |
| तृ० पु० | **अवेत्-द्** | **अवित्ताम्** | **अविदुः** |

(२) **उस्** प्रत्यय लागण्यापूर्वी धातूंच्या अंत्य स्वराला गुण होतो.

**जागृ** प० प० तृ० पु० प्र० भू० **अजागः-अजागृताम्-अजागरुः** इ०. **अजागृ+त्-अजागर्+त्**, पृ० ६५ नि० १ प्रमाणें **अजागर्–अजागः**.

४ **त्** प्रत्यय पुढें असतां धातूंच्या अंत्य **स्** च्या स्थानीं **त्** अ० **द्** नित्य होतो, आणि **स्** प्रत्यय पुढें असतां विकल्पानें होतो.

---

*संयोगाचा पहिला अवयव **र्** असला तर तो संयोग शब्दाच्या शेवटीं राहतो; परंतु जर संयोगांतील दुसरा अवयव **स्** असला तर मात्र राहत नाहीं.

**शास्** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अशासम्** | **अशिष्व** | **अशिष्म** |
| द्वि० पु० | **अशाः-अशात्-द्** | **अशिष्टम्** | **अशिष्ट** |
| तृ० पु० | **अशात्-द्** | **अशिष्टाम्** | **अशासुः** |

**अशास्+त्**, **त्**चा लोप झाल्यानें **अशास्**; आणि वर सांगितलेल्या नित्य-नियमानें **अशात्** अ० **अशाद्**.

**ईश्** आ० प० प्र० भू० तृ० पु० **ऐष्ट-ऐशाताम्-ऐशत**; द्वि० पु० ब० व० **ऐड्ढ्वम्**, पृ० ५८ नि० ९ प्रमाणें **श्**चा **ष्**, पृ० ५७ नि० ६ प्रमाणें **ष्**चा **ड्** आणि ध्वचा **ढ्व** होतो.

**वश्** प० प० प्र० भू० तृ० पु० **अवट्-ड्-औष्टाम्-औशन्**. **ताम्** इत्यादि प्रत्ययांपूर्वी **व**चा **उ** होऊन तो **उ** आणि प्र० भू० कालाचा **अ** आगम मिळून वृद्धि म्हणजे **औ** होतो.

**विध्यर्थ.**

**दुह्** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र०पु० | **दुह्याम्** | **दुह्याव** | **दुह्याम** |
| द्वि०पु० | **दुह्याः** | **दुह्यातम्** | **दुह्यात** |
| तृ०पु० | **दुह्यात्** | **दुह्याताम्** | **दुह्युः** |

**दुह्** आ० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र०पु० | **दुहीय** | **दुहीवहि** | **दुहीमहि** |
| द्वि०पु० | **दुहीथाः** | **दुहीयाथाम्** | **दुहीध्वम्** |
| तृ०पु० | **दुहीत** | **दुहीयाताम्** | **दुहीरन्** |

**हन्** प० प० तृ० पु० **हन्यात्-हन्याताम्-हन्युः**; आ० प० तृ० पु० **घ्नीत-घ्नीयाताम्-घ्नीरन्**.

**शास्** प० प० तृ० पु० **शिष्यात्-शिष्याताम्-शिष्युः**.

---

**सायं प्रातर्धेनुमग्निहोत्रायाधोगृषिः ।**

**दण्डकायां वसन्तौ रामलक्ष्मणौ रक्षसां सहस्राण्यहताम् ।**

**चाणक्योऽकिंचनो ब्राह्मणो नन्दानद्बुद्धिप्रभावाच्च तानहन् ।**

**तेषां च राज्यं चन्द्रगुप्तो नाम नृपतिश्चाणक्यस्य शिष्योऽशात् ।**

**देवानां संदेशं हरन्नलो दमयन्त्या अन्तःपुरं प्राविशत् । प्रविशन्तं च तं देवानां वराद्रक्षितारो नाविदुः ।**

केचिद्बटवस्तडागस्य तटमुपगता लोष्टैर्भेकानभ्यघ्नन् ।

स राजा दिग्विजयादारभ्यात्मनः सर्वं वृत्तान्तं गन्धर्वकन्याया* आचष्ट ।

यथा पाण्डवा रणे नास्मान्हन्युस्तथा क्रियताम् ।

कश्चित्कुक्कुरो यज्ञमण्डपं गतो हवींष्यवालेट् । तत्रर्त्विजस्तमाघ्नन् सर्वं च समुपाहृतं यज्ञियं द्रव्यं त्यक्त्वा मण्डपं सममार्जन् ।

राजानो धर्मेण वसुधां शिष्युः ।

---

१ मौर्य नंदांच्या मागून पृथ्वीचें राज्य करिते झाले ( **शास्** ).

२ " अंगलोक फार दिवस आमचा द्वेष करीत होते ( **द्विष्** ). ते आमच्या देशावर स्वारी करिते झाले. आम्ही त्यांशीं लढलों आणि त्यांच्या सेनापतींस मारिते झालों ( **हन्** ). त्यांचा राजा हें न जाणता झाला ( **विद्** ); म्हणून तो जातीनें रणांत आला. परंतु आपलीं मनुष्यें मारलेलीं पाहून तो आपल्या राज्यांत परत गेला," असें कलिंग देशाचे योद्धे आम्हांस सांगते झाले ( **चक्ष्** ).

३ तुम्हीं काल गाईची धार काढिली का ( **दुह्** ) ?

४ हरि रात्रभर वेद म्हणत जागला ( **जागृ** ).

५ मनुष्य प्रत्येक प्रातःकाळीं आपलें तोंड स्वच्छ करो ( **प्र+मृज्** ).

---

## शब्दकोश १०.

**अग्निहोत्र** न० अग्निप्रीत्यर्थ बली देणें.

**कुक्कुर** पु० कुत्रा.

**गन्धर्वकन्या** स्त्री० गन्धर्वाची मुलगी.

**चन्द्रगुप्त** पु० एका राजाचें नांव.

**चाणक्य** पु० एका मनुष्याचें नांव.

**तट** ( तिन्ही लिंगी नाम ) कांठ, तीर.

**दिग्विजय** पु० ( **दिश्** स्त्री० दिशा, **विजय** पु० जिंकणें ) सर्व देश जिंकणें.

**द्रव्य** न० वस्तु, पदार्थ.

**नन्द** पु० एका राजवंशाचें नांव, त्या वंशापैकीं एक व्यक्ति.

**बटु** पु० मुलगा.

**भेक** पु० बेडूक.

**मण्डप** पु० मांडव.

**यज्ञमण्डप** पु० यज्ञाकरितां केलेला मांडव.

**यज्ञिय** वि० यज्ञसंबंधी.

**रण** न० युद्ध.

**वसुधा** स्त्री० पृथ्वी.

**वृत्तान्त** पु० वर्तमान.

**समुपाहृत** ( **सम्+उप+आ+हृ** धातूचें भू० का० धा० क० ) जमविलेलें.

**सहस्र** न० हजार.

**हन्** मारणें, **अभि+हन्** प० प०, **आ+हन्** प० प०, प्रहार करणें.

---

* प्रथम पुस्तकांतील पृ० ९९ टीप*पहा.

अंगलोक **अंगाः** ब० व०.
स्वारी करणें **अभि+द्रु** प्र० ग० प० प०.
कलिंगलोक **कलिंगाः** ब० व०, कलिंगदेशाचे लोक अथवा त्यांचा देश.
जातीनें **स्वयम्** अ०.
देश **विषय** पु०.
परत जाणें **नि+वृत्** प्र० ग० आ० प०.
फार दिवस **दीर्घं कालम्.**
मौर्य **मौर्य** पु० एका वंशाचें नांव, त्यापैकीं एक व्यक्ति.
म्हणत **पठ्** प्र० ग० प० प० ह्याचें व० का० बो० वि० **पठन्.**
रण **रणभूमि** स्त्री०.
सेनापति **चमूपति** पु०, **सेनापति** पु०.

---

# एकादशः पाठः ।

## तृतीय गण.

१ ह्या गणांत धातुसंबंधी स्वरास व त्यापूर्वी व्यंजन असल्यास व्यंजनसहित स्वरास द्वित्व ( म्ह० त्याचें दोन वेळां उच्चारण ) प्रत्यय लावण्यापूर्वी होतें. स्वर अनेक असल्यास तें द्वित्व पहिल्या स्वरास व त्यापूर्वी व्यंजन असल्यास व्यंजनासहित स्वरास होतें.

२ ( अ ) द्वित्वाविषयीं सामान्य नियमः—

द्वित्व होऊन आलेल्या वर्णांत आद्य व्यंजन कोणत्याही वर्गांतील दुसरें असल्यास त्याच्या जागीं त्याच्या वर्गांतील पहिलें, आणि चवथें असल्यास त्याच्या जागीं तिसरें होतें.

जसें–नि० १ प्रमाणें **फल्** ह्यास द्वित्व होऊन **फफल्** , वरच्या नियमांतील पहिल्या भागाप्रमाणें **पफल्**; वरील नियमाच्या दुसऱ्या भागाप्रमाणें व दुसऱ्या नियमाच्या ( इ ) प्रमाणें **धा–धाधा–दधा; भी–भीभी–बिभी.**

( ब ) कंठ्य व्यंजनास यथानुक्रमें तालव्य व्यंजन (वरच्या नियमास अनुसरून ) होतें, आणि **ह्**स **ज्** हें होतें.

**खन्**—नि० १ प्रमाणें **खखन्** , नि० २ ( ब ) प्रमाणें **छखन्** , नि० २ ( अ ) प्रमाणें **चखन्. हा** नि० १ प्रमाणें **हाहा,** नि० २ ( इ ) प्रमाणें **हहा,** आणि वरच्या नियमाप्रमाणें **जहा.**

( क ) धातु संयुक्तव्यंजनादि असल्यास संयोगाच्या पहिल्या व्यंजनास आणि स्वरास मात्र द्वित्व होतें. जसें **ह्री** याचें या नियमाप्रमाणें **हीह्री**–नि० २ ( ब ) व नि० ( इ ) प्रमाणें **जिह्री.**

( ड ) **अपवाद**—संयोगाचा पहिला अवयव उष्मवर्ण असून दुसरा अवयव कठोर वर्ण असल्यास कठोरास द्वित्व होतें. जसें **स्पर्ध्-पस्पर्ध्.**

( इ ) धातूंचा पहिला स्वर दीर्घ असल्यास ऱ्हस्व होतो आणि **ऋ**चा **अ** होतो; जसें-**ह्री-जिह्री, दा-ददा, कृ-चकृ.**

३ द्वित्वाविषयीं तृतीयगणासंबंधी विशेष नियम—

**मा**, हा ' जाणें, ' **भृ, पृ** अ० **पॄ**, व **ऋ** ह्या धातूंच्या *अभ्यासांतील स्वराच्या जागीं **इ** होते, जसें-**मा**चें **मिमा**; **हा**चें **जिहा** इ०; आणि **निज्, विज्** व **विष्** ह्या धातूंच्या अभ्यासांतील स्वरास गुण होतो. जसें, **नेनिज्** इ०.

४ **ऋ** धातूच्या **इ** अभ्यासाचा **इय्** होतो ( पाठ १३ नि० ८ पहा ).

५ परस्मैपदी व आत्मनेपदी तृतीय पुरुषाच्या बहुवचनी प्रत्ययांतील **न्**चा लोप होतो.

६ प० प० प्र० भू० कालाच्या तृ० पुरुषीं बहुवचनाचा प्रत्यय **उस्** आहे. ह्या **उस्** प्रत्ययापूर्वी अंत्य **आ**चा लोप होतो; आणि धातूचा अंत्य **इ** अ० **ई, उ** अ० **ऊ**, व **ऋ** अ० **ॠ** ह्या स्वरांस गुण होतो [ पृ० ६७ नि० ( १ ) व ( २ ) पहा. ]

**भृ० प० प० वर्तमान.**

| | ए० व० | द्वि० व० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **बिभर्मि** | **बिभृवः** | **बिभृमः** |
| द्वि० पु० | **बिभर्षि** | **बिभृथः** | **बिभृथ** |
| तृ० पु० | **बिभर्ति** | **बिभृतः** | **बिभ्रति** |

**प्रथम भूतकाल.**

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अबिभरम्** | **अबिभृव** | **अबिभृम** |
| द्वि० पु० | **अबिभः** | **अबिभृतम्** | **अबिभृत** |
| तृ० पु० | **अबिभः** | **अबिभृताम्** | **अबिभरुः** |

**आज्ञार्थ.**

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **बिभराणि** | **बिभराव** | **बिभराव** |
| द्वि० पु० | **बिभृहि** | **बिभृतम्** | **बिभृत** |
| तृ० पु० | **बिभर्तु** | **बिभृताम्** | **बिभ्रतु** |

---

* धातूस किंवा त्याचे भागास द्वित्व होऊन जो अधिक वर्ण किंवा वर्णसमुदाय येतो, तो धातूच्या मागें जोडितात. त्यास **अभ्यास** म्हणतात. **मिमा- जिहा, पपा**, यांत **मि, जि** व **प**, हे अभ्यास होत.

**विध्यर्थ.**

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **बिभृयाम्** | **बिभृयाव** | **बिभृयाम्** |
| द्वि० पु० | **बिभृयाः** | **बिभृयातम्** | **बिभृयात** |
| तृ० पु० | **बिभृयात्** | **बिभृयाताम्** | **बिभृयुः** |

नि० १, २ (अ) व नि० ३ प्रमाणें **बिभृ. पित्** प्रत्ययापूर्वी गुण होतो हें लक्षांत आणा ( पृ० १३ नि० ६ पहा ). नि० ५ प्रमाणें **बिभ्रति.**

प्र० भू० तृ० पु० ए० व० **अबिभृ+त्** ; पृ० १३ नि० ६ प्रमाणें **अबिभर्+त्** आणि पृ०६५ नि० १ प्रमाणें **अबिभर--अबिभः**; नि० ६ प्रमाणें तृ० पु० ब० व० **अबिभरुः.**

**तृतीय पुरुष.**

आ० प० वर्तमान **बिभृते** **बिभ्राते** **बिभ्रते**

आ० प० प्र० भू० **अबिभृत** **अबिभ्राताम्** **अबिभ्रत**

**ह्री** प० प० वर्त० **जिह्रेति** **जिह्रीतः** **जिह्रियति** (पृ० ४० नि० ( २ ) पहा. )

**ह्री** प० प० प्र० भू० **अजिह्रेत् अजिह्रीताम् अजिह्रयुः** (नि० ६ प्रमाणें).

७ हलादि **अपित्** प्रत्ययांपूर्वी **मा** व **हा** ' जाणें ' या धातूंतील **आ**च्या जागीं **ई** होते; आणि स्वरादि **अपित्** प्रत्यय लागण्यापूर्वी **आ**चा लोप होतो.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| **मा** आ० प० वर्तमान० तृ० पु० | **मिमीते** | **मिमाते** | **मिमते** |
| **हा** आ० प० ' जाणें ' तृ० पु० | **जिहीते** | **जिहाते** | **जिहते** |
| प्र० भू० तृ० पु० | **अमिमीत** | **अमिमाताम्** | **अमिमत** |
| | **अजिहीत** | **अजिहाताम्** | **अजिहत** |

नि० ३ प्रमाणें **मिमा, ते** हा व्यंजनादि **अपित्** प्रत्यय आहे म्हणून **मा** यांतील **आ** च्या स्थानीं **ई** होऊन **मिमीते** असें झालें. **आते, अते** इ० स्वरादि प्रत्ययांपूर्वी **आ**चा लोप झाला.

८ **हा** ' टाकणें ' या धातूंतील **आ** ह्या वर्णास वरच्या नियमाप्रमाणेंच विकार होतात; परंतु **ई** विकल्पानें ऱ्हस्व होते. विध्यर्थी **यादि** प्रत्यय पुढें असतां **आ**चा लोप होतो, आणि आज्ञार्थी द्वितीय पुरुषाच्या एकवचनी **हि** प्रत्ययापूर्वी **आ** विकल्पानें राहतो म्हणून तीन रूपें होतात. जसें—**जहाहि, जहिहि, जहीहि.**

हा 'टाकणें' प० प० वर्तमान.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | जहामि | जहिवः-जहीवः | जहिमः-जहीमः |
| द्वि० पु० | जहासि | जहिथः-जहीथः | जहिथ-जहीथ |
| तृ० पु० | जहाति | जहितः-जहीतः | जहति |

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० भूत तृ० पु० | अजहात् | अजहिताम्-अजहीताम् | अजहुः |
| आज्ञार्थ तृ० पु० | जहातु | जहिताम्-जहीताम् | जहतु |
| विध्यर्थ तृ० पु० | जह्यात् | जह्याताम् | जह्युः |

९ हलादि **अपित्** प्रत्यय पुढें आले असतां भी धातूंतील **ई** विकल्पानें ऱ्हस्व होते.

( १ ) अंगांत एकाहून अधिक अक्षरें असून पुढें अजादि **अपित्** प्रत्यय आला तर धातूंतील असंयोगपूर्वक **इ** अथवा **ई** त्यांच्या स्थानीं **य्** होतो.

**बिभी** ह्या अंगांत दोन अक्षरें आहेत, म्हणून **बिभी+अति=बिभ्यति** असें होतें. **ह्री** धातूंतील **ई**च्या पूर्वी संयोग आहे म्हणून **जिह्री+अति=जिह्रियति.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| तृ०पु० वर्तमान प०प० | बिभेति | बिभितः-बिभीतः | बिभ्यति |
| तृ०पु० प्र०भू० प०प० | अबिभेत् | अबिभिताम्-अबिभीताम् | अबिभयुः |
| प्र०पु० आज्ञार्थ प०प० | बिभयानि | बिभयाव | बिभयाम |

१० **अपित्** प्रत्यय पुढें असतां **दा** व **धा** धातूंतील अंत्यस्वराचा लोप होतो आणि **स्**, **ध्व्**, **त्** व **थ्** त्यांपूर्वी **धा**चें **धत्** असें रूप होतें. आज्ञार्थी द्वि० पु० ए० व० **देहि** व **धेहि** अशीं रूपें होतात.

धा 'ठेवणें.'

**वर्तमान.**

| | प० प० | | | आ० प० | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए० व० | द्विव० | ब० व० | ए० व० | द्विव० | ब० व० |
| प्र०पु० | दधामि | दध्वः | दध्मः | दधे | दध्वहे | दध्महे |
| द्वि०पु० | दधासि | धत्थः | धत्थ | धत्से | दधाथे | धद्ध्वे |
| तृ०पु० | दधाति | धत्तः | दधति | धत्ते | दधाते | दधते |

## प्रथम भूत.

| | प० प० | | | आ० प० | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए० व० | द्विव० | ब० व० | ए० व० | द्विव० | ब० व० |
| प्र०पु० | अदधाम् | अदध्व | अदध्म | अदधि | अदध्वहि | अदध्महि |
| द्वि०पु० | अदधाः | अधत्तम् | अधत्त | अधत्थाः | अदधाताम् | अधद्ध्वम् |
| तृ०पु० | अदधात् | अधत्ताम् | अदधुः | अधत्त | अदधाताम् | अदधत |

## आज्ञार्थ.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र०पु० | दधानि | दधाव | दधाम | दधै | दधावहै | दधामहै |
| द्वि०पु० | धेहि | धत्तम् | धत्त | धत्स्व | दधाथाम् | धद्ध्वम् |
| तृ०पु० | दधातु | धत्ताम् | दधतु | धत्ताम् | दधाताम् | दधताम् |

## विध्यर्थ.

| | प० प० | | | आ० प० | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र० पु० | दध्याम् | दध्याव | दध्याम | दधीय | दधीवहि | दधीमहि |
| द्वि० पु० | दध्याः | दध्यातम् | दध्यात | दधीथाः | दधीयाथाम् | दधीध्वम् |
| तृ० पु० | दध्यात् | दध्याताम् | दध्युः | दधीत | दधीयाताम् | दधीरन् |

**धद्ध्वम्** इत्यादि रूपांत **त्**चा **द्** झाला. कारण त्यापुढें अनुनासिकाशिवाय मृदु व्यंजन आलें आहे. **अदधुः** ह्या रूपांत पृ० ७१ नि० ६ प्रमाणें आचा लोप झाला. आज्ञार्थी प्रथम पुरुषीं प्रत्यय **ऐ** शिवाय आकारादि आहेत हें ध्यानांत ठेवावें.

**दा** धातूचीं रूपें याचप्रमाणें चालवावीं.

११ ह्या गणांत स्वरादि **पित्** प्रत्यय पुढें असतां धातूच्या उपांत्य ऱ्हस्व स्वरास गुण होत नाहीं. जसें—**नेनिजानि** आज्ञार्थी प्र० पु० ए० व०.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प० प० वर्त० तृ० पु० | नेनेक्ति | नेनिक्तः | नेनिजति |
| आ० प० वर्त० तृ० पु० | नेनिक्ते | नेनिजाते | नेनिजते |

प्रथम पुस्तकाच्या ८८ व्या पानांतील * टिपेंत सांगितल्याप्रमाणें **ति** पूर्वी **ज्**चा **क्** झाला.

| | | | |
|---|---|---|---|
| प० प० प्र० भू० प्र० पु० | अनेनिजम् | अनेनिज्व | अनेनिज्म |
| आ० प० प्र० भू० प्र० पु० | अनेनिजि | अनेनिज्वहि | अनेनिज्महि |
| प० प० आज्ञा० प्र० पु० | नेनिजानि | नेनिजाव | नेनिजाम |
| आ० प० आज्ञा० प्र० पु० | नेनिजै | नेनिजावहै | नेनिजामहै |

हु प० प०

| | | | |
|---|---|---|---|
| वर्त० तृ० पु० | जुहोति | जुहुतः | जुह्वति |
| प्र० भू० तृ० पु० | अजुहोत् | अजुहुताम् | अजुहवुः |

आज्ञार्थी द्वि० पु० ए० व० जुहुधि. येथें हि ह्या प्रत्ययाबद्दल धि प्रत्यय आहे, हा विशेष आहे. पृ० ४० नि० (२) प्रमाणें स्वरादि अपित् प्रत्ययांपूर्वी हु धातूच्या उचा उव् न होतां व् झाला आहे.

मा आ० प०

| | ए० व० | द्वि व० | ब० व० | |
|---|---|---|---|---|
| वर्तमान तृ० पु० | मिमीते | मिमाते | मिमते | (पृ० ७२ |
| प्र० भू० तृ० पु० | अमिमीत | अमिमाताम् | अमिमत | नि० ७ पहा.) |

हा आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| वर्तमान तृ० पु० | जिहीते | जिहाते | जिहते |
| प्र० भू० तृ० पु० | अजिहीत | अजिहाताम् | अजिहत |

पृ० प० प०

| | | | |
|---|---|---|---|
| वर्तमान तृ० पु० | पिपर्ति | पिपृतः | पिप्रति |
| प्र० भू० तृ० पु० | अपिपः | अपिपृताम् | अपिपरुः |

पॄ प० प०

| | | | |
|---|---|---|---|
| वर्तमान तृ० पु० | पिपर्ति | पिपूर्तः | पिपुरति |
| प्र० भू० तृ० पु० | अपिपः | अपिपूर्ताम् | अपिपरुः |

पृ० २ नि० ९ प्रमाणें पॄतील ऋचा उर् झाला.

ऋ प० प०

| | | | |
|---|---|---|---|
| वर्त० तृ० पु० | इयर्ति | इयृतः | इयृरति |
| प्र० भू० तृ० पु० | ऐयः | ऐयृताम् | ऐयरुः |

ऋ—नि० १ प्रमाणें ऋऋ—नि० ३ प्रमाणें इऋ—नि० ४ प्रमाणें इय्+ऋ= इयृ, आ+इयृ=ऐयृ.

विज् प० प०

| | | | |
|---|---|---|---|
| वर्तमान तृ० पु० | वेवेक्ति | वेविक्तः | वेविजति |
| प्र० भू० प्र० पु० | अवेविजम् | अवेविज्व | अवेविज्म |

विज् आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| वर्त० तृ० पु० | वेविक्ते | वेविजाते | वेविजते |

विष्

| | | | |
|---|---|---|---|
| प० प० वर्त० तृ० पु० | वेवेष्टि | वेविष्टः | वेविषति |
| आ० प० वर्त० तृ० पु० | वेविष्टे | वेविषाते | वेविषते |

---

धान्यं मिमीते कुडवेन ।

अग्नौ समिधो जुहोत्यध्वर्युः ।

यथा मे पिता धर्मं न प्रजहातु तथा मे वरं देहि ।

येभ्यः * सर्वे लोका अबिभयुस्तान्राक्षसानरण्ये रामोऽहन् ।

भर्त्रा सह पितुः समीपं गच्छन्ती जिह्रेमीत्यवदच्छकुन्तला ।

कृष्णश्चक्रमबिभर†र्जुनो गाण्डीवं दुर्योधनभीमसेनौ गदामबिभृतामन्ये सर्वे योधाः साधारणं धनुरबिभरुः ।

ब्राह्मणोऽब्राह्मणो वा यः कोपि निर्धनोऽशक्तश्च भवेत्तस्मै धनं दत्त ।

रामभार्यां जहाहि जहिहि जहीहीति त्रिर्बिभीषणो रावणमुपादिशत् ।

यस्मिन्कन्यामलंकृत्य वरमाहूय तस्मै तां ददति स ब्राह्मो विवाह उत्तमफलकः ।

हरिश्चरणयोः प्रक्षिप्तोऽयं पुष्पाणामञ्जलिर्नः कल्याणं विधत्ताम् ।

पुरोहितास्तेषां गृहं गत्वा प्रथमं पादानवानेनिजुः पश्चात्समन्त्रकं कर्म व्यदधुः ।

ददाति द्रविणं भूरि दाति दारिद्र्यमर्थिनाम् ।
सोऽवदायति कीर्तिं च शिरोऽवद्यति विद्विषाम् ॥
संदधाति धनुर्ज्यायां यदैवेषून् रुषान्वितः ।
तदैव तं भयाक्रान्ताः संधियन्ति धराधिपाः ॥
न जहाति सदाचारं स सदा चारणस्तुतः ।
उज्जिहीते जगज्जित्वा तस्य कीर्तिः सुरालयम् ॥
न क्लाम्यति दिनं कृत्स्नं ददानोऽपि धनं बहु ।
न च क्लामति संग्रामे निघ्नन् गजघटाशतम् ॥

---

* भिणें व भयापासून रक्षणें ह्या अर्थाचीं क्रियापदें असल्यास ज्यापासून भीति अथवा ज्याच्या भयापासून रक्षणें विवक्षित असतें त्याचा वाचक शब्द पंचम्यंत असावा.

† प्र० पु० पृ० ६ टीप ‡ पहा.

न्यायप्रवृत्तो नृपतिरात्मानमपि च प्रजाः ।
त्रिवर्गेणोपसंधत्ते निहन्ति ध्रुवमन्यथा ॥
अधर्मान्नात्रसः पाप लोकवादान्न चाबिभेः ॥
दैवाद्बिभीहि काकुत्स्थ जिह्रीहि त्वं तथा जनात् ।
मिथ्या * मामभिसंक्रुध्यन्नवशां शत्रुणा हृताम् ॥
आनन्दं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कदाचन ॥
यद्ददासि विशिष्टेभ्यो यच्चाश्नासि दिने दिने ।
तत्ते वित्तमहं मन्ये शेषं कस्यापि रक्षसि ॥
न बिभेति यदा चायं यदा चास्मान्न बिभ्यति ।
यदा नेच्छति न द्वेष्टि ब्रह्म संपद्यते तदा ॥

---

१ धृतराष्ट्राचे पुत्र गाई सोडून देते झाले (हा) आणि रणभूमीपासून पळते झाले.

२ रामानें शिवधनुष्य लवविलें असतां जनक त्यास आपली कन्या देता झाला (दा).

३ शूर लोक आपल्या शत्रूंस भीत नाहींत (भी).

४ मी आपलें द्रव्य राजपुरुषांनीं नेऊं नये म्हणून त्या घरांत ठेविता झालों (नि+धा).

५ तुमच्या अवघ्या देशाचा नाश न व्हावा म्हणून तुम्ही आपल्या बलवान् शत्रूशीं तह करा (सम्+धा).

६ नागवा तूं इकडे तिकडे फिरावयास लाजत नाहींस काय (ह्री)?

७ स्मृति विधवांचा पुनर्विवाह (करण्यास) सांगतात (वि+धा).

८ गोविंदा गोष्ट सांगत असतां तूं आपले कान कां झांकिता झालास (अपि अ० पि+धा)?

९ स्त्रिया आपल्या अंगावर दागिने घालितात (परि+धा).

१० मनुष्यें मानापासून उद्धतपणा निराळा करोत (वि+विज्).

११ हातपाय धू (अव+निज्) आणि मग संध्या कर.

१२ राजाचे कामदार जमिनीची लांबी मोजिते झाले (मा).

१३ अरण्यवासी लोक आपले तुंबे तलावांत पाण्यानें भरितात (पॄ अ० पॄ).

---

* क्रुध् आणि द्रुह् ह्या धातूंमागें उपसर्ग असतां ज्याविषयीं राग अथवा द्रोह दर्शविणें असेल तद्बोधक शब्द द्वितीयांत योजावा, चतुर्थ्यंत योजूं नये.

# शब्दकोश ११.

## तृतीय गणांतील धातु.

**दा** उ० प० देणें.

**धा** उ० प० धरणें, ठेवणें; **वि+धा** करणें, हुकूम करणें (जसें धर्मसंबंधी ग्रंथांत एखादें कृत्य करण्याविषयीं); **परि+धा** पांघरणें, घालणें (अलंकार); **सम्+धा** तह करणें, योजणें, जोडणें; **उप+सम्+धा** जोडणें, मिळविणें; **अपि** अ० **पि+धा** बंद करणें, लावणें (दरवाजा इ०); **नि+धा** राखणें, ठेवणें; **अव+धा** लक्ष देणें.

**निज्** उ०प० स्वच्छ करणें; **अव+निज्** धुणें.

**पृ** अ० **पॄ** प० प० भरणें.

**भी** प० प० भिणें.

**भृ** उ० प० धारण करणें, पोषण करणें.

**मा** आ० प० मोजणें.

**विज्** उ० प० उप० **वि**, निराळें करणें, भेदाभेद पाहणें.

**विष्** उ० प० व्यापणें, वेढणें.

**हा** आ० प० जाणें; **उद्+हा** वर जाणें.

**हा** प० प० सोडून देणें, टाकणें.

**हु** प० प० होम करणें.

**ह्री** प० प० लाजणें.

---

**अञ्जलि** पु० ओंजळ.

**अन्यथा** अ० अन्य प्रकारानें, नाहीं तर.

**अन्वित** भू०का०धा० **अनु+इ** धातूचें, युक्त, अनुसरला गेलेला.

**अर्थिन्** वि० याचक, भिकारी.

**अवश** वि० पराधीन, दीन.

**अशक्त** वि० निर्बल, असमर्थ.

**उत्तमफलक** वि० (**उत्तम** वि० चांगलें, **फल** न० फळ आणि **क** हा प्रत्यय) ज्याचें फळ किंवा परिणाम चांगला असा.

**काकुत्स्थ** पु० ककुत्स्थ वंशांतील पुरुष, राम.

**कुडव** पु० धान्य मोजण्याचें माप.

**कृ** अव्यय **अलम्**, भूषित करणें.

**कृत्स्न** वि० सर्व.

**क्रुध्** उप० **अभि** आणि **सम्**, रागावणें.

**गजघटाशत** न० (**घटा** स्त्री० समुदाय, **शत** न० शंभर) हत्तीचे शंभर समुदाय.

**गदा** स्त्री० गदा.

**गाण्डीव** न० अर्जुनाच्या धनुष्याचें नांव.

**चारणस्तुत** वि० (**चारण** पु० भाट) भाटानें स्तविलेला.

**त्रिः** अ० तीनदां, तीन वेळां.

**त्रिवर्ग** पु० तीन वस्तूंचा समूह, (म्हणजे **धर्म** पु० वेदांत सांगितलेलें कृत्य, **अर्थ** पु० संपत्ति, **काम** पु० इच्छा, ह्या तीन पुरुषार्थांचा समूह).

**दिनेदिने** क्रि० वि० प्रतिदिवशीं.

**दुर्योधनभीमसेनौ** पु० द्विव० दुर्योधन व भीमसेन (सामासिक शब्द).

**दै** प्र० ग० प० प०, उप० **अव**, स्वच्छ करणें.

**दो** च० ग० प० प०, उप० **अव**, तोडणें, कापणें.

**द्रविण** न० संपत्ति, पैका.

**धनुर्ज्या** स्त्री० (**ज्या** स्त्री० दोरी धनुष्याची) धनुष्याची दोरी.

**धराधिप** पु० (**धरा** स्त्री० पृथ्वी, **अधिप** पु० स्वामी) पृथ्वीचा धनी, राजा.

**धि** ष० ग० प० प०, उप० **सम्**, तह करणें.

**ध्रुवम्** क्रि० वि० निश्चयानें.

**निर्धन** वि० गरीब, द्रव्यहीन.

**न्यायप्रवृत्त** वि० (**न्याय** पु० नीति, **प्रवृत्त** भू० का० धा० **प्र+वृत्** धातूचें) नीतीनें वागणारा.

**पद्** च०ग०आ०प०, उप० **सम्**, होणें.

**प्रादुस्** क्रि० वि० अ० (क्रियापदाशीं जोडितात) उघड, प्रगट.

**बिभीषण** पु० रावणाच्या एका भावाचें नांव.

**ब्राह्म** पु० आठ विवाहप्रकारांपैकीं एक. ह्या प्रकार सध्यां ब्राह्मणांत चालू आहे.

**भयाक्रान्त** वि० (**आक्रान्त** भू० का० धा० क० **आ+क्रम्** ह्या धातूचें, व्यापलेलें) भयव्याप्त.

**मिथ्या** अ० खोटें.

**रामभार्या** स्त्री० रामाची स्त्री.

**रुष्** स्त्री० क्रोध.

**लोकवाद** पु० लोकांनीं दिलेला दोष.

**विद्वस्** (**विद्** जाणणें ह्या धातूचें वर्त० का० धा०) जाणणारा.

**विशिष्ट** वि० सभ्य, शिष्ट.

**व्यास** पु० महाभारत ह्या नांवाचा वीररसप्रधान ग्रंथ रचणारा एक प्रख्यात कवि.

**शकुन्तला** स्त्री० दुष्यंत राजाच्या बायकोचें नांव.

**शेष** पु० न० बाकीचें, इतर सर्व.

**समन्त्रकम्** क्रि० वि० मंत्रासह (मंत्र म्हणून).

**समिध्** स्त्री० उंबर, पळस इत्यादिकांच्या लहान काटक्या. ह्यांचा होम यज्ञसंबंधी अग्नींत करितात.

**साधारण** वि० सामान्य.

**सुरालय** पु० (**सुर** पु० देव, **आलय** पु० राहण्याचें स्थळ) देवाचें राहण्याचें स्थळ, स्वर्ग.

**हन्** उप० **नि**, ठार मारणें.

अंग **शरीर** न०, **देह** पु०.
उद्धतपणा **अविनय** पु०.
तह करणें **सम्+धा.**
तुंबा **कमण्डलु** पु०.
लवविलें **नामित** भू० का० धा० क० **नम्** धातूच्या प्रयोजक रूपाचें; **रामेण धनुषि नामिते** 'रामानें धनुष्य लवविलें असतां.'
नागवा **नग्न** वि०.
नाश झालेला **ध्वस्त** ( **ध्वंस** धातूचें भू० का० धा० ), **उच्छिन्न** (**उद्+छिद्** धातूचें भू० का० धा०क० ).
पळते झाले **परा+अय्** प्र० ग० आ० प० ( येथें **परा**च्या स्थानीं **पला** आदेश होतो ).
मान **मान** पु०.
रणभूमि **समरभूमि** स्त्री०.
लांबी **आयाम** पु०.
अरण्यवासी **वानप्रस्थ** पु०, **यति** पु०.
पुनर्विवाह **पुनरुद्वाह** पु०.
संध्या **संध्यावंदन** न०.

---

## द्वादशः पाठः ।

### सप्तम गण.

१ ह्या गणांतील धातूचा स्वर आणि अंत्य व्यंजन ह्या दोहोंमध्यें **पित्** प्रत्यय पुढें असतां **न** येतो आणि **अपित्** प्रत्यय पुढें असतां **न्** येतो. नवव्या व दहाव्या पाठांत जे नियम सांगितले त्यांसच अनुसरून वर्णसंबंधी बदल होतात.

२ धातूंतील मूळच्या अनुनासिकाचा लोप होतो.

३ हलादि **पित्** प्रत्यय लावणें असल्यास **तृह्**च्या हकारापूर्वी नच्या जागीं **ने** येतो.

रुध् 'प्रतिबंध करणें.'

### परस्मैपद.

#### वर्तमानकाल.

| | ए० व० | द्वि व० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **रुणध्मि** | **रुन्ध्वः** | **रुन्ध्मः** |
| द्वि० पु० | **रुणत्सि** | **रुन्द्धः** | **रुन्द्ध** |
| तृ० पु० | **रुणद्धि** | **रुन्द्धः** | **रुन्धन्ति** |

**रुध्+ति,** वरील नि० १ प्रमाणें **रुणध्+ति,** पृ० ५५ नि० २ प्रमाणें **रुणध्+धि,** पृ० ५७ नि० ६ प्रमाणें **रुणद्+धि=रुणद्धि. रुन्द्धः** इ०

रूपें याचप्रमाणें होतात. रुणत्सि यांत ध् चा त् झाला. प्रथम पुस्तक पृ० ५ टीप* पहा.

### प्रथमभूतकाल.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अरुणधम् | अरुन्ध्व | अरुन्ध्म |
| द्वि० पु० | अरुणः-त्-द् | अरुन्द्धम् | अरुन्द्ध |
| तृ० पु० | अरुणत्-द् | अरुन्द्धाम् | अरुन्धन् |

तृ० पु० ए० व० अरुणध्+त्, पृ० ६५ नि० १ प्रमाणें त् प्रत्ययाचा लोप झाला आणि पृ० ६५ नि० २ प्रमाणें अरुणत्-द् झालें. द्वि० पु० एकवचनांत द्चा विकल्पानें विसर्ग झाला (पृ० ६७ नि० ३ पहा). रुणद्धि प्रमाणेंच अरुन्द्धाम् इत्यादि रूपें होतात.

### आज्ञार्थ.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | रुणधानि | रुणधाव | रुणधाव |
| द्वि० पु० | रुन्द्धि | रुन्द्धम् | रुन्द्ध |
| तृ० पु० | रुणद्धु | रुन्द्धाम् | रुन्धन्तु |

पृ० १३ नि० ४ व पृ० ५६ नि० (१) पहा.

### विध्यर्थ.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | रुन्ध्याम् | रुन्ध्याव | रुन्ध्याम |
| द्वि० पु० | रुन्ध्याः | रुन्ध्यातम् | रुन्ध्यात |
| तृ० पु० | रुन्ध्यात् | रुन्ध्याताम् | रुन्ध्युः |

## आत्मनेपद.

### वर्तमान.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | रुन्धे | रुन्ध्वहे | रुन्ध्महे |
| द्वि० पु० | रुन्त्से | रुन्धाथे | रुन्द्ध्वे |
| तृ० पु० | रुन्द्धे | रुन्धाते | रुन्धते |

### प्रथमभूत.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अरुन्धि | अरुन्ध्वहि | अरुन्ध्महि |
| द्वि० पु० | अरुन्द्धाः | अरुन्धाथाम् | अरुन्द्ध्वम् |
| तृ० पु० | अरुन्द्ध | अरुन्धाताम् | अरुन्धत |

**आज्ञार्थ**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | रुणधै | रुणधावहै | रुणधामहै |
| द्वि० पु० | रुन्त्स्व | रुन्धाथाम् | रुन्द्ध्वम् |
| तृ० पु० | रुन्धाम् | रुन्धाताम् | रुन्धताम् |

**विध्यर्थ**

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | रुन्धीय | रुन्धीवहि | रुन्धीमहि |
| द्वि० पु० | रुन्धीथाः | रुन्धीयाथाम् | रुन्धीध्वम् |
| तृ० पु० | रुन्धीत | रुन्धीयाताम् | रुन्धीरन् |

**अञ्ज्** प० प०

वर्त० तृ० पु० ए० व० **अनक्ति,** ह्याच पाठांतील नि० २ प्रमाणें अनुनासिक गेला आणि प्रथम पुस्तक पृ० ८८* टीपेप्रमाणें **ज्**चा **क्** झाला.

प्र० भू० तृ० पु० ए० व० **आनक्-ग्.** आज्ञार्थी द्वि० पु० ए० व० **अङ्ग्धि.**

**पिष्** प० प०

वर्त० तृ० पु० ए० व० **पिनष्टि,** प्र० पुस्तक पृ० २१ *टीपप्रमाणें **ति** ची **टि** झाली.

आज्ञार्थी द्वि० पु० ए० व०, पृ० ५६ नि० (१) प्रमाणें **पिष्+धि,** पृ० ८० नि० १ प्रमाणें **पिन्ष्+धि,** प्रथम पुस्तक पृ० २१ * टीपेप्रमाणें **पिन्ष्+ढि,** पृ० ५७ नि० ६ प्रमाणें **पिन्ड्+ढि,** पृ० ५७ नि० ८ प्रमाणें **पिण्ड्ढि.**

प्र० भू० तृ० पु० ए० व०, पृ० ८० नि० १ व पृ० ६५ नि० १ प्रमाणें **अपिनष्** आणि पृ० ६५ नि० २ प्रमाणें **अपिनट्-ड्.**

**रिच्** प० प०

वर्त० तृ० पु० ए० व० **रिणच्+ति,** प्र० पु० पृ० ८८ *टीपेप्रमाणें **रिणक्+ति=रिणक्ति.** आज्ञार्थी द्वि० पु० ए० व० **रिङ्ग्धि.** प्र० भू० तृ० पु० ए० व० **अरिणक्+ग्.**

**भिद्** प० प०

वर्त० तृ० पु० ए० व० **भिनत्ति,** आज्ञार्थी द्वि० पु० ए० व० **भिन्द्धि.** प्र० भू० द्वि० पु० ए० व० **अभिनः-त्-द्.**

**हिंस्** प० प०

आज्ञार्थी द्वि० पु० ए० व० **हिन्धि,** पृ० ३९ नि० ( १ ) प्रमाणें **स्**चा

लोप झाला. प्र० भू० तृ० पु० ए० व० **अहिनत्-द्**, द्वि० पु० ए० व० **अहिनः-त्-द्**, पृ० ६७ नि० ४ पहा.

तृह् प० प०

वर्त० तृ० पु० ए० व०, पृ० ८० नि० ३ प्रमाणें **तृणेह्+ति=तृणेढ्+ति=तृणेढ्+धि=तृणेढ्+ढि=तृणेढि** हें रूप पृ० ५५ ह्यांतील **लेढि** ह्या रूपाप्रमाणें तयार करावयाचें; द्विवचन **तृण्ढः**; पृ० ५७ नि० ८ प्रमाणें **तृ+न्+ह्+अन्ति=तृंहन्ति.** असेंच **अतृणेट्** हें **अलेट्** प्रमाणें तयार करावें.

---

दीनाय याचमानाय धनं ददतं मां मा रुन्द्धि पापमेव तस्मात्त्वामाश्रयेत् ।

किर्मीरस्य शरीरं चूर्णवदपिनड्भीमसेनः ।

रिपोः करिणां गण्डस्थलान्यभिन्दन्त वीराः ।

अद्यप्रभृति त्वां कोशागारे नियुनज्मि तदात्मनोऽधिकारेऽप्रमत्तो भव ।

तस्यां तवानुरागमस्माकं पुरो व्यर्थं किं व्यनक्षि किं तेन लभेथाः तामेव गच्छ ।

अरण्ये केचित्पशवोऽन्यान्हिंसन्त्यतस्तान्हिंस्रान्ब्रुवन्ति ।
रेरे पान्था जाले निपतितोऽहम् । अत्रागत्य मे पाशांश्छिन्त्त ।
यत्किंचिल्लभसे तद्भुञ्जीथाः । अन्यस्य कस्यचिद्धनं मा गृध्य ।
न हिंस्यात्सर्वाणि भूतानीत्येतं विधिमक्षरशो जैना अनुसरन्ति ।
स्वगृहमागतमर्थिनं रघुः कियद्धस्विष्यते त्वयेत्यन्वयुङ्क्त ।

रात्रौ नाभुञ्जि मह्यं किंचिद्भक्षयितुं देहि ।
वेत्ति सर्वाणि शास्त्राणि गर्वस्तस्य न विद्यते ।
विन्त्ते धर्मं सदा सद्भिस्तेषु पूजां च विन्दति ॥
वृणक्ति वृजिनैः सङ्गं वृक्ते च वृषलैः सह ।
वर्जेत्यनार्जवोपेतैः स वर्जयति दुर्जनैः ॥
न संपृणक्ति कृपणैः संपृक्ते न पृथग्जनैः ।
संपर्चति सदाचारैः संपर्चयति पण्डितैः ॥
नियुङ्क्ते गुल्मपालान् स नियोजति नियोगिनः ।
नियोजयत्यनीकस्थान् स्वयं चात्मनि युज्यते ॥

न हिनस्ति वृथा जन्तूंस्तृणान्यपि न हिंसति ।
तमेव हिंसयत्येकं यस्तदाज्ञां विलङ्घते ॥
खिद्यतेऽसौ न भृत्येषु याचकेषु न खिन्दति ।
खिन्त्ते तेष्वेव ये द्रव्यं दीयमानं न गृह्णते ॥
प्रणिङ्क्ते दक्षिणीयानां विप्राणां चरणौ च सः ।
यत्पादौ मुकुटज्योत्स्नाजलैर्नेनेक्ति राजकम् ॥
छिनत्ति संशयं शास्त्रे विदुषां सूक्तिभिस्सदा ।
छेदयत्यासिधाराभिर्विद्विषां मस्तकं च सः ॥
मनो नोद्विजते तस्य ददतोर्थमहर्निशम् ।
उद्विनक्ति तु संसारादसारात्तत्त्ववेदिनः ॥
केचित् द्युम्नाय धावन्ति प्रद्युम्नाय च केचन ।
नोद्युङ्क्ते कोपि धर्माय सर्वाभिप्रेतहेतवे ॥
पीडाकरममित्राणां कर्तव्यमिति शक्रजित् ।
अब्रवीत् खड्गकृष्टश्च तस्या मूर्धानमच्छिनत् ॥
तृणेह्मि देहमात्मीयं त्वं वा न ददासि चेत् ॥
कामान्दुग्धे विप्रकर्षत्यलक्ष्मीं ीर्तिं सूते दुष्कृतं या हिनस्ति ।
तां चाप्येतां मातरं मङ्गलानां धनुं धीराः सूनृतां वाचमाहुः ॥

---

१ जर हरि मला प्रतिबंध ( रुध् ) करणार नाहीं तर मी त्या झाडाची फांदी तोडीन ( छिद् ).

२ आपल्या आजारी भावास देण्याकरितां तो तीं औषधें कुटिता झाला ( क्षुद् ).

३ विश्रामबागेंत शेवटल्या ब्राह्मणराजाबरोबर पुष्कळ ब्राह्मण प्रतिदिवशीं जेवीत असत ( भुज् ).

४ वावटळ झाडें व घरें मोडिते ( भुञ्ज् ).

५ मीं आपलीं दुःखें त्यास (त्यापुढें ) उघड करून सांगितलीं ( उघड केलीं ) ( वि+अञ्ज् ) तेव्हां त्याचें अंतःकरण द्रवलें.

६ तो शूर व चतुर आहे, आपण त्यास सेनापतीचे जागेवर नेमावें ( नि+युज् ).

७ तुम्ही मला काशीस जाण्यास प्रतिबंध कां करितां ( रुध् ) ?

८ तूं नेहमीं कोठें व केव्हां जेवतोस ( भुज् आ० प० ) ?

९ हिंदुस्थानांत आपण हातांनीं धान्य दळितों ( पिष् ) आणि इंग्लंडांत तें यंत्रांनीं दळितात.

१० मी मंत्र्याच्या जागेवर कोणास नेमूं ( नि+युज् ) ?

११ मी पशूंच्या भिन्न भिन्न जाति आतां तपशीलवार सांगतों ( वि+शिष् ).

१२ त्याच्या उत्कर्षाच्या सर्व आशा मोडूं नका ( भञ्ज् ).

१३ मुसलमान साकेत घेरिते झाले ( रुध् ).

---

# शब्दकोश १२.

## सप्तम गणांतील धातु.

**अञ्ज्** प० प० लेपन करणें; **वि+अञ्ज्** उघड करणें.

**इन्ध्** आ० प० पेटविणें.

**क्षुद्** उ० प० कुटणें, पीठ करणें.

**खिद्** आ० प० खेद पावणें, दुःखी होणें.

**छिद्** उ० प० कापणें.

**तृह्** प० प० ठार मारणें, नाहींसें करणें.

**पिष्** प० प० दळणें, पीठ करणें.

**पृच्** प० प० उप० **सम्**, समागम करणें, संबंध ठेवणें.

**भञ्ज्** प० प० मोडणें, नाश करणें.

**भिद्** उ० प० चिरणें, विदारणें.

**भुज्** प० प० उपभोग करणें; आ० प० खाणें, जेवणें.

**युज्** उ० प० जोडणें; **अनु+युज्** प्रश्न करणें; **नि+युज्** नेमणें; **उद्+युज्** उद्योग करणें.

**रिच्** उ० प० रिकामें करणें.

**रुध्** उ० प० अडथळा करणें, वेढा घालणें.

**विज्** प० प० उप० **उद्**, कांपणें, भिणें, त्रासणें.

**विद्** आ० प० विचार करणें, वाटाघाट करणें.

**वृज्** प० प० टाळणें, चुकविणें.

**शिष्** प० प० निराळा करणें; **वि+शिष्** तपशीलवार सांगणें.

**हिंस्** प० प० ठार मारणें, नाश करणें.

---

**अक्षरशः** अ० प्रत्येक अक्षरार्थास अनुसरून, पूर्णपणें.

**अगार** न० घर.

**अद्यप्रभृति** क्रि० वि० ( **अद्य** आज, आणि **प्रभृति** पासून ) आजपासून.

**अधिकार** पु० हुद्दा, काम.

**अनार्जवोपेत** वि० ( **अन्** अभाव, **आर्जव** न० सरळपणा, **उपेत** भू० का० धा० क० **उप+इ** ह्या धातूचें, युक्त ) ज्याचे आंगीं सरळपणा नाहीं असा, खटपटी.

**अनीकस्थ** वि० ( **अनीक** न० सैन्य, **स्था** उभें राहणें ) सैन्यांतील शिपाई.

**अन्य** सर्व० दुसरा.

**अप्रमत्त** वि० ( **अ** आणि **प्रमत्त** असावध ) व्यवस्थित, सावध.

**अर्थिन्** पु० याचक.

**अलक्ष्मी** स्त्री० दुर्दैव, गरिबी.

**असार** वि० ( **सार** पु० मुख्यांश ) निरुपयोगी, निस्सार.

**असिधारा** स्त्री० ( **धारा** स्त्री० कड, धार ) तरवारीची धार.

**अहर्निशम्** क्रि० वि० रात्रंदिवस.

**आत्मीय** वि० स्वतांचा.

**काम** पु० इच्छा.

**कियत्** वि० किती.

**किर्मीर** पु० एका राक्षसाचें नांव.

**कृपण** वि० हलकट, हलक्या मनाचा, अदत्त.

**कृष्** प्र० ग० प० प० ओढणें; **वि+प्र +कृष्** कमी करणें, निकृष्ट स्थितीला नेणें.

**कोशागार** न० जामदारखाना.

**खड्गकृष्ट** वि० ( **खड्ग** पु० तरवार ) ज्यानें तरवार उपसली आहे असा.

**खिद्** च० ग० आ० प० आणि ष० ग० प० प० खेद पावणें, दुःखी होणें.

**गण्डस्थल** न० गंडस्थळ ( हत्तीचें ).

**गुल्मपाल** पु० ( **गुल्म** पु० किल्ला ) किल्ल्याचा रक्षक.

**गृध्** च० ग० प० प० हावरेपणा करणें.

**चूर्ण** पु० न० पीठ; **चूर्णवत्** पिठाप्रमाणें.

**चेत्** अ० जर.

**छिद्** द० ग० कापणें, विभागणें.

**जैन** पु० जिनमतानुयायी, जैन लोकांतील एक.

**तत्त्ववेदिन्** वि० खरें जाणणारा, शास्त्रतत्त्व जाणणारा.

**दक्षिणीय** वि० दक्षिणा घेण्यास योग्य.

**दीन** वि० गरीब.

**दुष्कृत** न० दुष्कृत्य, दुष्टपणा, पाप.

**द्युम्न** न० द्रव्य.

**निज्** द्वि० ग० आ०प० उप० **प्र**, धुवून स्वच्छ करणें.

**नियोगिन्** पु० प्रधान, कामदार.

**पान्थ** पु० वाटसरू, प्रवासी, पथिक.

**पाश** पु० जाळें, फांस.

**पीडाकर** वि० दुःख देणारें.

**पृच्** प्र० ग० प० प०, द्वि० ग० आ० प० आणि द० ग० उप० **सम्**, संगति करणें, संबंध ठेवणें.

**पृथग्जन** पु० हलकट मनुष्य.
**प्रद्युम्न** पु० मदन.
**मङ्गल** न० कल्याण.
**मस्तक** पु० न० डोकें.
**मुकुटज्योत्स्नाजल** न० (**मुकुट** न० किरीट, मुगुट ) मुकुटाची कांति हेंच पाणी.
**मूर्धन्** पु० डोकें.
**यत्पाद** पु० ज्याचा पाय.
**युज्** च० ग० आ० प० मन आवरून धरणें.
**युज्** प्र० ग० प० प० आणि द० ग० जोडणें; **नि+युज्** नेमणें.
**राजक** न० राजांचा समूह, सर्व राजे.
**विज्** ष० ग० आ० प० उप० **उद्**, कांपणें, भिणें.
**विप्र** पु० ब्राह्मण.
**वृज्** प्र०ग०प० प०, द्वि० ग० आ० प० आणि द० ग० टाळणें, चुकविणें.
**वृजिन** पु० दुष्ट मनुष्य.
**वृथा** अ० व्यर्थ.
**वृषल** पु० शूद्र, पापी.
**शक्रजित्** पु० इन्द्राचा पराजय करणारा; रावणाचा मुलगा.
**श्रि** प्र० ग० उ० प० सेवा करणें; **आ+श्रि** चिकटून राहणें, आश्रय करणें.
**सदाचार** वि० ( **सत्** वि० चांगलें, **आचार** पु० वर्तन ) ज्याचें वर्तन चांगलें असा.
**सर्वाभिप्रेतहेतु** पु० ( **अभिप्रेत** भू० का० धा० क० **अभि+प्र+इ** धातूचें, इच्छिलेलें ) सर्व इच्छिलेल्या पदार्थांचें कारण.
**सूक्ति** स्त्री० ( **सु** चांगली, **उक्ति** स्त्री० भाषण ) चांगलें भाषण, खरें विवरण.
**सूनृत** वि० प्रिय.
**हिंस्** प्र० ग० प० प० आणि द० ग० ठार मारणें, नाश करणें.
**हिंस्र** वि० हिंसक.

---

आजारी **रोगार्त** वि०, **रुग्ण** वि०.
उत्कर्ष **अभ्युदय** पु०.
औषध **ओषधि** स्त्री०.
खांदी **शाखा** स्त्री०.
चतुर **चतुर** वि०, **कुशल** वि०.
जागा **अधिकार** पु०, **पद** न०.
द्रवलें **दयार्द्र** वि० ( **दया+आर्द्र** ओलें ).
नेहमीं **प्रायः** अ०, **प्रायेण** अ०.
पशु **पशु** पु०.
ब्राह्मण राजा **ब्राह्मणराज** पु०.
भिन्नभिन्न **विविध** वि०.
मंत्री **मंत्रिन्** पु०, **धीसचिव** पु०.
वावटळ **चक्रवात** पु०, **झंझावात** पु०.
विश्रामबाग ( म्ह० विश्रामबागेंतील वाडा ) **विश्रामप्रासाद** पु०.
साकेत **साकेत** न० ( एका गांवाचें नांव ).

---

# त्रयोदशः पाठः ।

## आर्धधातुक प्रकार.

### द्वितीय भूत अ० अनद्यतनपरोक्ष भूत.

१ **सामान्य नियम**–कितीएक सिद्ध* धातूंस य् शिवाय करून व्यंजनादि आर्धधातुक प्रकारांनीं प्रत्यय लावणें असल्यास त्या प्रत्ययांपूर्वी इ आगम होतो. इ आगम होणाऱ्या धातूंस **सेट्** ( **स+इट्=सेट्** ) आणि बाकीच्यांस **अनिट्** ( **अन्+इट्=अनिट्** ) असें म्हणतात. **अनिट्** धातूंच्या संख्येपेक्षां **सेट्** धातूंची संख्या फार मोठी आहे, परंतु **अनिट्** धातु फार महत्वाचे आहेत. कारण काव्यादिकांत त्यांचा प्रयोग विशेष आढळतो. †

**परस्मैपद.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अ | व | म |
| द्वि० पु० | थ | अथुस् | अ |
| तृ० पु० | अ | अतुस् | उस् |

* ज्यांत एकच स्वर असतो असे मूळचे धातु त्यांस **सिद्ध** म्हणतात. दहाव्या गणांतील धातु ( जसें–चोरय, कथय ), प्रयोजक धातु इत्यादिकांस **साधित** म्हणतात व ते नेहमीं **सेट्** असतात.

† **सेट्** व **अनिट्** यांतील भेद दाखविणाऱ्या कारिका खालीं लिहिल्या आहेत. त्या विद्यार्थ्यांनीं तोंडपाठ कराव्या. कारण धातूंच्या लांब यादीपेक्षां कारिका ध्यानांत ठेवणें सुलभ आहे.

ऊदॄदन्तैर्यौतिरुक्ष्णुशीस्नुनुक्षुश्विडीङ्श्रिभिः । वृङ्वृञ्भ्यां च विनैकाचोऽजन्तेषु निहताः स्मृताः ॥

अर्थ—ऊकारांत, ॠकारांत आणि **यु** ( द्वि० ग० ), **रु**, **क्ष्णु**, **शी**, **स्नु**, **नु**, **क्षु**, **श्वि**, **डी**, **श्रि**, **वृङ्** आणि **वृञ्** हे धातु **सेट्** आहेत, बाकी राहिलेले सर्व एकाच् अजंत धातु **अनिट्** आहेत; **डीङ्** डी ‘ उडणें ’ आ० प०, **वृङ्** वृ आ० प०; **वृञ्** वृ उ० प०.

शक्लृ पच् मुचि रिच् वच् विच् सिच् प्रच्छि त्यज् निजिर् भजः । भञ्ज् भुज् भ्रस्ज् मस्जि यज् युज् रुज् रञ्ज् विजिर् स्वञ्जि सञ्ज् सृजः ॥ अद् क्षुद् खिद् छिद् तुदि नुदः पद्य भिद् विद्यतिर् विनद् । शद् सदी स्विद्यति स्कन्दि हदी क्रुध् क्षुधि बुध्यती । बन्धिर् युधि रुधी राधि व्यध् शुधः साधि सिध्यती ॥ मन्य

३ द्वितीय भूतांत फक्त **थ, व** आणि **म** ह्या तीन प्रत्ययांपूर्वी **इ** आगम संभवतो. ( अ ) **कृ, सृ, भृ, वृ***, **स्तु, द्रु, स्रु** आणि **श्रु**, ह्या धातूंपुढील प्रत्ययांमागें **इ** आगम होत नाहीं. ( ब ) बाकीच्या सर्व धातूंपुढील **थ, व** आणि **म** ह्या प्रत्ययांपूर्वी **इ** आगम होतो; परंतु ( क ) **अनिट्** ऱ्हस्व **ऋ**कारांत धातूंपुढील **थ** पूर्वी **इ** आगम होत नाहीं. ( ड ) **अनिट्** अजंत धातु आणि ज्यांत **अ** आहे असे **अनिट्** धातु त्यांपुढील **थ** पूर्वी **इ** आगम विकल्पानें होतो.

## आत्मनेपद.

| | ए० व० | द्वि व० | ब० व |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **ए** | **वहे** | **महे** |
| द्वि० पु० | **से** | **आथे** | **ध्वे** |
| तृ० पु० | **ए** | **आते** | **इरे** |

४ विद्यार्थ्यांच्या ध्यानांत येईल कीं, तृतीय पुरुषीं एक वचनाचे व बहुवचनाचे प्रत्यय शिवाय करून हे प्रत्यय दुसऱ्या वर्गांतील गणांच्या वर्तमानकाळाच्या आ० प० प्रत्ययांप्रमाणेंच आहेत. **अ** अथवा **आ** शिवाय करून **ध्वे** पूर्वी ( **इ** आगमावांचून ) कोणताहि स्वर आला तर **ध्वे**चा **ढ्वे** होतो. **ध्वे** पूर्वी **इ** आगम होत असल्यास आणि त्या **इ** पूर्वी **य्, र्, ल्, व्**, अ० **ह्** असल्यास **ध्वे**चा **ढ्वे** विकल्पानें होतो.

---

हन्नाप् क्षिप् छुपि तप् तिपस्तृप्यति दृप्यती ॥ लिप् लुप् वप् शप् स्वप् सृपि यभ् रभ् लभ् गम् नम् यमो रमिः ॥ क्रुशिर् दंशि दिशी दृश् मृश् रिश् रुश् लिश् विश् स्पृशः कृषिः । त्विष् तुष् द्विष् दुष् पुष्य पिष् विष् शिष् शुष् श्लिष्यतयो घसिः ॥ वसतिर् दह् दिहि दुहो नह् मिह् रुह् लिह् वहिस्तथा । अनुदात्ता हलन्तेषु धातवो द्व्यधिकं शतम् ॥

ह्या कारिकांत **अनिट्** धातु सांगितलेले आहेत. छंदासाठीं कोठें धातूंस **इ** हा वर्ण लाविला आहे. आणि कोठें कोठें तृ० पु० ए० व० लिहिलें आहे. शेवटच्या ओळींत अनुदात्त म्हटलें आहे, त्याचा अर्थ **अनिट्** धातु असा समजावा.

वरच्या कारिकांत जे **सेट्** व **अनिट्** ह्यांविषयीं विचार सांगितले, ते बहुधा आर्धधातुक प्रकारांत लागू पडतात. परंतु कांहीं बाबतींत त्यामध्यें फेरफार होतो. द्वितीय भूतकाळीं जे जे फेरफार होतात ते ते वर सांगितले आहेत.

* या धातूचें द्वि० पु० ए० व० **ववरिथ** असें होतें.

५ वर सांगितलेल्या आठ धातूंखेरीज सर्व धातूंपुढील **इ** आगम होणाऱ्या प्रत्ययांपूर्वी **इ** आगम अवश्य होतो.

६ **गुप्** ( प्र० ग० प० प० ), **त्रप्**, **सिध्** प्र० ग० 'सिद्धी पावणें' अ० 'व्यवस्था करणें,' **क्षम्***, **मृज्**, **क्लिद्**, **अञ्ज्**, **स्यन्द्**, **कृप्**, **गुह्**, **गाह्**, **रध्**, **नश्**, **तृप्**, **द्रुह्**, **मुह्**, **स्नुह्**, **स्निह्**, **अश्**, 'व्यापणें' इ० धातु जसे आर्धधातुक प्रकारांत विकल्पानें **सेट्** आहेत, तसेच द्वितीय भूतांतही आहेत. **स्वृ**† **सू** ( द्वि० ग० व च० ग० ), **धू** ( पं० ग० व न० ग० ) विकल्पानें **सेट्** आहेत, परंतु द्वितीय भूतांत **थ** ह्या प्रत्ययास **इ** हा आगम विकल्पें होतो व इतरांस नित्य होतो.

७ **अंग**—११ व्या पाठांत सांगितल्याप्रमाणें धातूंतील आदि व्यंजनास आणि त्या पुढील स्वरास द्वित्व होतें. स्वरादि धातूच्या फक्त स्वरासच द्वित्व होतें.

८ अभ्यासाच्या **इ** अथवा **उ** पुढें विजातीय स्वर असल्यास त्या **इ**चा **इय्** व **उ**चा **उव्** होतो. गुण किंवा वृद्धि न होतां जेव्हां सजातीय स्वर राहतात, तेव्हां त्या दोनही सजातीय स्वरांचा एक दीर्घ स्वर होतो. द्वितीय भूतांत **अपित्** प्रत्ययापूर्वी **इ** "जाणें" ह्या धातूचा अभ्यास दीर्घ होतो.

नि० ७ प्रमाणें **उख्**चें **उउख्**–खालचा नि० ९ ह्याप्रमाणें **उओख्** व ह्या नियमाप्रमाणें **उवोख्**. त्याचप्रमाणें **इष्–इइष्**, **इएष्–इयेष्**. जेव्हां गुण होत नाहीं तेव्हां **उख्–उउख्–ऊख्**, व **इष्–इइष्–ईष्** होतें. तसेंच **इ-इइ-ईइ**; पृ० ४२ नि० १० प्रमाणें शेवटच्या **इ**चा **य्** झाल्यानें **ईयतुः–ईयुः**.

९ परस्मैपदी द्विवचन व बहुवचन ह्यांचे प्रत्यय आणि आत्मनेपदी सर्व प्रत्यय **अपित्** आहेत. प० प० एकवचनाचे प्रत्यय **पित्** आहेत. ( अ ) **पित्** प्रत्ययांपूर्वी उपांत्य ऱ्हस्व स्वरास गुण होतो. ( **ब** ) प्रथम पुरुषाच्या एकवचनाचा प्रत्यय लावण्यापूर्वी धातूंच्या अंत्य स्वरास आणि उपांत्य **अस** विकल्पानें वृद्धि होते, आणि तृतीय पुरुषीं एकवचनाच्या प्रत्ययापूर्वी ती अवश्य होते. ( **क** ) द्वितीय पुरुषीं एकवचनीं प्रत्यय लावण्यापूर्वी धातूंच्या अंत्य स्वरास गुण होतो आणि उपांत्य **अस** कांहीं विकार होत नाहीं.

---

* जेव्हां ह्या धातूस **इ** आगम होत नाहीं तेव्हां प्रथम पुरुषाचें द्विवचन व बहुवचन ह्यांचीं रूपें **चक्षण्वहे, चक्षण्महे** अशीं होतात, म्हणजे **म्**चा **ण्** होतो. नियम असा आहे कीं **व्** अथवा **म्** पुढें असतां धातूंच्या अंत्य **म्**चा **न्** होतो.

† **स्वृ** धातु द्वितीय भविष्य व संकेतार्थ ह्यांत **सेट्**च असतो,

बुध् प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | बुबोध | बुबुधिव | बुबुधिम |
| द्वि० पु० | बुबोधिथ | बुबुधथुः | बुबुध |
| तृ० पु० | बुबोध | बुबुधतुः | बुबुधुः |

नि० ७ प्रमाणें बुध्-बुबुध्, नि० ९ (अ) प्रमाणें बुबोध्-बुबोध, बुबुधिव नि० ३ (ब) पहा.

बुध् आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | बुबुधे | बुबुधिवहे | बुबुधिमहे |
| द्वि० पु० | बुबुधिषे | बुबुधाथे | बुबुधिध्वे |
| तृ० पु० | बुबुधे | बुबुधाते | बुबुधिरे |

कृ प० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | चकार-चकर | चकृव | चकृम |
| द्वि० पु० | चकर्थ | चक्रथुः | चक्र |
| तृ० पु० | चकार | चक्रतुः | चक्रुः |

कृ-कृकृ-चकृ (पृ० ७०-७१ नि० २ (ब) आणि नि० २ (इ) पहा). चकार्-चकर् (वरचा नि० ९ (ब) पहा.). चकार-चकर, चकृव, चकर्थ इ० (पृ० ८९ नि० ३ (अ) पहा).

कृ आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | चक्रे | चकृवहे | चकृमहे |
| द्वि० पु० | चकृषे | चक्राथे | चकृढ्वे |
| तृ० पु० | चक्रे | चक्राते | चक्रिरे |

ढ्वेबद्दल पृ० ८९ नि० ४ पहा.

नी उ० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | निनाय-निनय | निन्यिव | निन्यिम |
| द्वि० पु० | निनयिथ-निनेथ | निन्यथुः | निन्य |
| तृ० पु० | निनाय | निन्यतुः | निन्युः |

नी-पृ० ९० नि० ७ प्रमाणें नीनी-पृ० ७१ नि० २ (इ) प्रमाणें निनी-पृ० ९० नि० ९ (ब) प्रमाणें निनै-निनाय तृ० पु० ए० व०; निनी-

पृ० ७३ नि० ( १ ) प्रमाणें **निन्यतुः. निनयिथ-निनेथ** ह्यांविषयीं वरील नि० ९ ( क ) आणि पृ० ८९ नि० ३ ( ड ) पहा.

आ० प० प्र० पु० **निन्ये-निन्यिवहे-निन्यिमहे** इ०.

**गद्** प० प० तृ० पु० **जगाद-जगदतुः-जगदुः** इ०.

१० ह्या कालांत **अपित्** प्रत्ययापूर्वीही संयोगपूर्वक ऋकारांत धातूंच्या ऋस आणि धातूंच्या अंत्य ( दीर्घ ) ॠस आणि **जागृ** व **ऋ** ह्या धातूंच्या ऋकारास गुण होतो. त्याचप्रमाणें (म्ह० **अपित्** प्रत्ययापूर्वीही ) **शॄ, दॄ** व **पॄ** ह्यांच्या ॠकारास गुण ( **अर्** ) विकल्पानें होतो; आणि जेव्हां गुण होत नाहीं, तेव्हां ह्या धातूंतील स्वर ऱ्हस्व होतो. **ऋच्छ्** धातूच्या ऋस गुण होतो. जसें—**आनर्च्छ.**

**स्मृ** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **सस्मार-सस्मर** | **सस्मरिव** | **सस्मरिम** |
| द्वि० पु० | **सस्मर्थ** | **सस्मरथुः** | **सस्मर** |
| तृ० पु० | **सस्मार** | **सस्मरतुः** | **सस्मरुः** |

पृ० ७० नि० २ ( क ) आणि पृ० ८९ नि० ३ ( ब ) आणि ( क ) पहा. **शशार, शशरतुः–शश्रतुः, शशरुः–शश्रुः** इ०.

११ **कुट्, स्फुट्, त्रुट्, स्फुर्, नू** आणि **धू** वगैरे सहाव्या गणांतील धातूंच्या स्वरांस **गुण** किंवा **वृद्धि पित्** प्रत्यय पुढें असतांही होत नाहीं; परंतु द्वितीयभूतांत तृतीय व प्रथम पुरुष ह्यांच्या एकवचनाचा प्रत्यय पुढें असतां, प्रयोजकरूपांतील **अय** पुढें असतां, व कर्मणि तृतीयभूतांत तृतीय पुरुषाचा एकवचनी प्रत्यय **इ** पुढें असतां **गुण** किंवा **वृद्धि** होते. जसें—**तुत्रोट** तृ० पु० ए० व०, **तुत्रुटिथ;** त्याचप्रमाणें द्वितीय भूताच्या प्रथम पुरुष एकवचनाचा प्रत्यय पुढें असतां या धातूंपैकीं वृद्धि होऊं शकणाऱ्या धातूंची विकल्पें फक्त वृद्धि होते, गुण होत नाहीं, व इतरांचा विकल्पें गुण होतो, **नुनाव** अ० **नुनुव, चुकोट** अ० **चुकुट.**

१२ **अस्** व **ब्रू** हे धातु *गौण आहेत, कारण आर्धधातुक प्रकारांत यांचीं रूपें होत नाहींत.

१३ आकारांत धातूंविषयीं:—( अ ) ह्यांचा प्रथम पुरुषीं व तृतीय पुरुषीं एकवचनी परस्मैपदी प्रत्यय जो अ त्यास **औ** आदेश होतो. ( ब ) स्वरादि **अपित्** प्रत्ययांपूर्वी आणि **इ** आगम होणाऱ्या प्रत्ययांपूर्वी ह्यांच्या अंत्य **आ**चा लोप होतो.

---

* सर्व प्रकारांत न चालणारे.

**ज्ञा प० प०**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **जज्ञौ** | **जज्ञिव** | **जज्ञिम** |
| द्वि० पु० | **जज्ञिथ-जज्ञाथ** | **जज्ञथुः** | **जज्ञ** |
| तृ० पु० | **जज्ञौ** | **जज्ञतुः** | **जज्ञुः** |

**ज्ञा-ज्ञज्ञा-जज्ञा**, अ प्रत्ययाच्या स्थानीं **औ** आल्यानें **जज्ञौ** झालें. **इथ** प्रत्ययापूर्वी ( पृ० ८९ नि० ३ (**ड**) पहा ) आणि स्वरादि प्रत्ययांपूर्वी आचा लोप झाल्यानें **जज्ञ्+इथ-जज्ञिथ, जज्ञथुः इ०.**

१४ धातूंच्या अंतीं असणारे **ए, ऐ** व **ओ** ह्यांच्या स्थानीं सार्वधातुक प्रकारांचे आणि वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणाचे प्रत्यय शिवाय करून सर्व प्रत्ययांपूर्वी **आ** हा आदेश होतो.

**ग्लै**-तृ० पु० **जग्लौ, जग्लतुः, जग्लुः**; द्वि० पु० **जग्लिथ, जग्लाथ इ०.**

१५ (**अ**) **भू** धातूस द्वित्व होऊन **बभूव्** असें रूप होतें. (**ब**) द्वितीय भूतकाळीं **जि** धातूंतील **ज्**च्या जागीं **ग्**, **हि** धातूंतील **ह्**च्या जागीं **घ्** होतो, आणि **चि** धातूंतील **च्**च्या स्थानीं **क्** विकल्पानें होतो.

**बभूव, बभूविथ; जिगाय-जिगय, जिग्यिव, जिगेथ-जिगयिथ,** पृ० ८९ नि० ३ (**ड**) पहा; **जिघाय; चिकाय** अ० **चिचाय.**

१६ **अपित्** प्रत्ययांपूर्वी **गम्, हन्, जन्, खन्** व **घस्**, ह्या धातूंच्या उपांत्य अचा लोप होतो. **हन्** धातूंतील **ह्**च्या स्थानीं सर्वत्र **घ्** होतो.

अचा लोप झाल्यानें **जन्** व **घस्** यांचीं **ज्ञ्** व **क्ष्** अशीं रूपें यथानुक्रमें होतात.

**हन्.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **जघान-जघन** | **जघ्निव** | **जघ्निम** |
| द्वि० पु० | **जघनिथ-जघन्थ** | **जघ्नथुः** | **जघ्न** |
| तृ० पु० | **जघान** | **जघ्नतुः** | **जघ्नुः** |

१७ द्वितीय भूतांत **अधि** उपसर्गपूर्वक **इ** धातु 'अभ्यास करणें' ह्याचें अंग **अधिजगा** असें होऊन **अधिजगे, अधिजगाते** व **अधिजगिरे** अशीं रूपें होतात.

·१८ (अ) व्यंजनादि **पित्** प्रत्ययांपूर्वी **सृज्** व **दृश्** ह्या धातूंतील **ऋ**च्या स्थानीं **र** होतो म्हणजे **स्रज्** व **द्रश्** अशीं रूपें होतात. (**ब**) ह्या धातूंपुढील **थ** पूर्वी विकल्पानें **इ** आगम होतो.

**सृज्-सृसृज्-ससृज्-ससृज्+थ,** वरच्या नियमानें **सस्रज्+थ,** पृ० ५८ नि० ९ प्रमाणें **सस्रष्+थ** आणि प्रथम पुस्तकांतील पृ० २१* टिपेप्रमाणें **सस्रष्+ठ-सस्रष्ठ;** याचप्रमाणें **दद्रष्ठ; ससर्जिथ, ददर्शिथ** अशींही रूपें होतात. पृ० ८९ नि० ३ (ड) प्रमाणें **प्रच्छ्-पप्रच्छिथ, पप्रष्ठ.**

१९ **अनिट्** व **ऋ**कारोपान्त्य धातूंपुढें कठोर व्यंजनादि **पित्** *प्रत्यय आला असतां **ऋ**च्या स्थानीं **र** आदेश विकल्पानें होतो. जसें **दद्रप्थ** किंवा **ददर्प्थ, तत्रप्थ** अथवा **ततर्प्थ.** तसेंच **ददर्पिथ** आणि **ततर्पिथ.**

२० द्वितीय भूतांत **अद्** धातूस विकल्पानें **घस्** आदेश होतो. जेव्हां हा **घसा**देश होतो तेव्हां **थ** पूर्वी **इ** आगम अवश्य होतो. **अपित्** प्रत्यय लागून होणाऱ्या रूपांविषयीं वरील नि० १६ पहा.

२१ क्रिया होऊन फार वर्षें झालीं व बोलणारानें ती क्रिया पाहिली नाहीं असा बोध ह्या काळाच्या रूपांपासून होतो. ह्याची योजना बहुधा पुरातन कथा सांगण्याच्या कामीं करितात. बोलणारानें जें केलें तें शुद्धींत केलें नाहीं अथवा उलट समजावून छपविण्यास तो इच्छित होता, असें दर्शविणें असल्यास मात्र ह्या कालाच्या प्रथम पुरुषाची योजना करितात.

---

**बहु जगद पुरस्तात्तस्य मत्ता किलाहम् ।**
**कलिङ्गेषु भुक्तं त्वया । नाहं कलिङ्गाञ्जगाम ।**

**पुरा किल दुष्यन्तो नाम राजा बभूव । स एकदा मृगयां कर्तुं वनमियाय । तं तस्य सैनिका अमात्याश्चानुजग्मुः । तस्मिन्कानने दुष्यन्तो बहून्मृगाञ्जघान । एकं मृगं पलायमानमनुसरन्मार्गे दिव्याश्रमपदं ददर्श । तस्य सैनिकाः पूर्वस्मिन्नेव स्थाने तस्थुः । कण्वस्यायमृषेराश्रम इति ज्ञात्वा तं प्रविवेश । प्रविश्य च को नु भो अत्रेति पप्रच्छ । कण्वस्य कृतिका दुहिता शकुन्तलाश्रमाद्बहिरागत्य दुष्यन्तं स्वागतं व्याजहार । शकुन्तलां चारुसर्वाङ्गीं दृष्ट्वा दुष्यन्तस्तां चकमे । तस्याः पाणिं गान्धर्वेण विधिना राजा जग्राह ।**

---

* ज्याचा योग असतां गुण अथवा वृद्धि होते असा कोणताही प्रत्यय.

अनन्तरं कंचित्कालं तावुभौ तस्मिन्नाश्रमे चिक्रीडतुः । रममाणं राजानं प्रेक्ष्य सैनिकाः पुरं निववृतिरे । राजापि पश्चात्स्वं नगरमुपययौ ।

कियद्वसु ब्राह्मणेभ्यो यूयं ददद । न वयं तेभ्यः किंचिद्ददिम ।
उन्मादं वीक्ष्य पद्मानां कुमुदानां च मन्दताम् ।
क्षणिकत्वं विभूतीनां चेतसा निश्चिकाय सः ॥
शुश्राव रामस्तत्सर्वं प्रतस्थे च ससैनिकः ॥
तस्तनुर्जज्वलुर्मम्लुर्जग्लुर्लुलुठिरे क्षताः ।
मुमूर्च्छुर्ववमू रक्तं ततृषुश्चोभये भटाः ॥
जम्बुमाली जहौ प्राणान् ग्राव्णा मारुतिना हतः ॥
बभाण स न मे मायां जिगायेन्द्रोपि किं नृभिः ॥

---

१ भृगूचा पुत्र ऋचीक यास गाधी नांवाचा राजा आपली कन्या देता झाला (दा).

२ ती जमदग्नि नांवाच्या पुत्रास प्रसवती झाली (सू).

३ जमदग्नि रेणुकेस वरिता झाला (परि+नी).*

४ तो एके समयीं तिच्या अविचारानें तिजवर फार रागावला (कुप्) आणि आपल्या पुत्रांस तिला ठार मारण्यास आज्ञा करिता झाला (दिश्). तें (काम) धाकटा मुलगा जो परशुराम त्याशिवाय कोणीही न करिता झाला (कृ).

५ तो आपल्या परशूनें तिचें शिर कापिता झाला (छिद्).

६ त्या योगानें जमदग्नि प्रसन्न झाला (तुष्) आणि म्हणाला (अभि+धा आ० प०), हे पुत्रा वर माग. तेव्हां माता पुनः जिवंत व्हावी आणि पापांपासून मुक्त व्हावी, असें परशुराम मागता झाला (वृ).

७ तसें होवो, असें जमदग्नि म्हणाला (वि+आ+हृ आ० प०) आणि रेणुका जिवंत (होऊन) उठली (उद्+स्था).

८ कांहीं कालानंतर त्या आश्रमास राजा कार्तवीर्य आला (आ+गम्).

९ तो व त्याचे शिपाई सर्व झाडें मोडिते झाले (भञ्ज्), ती जागा उजाड करिते झाले (उत्सन्नां+कृ) आणि ऋषीच्या सर्व गाई नेते झाले (अप+हृ).

---

*नर्द्, नट् द० ग०, नाथ्, नाध्, नन्द्, नक्क्, नॄ, व नृत् ह्या धातूंशिवाय करून नकारादि धातूंच्यापूर्वी र्मिश्र उपसर्ग आल्यास त्या न्चा ण् होतो. प्र० पु० पृ० १५ टीप ॥ हींत सांगितलेल्या अक्षरांवांचून दुसरीं अक्षरें मात्र र् आणि न् यांमध्यें न यावीं. कित्येकांच्या मतें नॄ, नर्द् व नाध् ह्या धातूंस वरचा अपवाद लागू नाहीं.

परशुराम आश्रमांत नव्हता ( भू ). जेव्हां तो आला तेव्हां कार्तवीर्याशीं लढला ( युध् आ० प० ) आणि त्यास ठार मारता झाला ( हन् ).

१० जेव्हां कार्तवीर्याचे पुत्र हें श्रवण करिते झाले ( श्रु ) तेव्हां ते फार रागावले ( क्रुध् ), आणि त्या आश्रमास जाते झाले ( गम् ).

११ जमदग्नीस एकटा पाहून त्यावर बाण सोडते झाले ( मुच् अ० क्षिप् ) आणि त्यास मारिते झाले.

१२ जेव्हां परशुराम आश्रमास परत आला ( नि+वृत् ), तेव्हां तो रागावला, आणि क्षत्रियांचा समूळ नाश करण्याचा निश्चय करिता झाला ( निस्+चि ).

१३ माझ्या पित्यास तुम्ही ठार मारते झालां काय? असें तो कार्तवीर्याचे पुत्रांस विचारिता झाला ( प्रच्छ् अ० अनु+युज् ). ते म्हणाले ( गद् ) आम्ही न मारिते झालों.

१४ परंतु ते अपराधी आहेत असें परशुराम जाणता झाला ( ज्ञा ) आणि त्यांस व दुसऱ्या सर्व क्षत्रियांस ठार मारिता झाला.

---

# शब्दकोश १३.

**उख्** प्र० ग० प० प० जाणें.
**उन्माद्** पु० आनन्द, विकास.
**उपरि** अ० वरती.
**उभय** सर्व० वि० दोन्ही पक्षाचे.
**एकदा** क्रि० वि० अ० एके वेळीं.
**कण्व** पु० एका ऋषीचें नांव.
**कम्** * द० ग० आ० प० प्रीति करणें; इच्छिणें.
**कलिङ्ग** पु० ( बहुवचनान्त ) एका देशाचें नांव.
**कानन** न० वन.
**कुमुद** न० रात्रीं विकसणारें कमळ.
**कृतिका** स्त्री० धर्माची मुलगी, मानिलेली मुलगी.
**क्रुध्** च० ग० प० प० रागावणें.
**क्षणिकत्व** न० क्षणिकपणा.
**क्षत** भू० का० धा० क० **क्षण्** धातूचें, जखमी केलेला.
**गद्** प्र० ग० प० प० बोलणें.

---

* दहाव्या गणांतील अय हा प्रत्यय, ह्या धातूपुढें आर्धधातुक प्रकारांत विकल्पानें लुप्त होतो, आणि दहाव्या गणांतील इतर सर्व धातूंपुढें, परस्मैपदी आशीर्वादार्थक व तृतीय भूतशिवाय करून, सर्व आर्धधातुक प्रकारांत अय ह्याचा अंत्य अकार मात्र लुप्त होतो.

**गांधर्व** पु० विवाहाचा एक प्रकार; ह्यांत वर व वधू ह्यांची अनुमति मुख्य असते.

**गुप्*** प्र० ग० रक्षण करणें.

**ग्रावन्** पु० दगड.

**घस्** प्र० ग० प० प० खाणें.

**चारुसर्वांगी** स्त्री० ( **चारु** सुंदर, **सर्वांग** सर्व अवयव ) सर्व अवयवांनीं सुंदर.

**चि** उप० **निस्**, निश्चय करणें.

**जम्बुमालिन्** पु० एका राक्षसाचें नांव.

**ज्वल्** प्र० ग० प० प० पेटणें, जळणें, दीप्तिमान् होणें.

**तृष्** च० ग० प० प० तान्हेलें होणें.

**दिव्याश्रमपद** न० ( **दिव्य** सुंदर, **आश्रमपद** न० मठ ) सुंदर मठ.

**दृप्** च० ग० प० प० गर्विष्ठ होणें.

**द्रु** प्र० ग० प० प० धांवणें.

**नु** अ० संशयार्थी, अनुमानार्थी.

**पद्म** न० दिवसास फुलणारें कमळ.

**पलायमान** वर्त० का० धा० वि० ( **परा+अय्** प्र० ग० आ० प० जाणें; **परा** ह्यांतील **रा** ह्यास **ला** आदेश होतो ) पळणारा.

**पुरस्तात्** क्रि० वि० अ० पुढें.

**पूर्व** सर्व० पूर्वीचें ( मनुष्य अ० पदार्थ )

**बहिस्** अ० बाहेर.

**भण्** प्र० ग० प० प० बोलणें, म्हणणें.

**मत्त** वि० भू० का० धा० उन्मत्त.

**मन्दता** स्त्री० मन्दपणा, म्लानता.

**माया** स्त्री० गारूड, इन्द्रजाल, फसविण्याची युक्ति.

**मूर्च्छ्** प्र० ग० प० प० मूर्छा पावणें.

**मृगया** स्त्री० पारध.

**म्लै** प्र० ग० प० प० म्लान होणें, ग्लानि येणें.

**रक्त** न० रुधिर.

**रध्**† च० ग० प० प० इजा देणें, दुखापत करणें.

**लुट्** प्र० ग० प० प० लोळणें (भुईवर).

**वम्** प्र० ग० प० प० ओकणें.

**विभूति** स्त्री० ऐश्वर्य, भरभराट.

**ससैनिक** वि० सैन्यासहित.

**सिध्** प्र० ग० प० प० व्यवस्थित करणें, इच्छेप्रमाणें शेवटास जाणें.

**स्तन्** प्र० ग० प० प० ओरडणें, गर्जना करणें.

**स्निह्** च० ग० प० प० प्रीति करणें.

**स्नु** द्वि० ग० प० प० स्रवणें, पाझरणें.

**स्वृ** प्र० ग० प० प० ध्वनि करणें.

**हत** भू० का० धा० क० **हन्** धातूचें, मारलेला.

---

* आर्धधातुक प्रकारांमध्यें ह्या धातूस व प्रथम पाठांतील नियम १ यांत सांगितलेल्या इतर धातूंस विकल्पानें **आय्** जोडिला जातो.

† अजादि प्रत्यय लावण्यापूर्वी रध् व जभ् ह्यांतील अ पुढें न् येतो. जसें **ररन्ध** द्वि० भू० तृ० पु० ए० व०. येथें उपान्त्य **न्** असल्याकारणानें वृद्धि झाली नाहीं. तृतीय भूतकाळीं किंवा इडागमाच्या वेळीं रध् धातूंतील अ पुढें न् येत नाहीं. हा निषेध द्वितीयभूतीं लागत नाहीं.

अविचार **व्यभिचार** पु०.

ऋचीक **ऋचीक** पु० एका ऋषीचें नांव.

एके समयीं **एकदा** अ०, **कदाचित्** अ०.

कार्तवीर्य **कार्तवीर्य** पु० एका राजाचें नांव. ह्यास परशुरामानें मारिलें.

कांहीं कालानंतर **अनन्तरम्, कस्यचित्कालस्य अत्यये.**

गाधि **गाधि** पु० एका राजाचें नांव.

जमदग्नि **जमदग्नि** पु० एका ऋषीचें नांव.

जिवंत **जीवन्ती** स्त्री० वर्त० का० धा० **जीव्** धातूचें, **सजीवा** स्त्री० ( **जीव** पु० प्राण आणि **सह** ह्या अव्ययाचें उर्वरित **स** हें रूप ).

जिवंत होणें **जीव्**, उप० **पुनर्**.

तसें होवो **तथा भवतु.**

त्या योगानें **तेन** न० तृतीयान्त.

धाकटा **कनिष्ठ** वि०.

नच **नैव** अ०, **न कर्हिचित्** अ०.

नांवाचा **नाम** अ०, **नाम्ना** तृतीयेचें एकवचन.

परशु ( कुऱ्हाड ) **परशु** पु०.

फार **भृशम्** अ०.

भृगु **भृगु** पु० एका ऋषीचें नांव.

मुक्त **मुक्ता** स्त्री० भू० का० धा० **मुच्** धातूचें.

रेणुका **रेणुका** स्त्री० जमदग्नीच्या पत्नीचें व परशुरामाच्या आईचें नांव.

शिवाय **ऋते** अ० (पंचमीशीं योजावें).

समूल नाश करण्याचा **मूल्** द० ग० उप० **उद्**, **उन्मूलयितुम्** अ०.

---

# चतुर्दशः पाठः ।

## द्वितीयभूत ( पुढें चालू. )

१ **अपित्** प्रत्यय पुढें असतां व इ आगम झालेला प० प० द्वि० पु० ए० व० **थ** पुढें असतां, धातूच्या असंयुक्त दोन व्यंजनामध्यें अ असून त्या धातूस द्वित्व झालें असता व्यंजनांत फेरफार होत नसल्यास त्या अच्या स्थानीं **ए** होतो, आणि अभ्यासाचा लोप होतो.

**तन्** उ० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **ततान-ततन** | **तेनिव** | **तेनिम** |
| द्वि० पु० | **तेनिथ** | **तेनथुः** | **तेन** |
| तृ० पु० | **ततान** | **तेनतुः** | **तेनुः** |

हा नियम **तन्** धातूस बरोबर लागू पडतो, **नन्द्**, **गद्**, **भण्**, इ० धातूंस लागू पडत नाहीं; कारण **नन्द्** धातूंत जोडाक्षर आहे, व **गद्** व **भण्** या धातूंस

द्वित्व होऊन त्यांचे आदि व्यंजनांस यथाक्रमें **ज्** व **ब्** हे आदेश होतात म्हणजे त्यांच्या व्यंजनांत फेरफार होतो. म्हणून त्यांचीं रूपें:—

| | ए० व० | द्वि० | ब० व० |
|---|---|---|---|
| तृ० पु० | **ननन्द** | **ननन्दतुः** | **ननन्दुः** |
| तृ० पु० | **जगाद** | **जगदतुः** | **जगदुः** |
| तृ० पु० | **बभाण** | **बभणतुः** | **बभणुः** |

अशीं होतात आणि **नेन्दतुः, गेदतुः, भेणतुः** अशीं होत नाहींत.

पृ० ८९ नि० ३ (ड) प्रमाणें **थ** पूर्वी **इ** आगम होतो, **इ** आगम झाला म्हणजे **पेचिथ, शेकिथ,** आणि न झाला म्हणजे **पपक्थ, शशक्थ** अशीं रूपें होतात. प्रथम पुस्तक पृ० ८८ * टिपेप्रमाणें **च्**चा **क्** होतो.

२ वरच्या धातूंप्रमाणें **तॄ, फल्, भज्, त्रप्,** व पांचव्या गणांतील **राध्** ( नाखूष करणें या अर्थी ) ह्या धातूंतील **अ** अथवा **आ** ह्याच्या स्थानीं **ए** होतो. **जॄ, भ्रम्, त्रस्, फण्, राज्, भ्राज्, भ्राश्, भ्लाश्, स्यम्** व **स्वन्**, ह्या धातूंतील अच्या अथवा आच्या स्थानीं विकल्पें **ए** होतो.

वर लिहिलेल्या धातूंस ह्या पाठांतील पहिल्या नियमांतील सामान्य गोष्ट लागू पडत नाहीं.

**तॄ**–पृ० ७१ नि० २ (इ) प्रमाणें **ततॄ**–पृ० ९२ नि० १० प्रमाणें **ततर्+ अतुः** आणि वरच्या नियमाप्रमाणें **तेरतुः**. याचप्रमाणें **त्रेपे–त्रेपाते** इ०. **बभ्राम–बभ्रमतुः** अ० **भ्रेमतुः—बभ्रमुः** अ० **भ्रेमुः** इ०.

३ वकारादि धातूंस आणि **शस्** व **दद्** ह्या धातूंस हा विकार होत नाहीं.

**वम्**—तृ० पु० **ववाम—ववमतुः—ववमुः**.

४ सर्व **अपित्** प्रत्यय पुढें असतां खालीं लिहिलेल्या आणि दुसऱ्या कितीएक धातूंतील **य्, व्, र्,** ह्यांच्या स्थानीं अनुक्रमें **इ, उ** व **ऋ** हे होतात. ***वच्, यज्, वप्, वह्, वस्** 'प्र० ग०, **वे**,' **व्ये, ह्वे, श्वि, वद्, स्वप्, ज्या, वश्, व्यच्, प्रच्छ्, व्रश्च्, भ्रस्ज्, ग्रह्, व्यध्**. द्वितीय भूताच्या संबंधानें ह्या यादींतून **प्रच्छ्, व्रश्च्, भ्रस्ज्,** हे धातु काढून टाकावे. ह्या विकारास **संप्रसारण** म्हणतात.

---

* ह्या यादींतील पहिल्या अकरा धातूंस सार्वधातुक **अपित्** प्रत्यय लावणें असल्यास **संप्रसारण**-योग्य स्थलींही **संप्रसारण** होत नाहीं.

५ द्वितीय भूताचा **पित्** प्रत्यय पुढें असतां धातूच्या अभ्यासास संप्रसारण होतें. **पित्** व **अपित्** प्रत्ययांपूर्वी **व्यथ्** धातूचा अभ्यास **वि** होतो.

६ संप्रसारण पावलेल्या वर्णापुढील स्वराचा लोप होतो.

७ जेथें जोडाक्षराच्या दोनही अवयवांत संप्रसारण होण्याचा संभव आहे तेथें दुसऱ्या अवयवास मात्र संप्रसारण होतें.

**यज्** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **इयाज-इयज** | **ईजिव** | **ईजिम** |
| द्वि० पु० | **इयजिथ-इयष्ठ** | **ईजथुः** | **ईज** |
| तृ० पु० | **इयाज** | **ईजतुः** | **ईजुः** |

**यज्** आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **ईजे** | **ईजिवहे** | **ईजिमहे** |
| द्वि० पु० | **ईजिषे** | **ईजाथे** | **ईजिध्वे** |
| तृ० पु० | **ईजे** | **ईजाते** | **ईजिरे** |

**यज्—ययज्**—नि० ५ प्रमाणें **इअयज्**, नि० ६ प्रमाणें **इयज्–इयाज**; **यज्**–नि० ४ व नि० ६ प्रमाणें **इइज्–ईज्+अतुः–ईजतुः**. **यज्–इयजिथ**, अथवा पृ० ८९ नि० ३ (ड) प्रमाणें **इयज्+थ**, पृ० ५८ नि० ९ प्रमाणें **इयष्+थ**–प्रथम पुस्तक पृ० २१ टीप० * प्रमाणें **इयष्+ठ–इयष्ठ**. **व्यध्–व्यव्यध्***–नि० ५ व ७ प्रमाणें **विअव्यध्**, नि० ६ प्रमाणें **विव्यध्–विव्याध**. **स्वप्–स्वस्वप्–सुस्वप्–सुस्वप्+अ=**†**सुष्वाप**. **व्यध्–विध्–विविध्+अतुः–विविधतुः**. **स्वप्–सुप्–सुषुप्+अतुः–सुषुपतुः**. **वच्** तृ० पु० प० प० **उवाच, ऊचतुः, ऊचुः**–द्वि० पु० ए० व० **उवचिथ** अ० **उवक्थ**. आ० प० **ऊचे, ऊचाते** इ०.

(१) (अ) **द्रुह्, मुह्, स्नुह्**, आणि **स्निह्** ह्या धातूंपुढें अनुनासिक व अंतःस्थ ह्यांशिवाय कोणतेंही व्यंजन असतां अथवा कोणताही वर्ण पुढें नसतां त्यांच्या **ह्** ह्या व्यंजनास **घ्** असा आदेश विकल्पें होतो, म्ह० **घ्** अ० **ढ्** हें व्यंजन होतें.

---

* संयुक्तव्यंजनादि संप्रसारण घेणाऱ्या धातूस **पित्** प्रत्ययांपूर्वी पृ० ९० नि० ७ लागू पडत नाहीं. हें येथें लक्षांत ठेवावें.

† धातु **स्**कारादि असून त्या **स्** पुढें स्वर किंवा दन्त्य वर्ण असतां त्या **स्**स आणि **स्वञ्ज्, स्विद्, स्वद्, स्वञ्ज्, स्वप्** व **स्मि** एतत्संबंधी **स्**स **ष्** असा आदेश होतो; मात्र एका शब्दांत अथवा पदांत त्या **स्**पूर्वी **अ** अथवा **आ** शिवाय स्वर अथवा कण्ठ्यवर्ण असला पाहिजे. **सेक्, सृप्, सृज्, स्तृ, स्त्री, स्तृ** व **स्त्यै** ह्या धातूंस हा नियम लागू नाहीं.

**मुमोहिथ, मुमोह्+थ** ( पृ० ९० नि० ६ )=**मुमोढ्+थ** अ० **मुमोघ्+थ** =**मुमोढ** अ० **मुमोग्ध.**

( **ब** ) वर सांगितलेली स्थिति असतां **नह्** ह्या व्यंजनास **ध्** आदेश होतो. **नेहिथ** आणि **ननह्+थ=ननध्+थ=ननद्ध.**

( २ ) जेव्हां **वह्** धातूंतील **ढ्** हें व्यंजन पृ० ५५ नि० ३ प्रमाणें लुप्त होतें, तेव्हां त्यापूर्वींचा अ अथवा आ ह्यास **ओ** आदेश होतो.

**वह्-ववह्-उवह्+थ**-पृ० ५५ नि० १ प्रमाणें **उवढ्+थ,** पृ० ५५ नि० २ प्रमाणें **उवढ्+ध**-प्र० पु० पृ० २१ टीप* प्रमाणें **उवढ्+ढ**-पृ० ५५ नि० ३ प्रमाणें **उवढ** ह्याचें **उवाढ** असें न होतां ह्या नियमाप्रमाणें **उवोढ.**

८ ( अ ) **वे** 'विणणें' उ० प० ह्या धातूस विकार होऊन द्वितीय भूताचे **पित्** प्रत्यय पुढें असतां **उवय्,** आणि **अपित्** प्रत्यय पुढें असतां **ऊय्** अ० **ऊव्** असें अंग होतें. **व्ये** 'आच्छादणें' उ० प० याचीं **पित्** प्रत्यय पुढें असतां **विव्यय्,** आणि **अपित्** प्रत्यय पुढें असतां **विवी** अशीं अंगें होतात. **उवय्** ह्यापुढें **थ** असतां त्यास **इ** आगम होतो.

नाहीं तर पृ० ९३ नि० १४ लागू पडला असता. **व्ये—व्येव्ये** नि० ७ प्रमाणें **व्-इ-एव्ये,** नि० ६ प्रमाणें **विव्ये-विव्यै+अ-विव्याय.** याचप्रमाणें **वे**चींही रूपें **पित्** प्रत्यय पुढें असतां होतात.

( **ब** ) **ह्वे** उ० प० 'बोलावणें' या धातूचें अंग सर्वत्र **हु** असें होतें, आणि **श्वि**चें **शु** होतें; म्हणजे, **ह्वे** व **श्वि** ह्या धातूंस द्वितीय भूताचे **पित्** प्रत्यय पुढें असतांही संप्रसारण होतें. **ह्वे-ह्-उ-ए**-नि० ६ प्रमाणें **हु** असें होतें.

( **क** ) **वे** व **श्वि** ह्या धातूंचीं अंगें अशींच राहूनही त्यांचीं द्वितीय भूताचीं रूपें होतात. पृ० ९३ नि० १४ प्रमाणें **वेचा-वा-ववा-ववौ-ववतुः-ववुः** पृ० ९२ नि० १३ ( अ ) ( ब ) प्रमाणें.

९ **अद्, ऋ** व **व्ये** या धातूंपुढील **थ** प्रत्ययास **इ** आगम अवश्य होतो. द्वि० पु० ए० व० **आरिथ,** तृ० पु० **आर-आरतुः-आरुः.**

१० **मस्ज्** आणि **नश्** ह्या धातूंस व्यंजनादि **पित्** प्रत्यय लावितांना त्यांच्या अ पुढें **न्** येतो.

११ ( अ ) द्वित्व पावलेल्या धातूचा अभ्यास अच असेल तर तो दीर्घ होतो.

( **ब** ) आद्य अक्षर अ असून अंतीं संयोग असणाऱ्या धातूच्या, **ऋ**कारादि धातूच्या व **अश्** 'व्यापणें' ह्या धातूच्या अभ्यासापुढें **न्** येतो.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| **अर्द्** तृ० पु० | **आनर्द** | **आनर्दतुः** | **आनर्दुः** |
| **अन्त्** तृ० पु० | **आनन्त** | **आनन्ततुः** | **आनन्तुः** |
| **ऋज्** तृ० पु० | **आनृजे** | **आनृजाते** | **आनृजिरे** |

१२ (अ) (अ अथवा आ शिवाय करून) दीर्घ स्वरादि धातूंस अथवा धातु ऱ्हस्वस्वरादि असून पुढें संयोग असणाऱ्या अशा धातूंस **आम्** लावून पुढें **कृ**, **भू**, अथवा **अस्** ह्या धातूंचीं द्वितीय भूताचीं रूपें लाविल्यानें त्यांचा द्वितीय भूत होतो. **ऋच्छ्** धातूस हा नियम लागू नाहीं. (ब) दहाव्या गणांतील, प्रयोजक, इच्छादर्शक, व दुसऱ्या व्युत्पन्न धातूंस, व बहुतकरून एकापेक्षां जास्त अक्षरें असणाऱ्या धातूंस याचप्रमाणें **आम्** लागून त्यांच्या द्वितीय भूताचीं रूपें होतात.

द्वितीय भूताच्या ह्या प्रकारास **आम्युक्त** द्वि० भू० म्हणतात.

(क) धातु परस्मैपदी असल्यास कृ धातूचीं परस्मैपदी रूपें आणि आत्मनेपदी असल्यास आत्मनेपदी रूपें लावावीं.

**ईश्** आ० प० (अ).

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **ईशांचक्रे** | **ईशांचकृवहे** | **ईशांचकृमहे** |
| द्वि० पु० | **ईशांचकृषे** | **ईशांचक्राथे** | **ईशांचकृढ्वे** |
| तृ० पु० | **ईशांचक्रे** | **ईशांचक्राते** | **ईशांचक्रिरे** |

तसेंच **ईशामास**, **ईशांबभूव** इ०.

**कथ्** द० ग० प० प० (ब).

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **कथयांचकार-चकर** | **कथयांचकृव** | **कथयांचकृम** |
| द्वि० पु० | **कथायांचकर्थ** | **कथयांचक्रथुः** | **कथयांचक्र** |
| तृ० पु० | **कथयांचकार** | **कथयांचक्रतुः** | **कथयांचक्रुः** |

आ० प० **कथयांचक्रे** इ०.

बहुतेक आर्धधातुक प्रकारांत **अय** राहतो (पृ० ९६ शब्दकोशावरची * टीप पहा).

१३ (अ) **दय्**, **अय्**, **कास्** व **आस्** ह्या धातूंचा **आम्युक्त** द्वि० भू० अवश्य होतो; आणि **उष्**, **विद्** (द्वि० ग०) व **जागृ** ह्यांचा विकल्पानें होतो.

(ब) भी, ह्री, भृ (तृ० ग०) व हु ह्यांसही विकल्पानें **आम्** लागतो, परंतु ह्यांचे अंगास तिसऱ्या गणांतील नियमानें द्वित्व होऊन नंतर **आम् व कृ भू** अ० **अस्** ह्याचें रूप लागतें.

१४ **आम्** हा प्रत्यय **पित्** आहे म्हणून तो पुढें असतां धातूंतील ऱ्हस्व उपांत्य आणि अंत्य स्वर ह्यांस गुण होतो. हा नियम **विद्** धातूस लागू नाहीं.

**आसांचक्रे, विदांचकार** अ० **विवेद, बिभयांचकार, जिह्रयांचकार, बिभरांचकार** इ०.

१५ तृतीय भूत व आशीर्वादार्थ हे दोन प्रकार खेरीज करून बाकीच्या सर्व आर्धधातुक प्रकारांमध्यें **मृ** धातु परस्मैपदी चालतो.

१६ धातु कोणत्याही पदीं असला तरी त्याचीं द्वितीय भूताचीं कर्मणी रूपें करणें असल्यास पूर्वोक्त दोन पाठांतील नियमानें तीं रूपें करून आत्मनेपदी प्रत्यय लावावे.

---

गतायां रात्रौ सुप्ता वयं किल बहु विलेपिम ।

युधिष्ठिरेण पृष्टो लोमशोऽगस्त्यस्य प्रभावं कथयामास ।

कृतयुगे कालेया इति विश्रुता दानवा वृत्रं समाश्रित्य महीं स्वर्गलोकं च भृशं पीडयांचक्रुः । नैतत्कर्तुमानर्हुस्ते ।

तान्हन्तुं सेन्द्रा विबुधा न शेकुः ।

ते ब्रह्माणमुपसंगम्योचुर्भगवन्नखिलं त्रैलोक्यं दानवैरर्द्यते किमत्र करवामहै ।

परमेष्ठ्युवाच भो देवा दधीचमृषिं गत्वा तस्यास्थीनि याचध्वम् । तेषां वज्रं कृत्वा वृत्रं हत ।

तथेति प्रतिज्ञाय ते सर्वे दधीचस्याश्रममुपययुः ।

तमृषिं देवाः प्रणेमुस्तस्यास्थीनि च ययाचिरे ।

ततः स महात्मा त्रैलोक्यस्य हितायात्मनः प्राणानुत्ससर्ज ।

तस्य परासोरस्थीनि देवा जगृहुस्त्वष्टारं च गत्वा तं* तेषामुग्रं वज्रं कारयामासुः ।

ततस्त्वष्टा शक्रमुवाचैतद्गृहीत्वा वृत्रं जहि ।

इन्द्रेण सहिता देवा रोदसी आवृत्य तिष्ठन्तं कालेयैरभिरक्षितं च वृत्रमासेदुः । तांश्च युद्धायाजुहुविरे ।

---

* पाठ २१ नि० १२ पहा.

तैःसह देवानां तुमुलं युद्धं समापेदे। रजोभिः सर्वा दिशो व्यानशिरे। दानवेभ्यश्च देवा भृशं त्रेसुः।

इतस्ततः प्रधावतां तेषां वेगं देवा दौर्बल्यान्न सेहिरे भीताश्च पलायामासुः।

तादृशांस्तान्दृष्ट्वेन्द्रो विष्णुं शरणं वव्राज।

ततो विष्णुरात्मनस्तेज इन्द्रे निदधे देवाश्च महर्षयश्चापि तथा विदधिरे।

ततो रणधुरामेकोऽपीन्द्र उवाह।

स वृत्रस्य वधाय महद्वज्रं मुमोच। तेन हतो वृत्रो भूमौ सुष्वाप।

कोट्याकोट्या पुरद्वारमेकैकं रुरुधे द्विषाम्॥
तत्कर्म वालिपुत्रस्य दृष्ट्वा विश्वं विसिष्मिये।
संत्रेसू राक्षसाः सर्वे बहु मेने च राघवः॥
सुग्रीवो मुमुदे देवाः साध्वित्यूचुः सविस्मयाः।
बिभीषणोऽभितुष्टाव प्रशशंसुः प्लवंगमाः॥
राघवो न दयांचक्रे दधुर्धैर्यं न केचन।
मम्रे पतंगवद्वीरैर्हाहेति च विचुक्रुशे॥
* प्राणा दध्वंसिरे गात्रं तस्तम्भे च प्रिये हते।
उच्छ्वास चिरादीना रुरोदासौ ररास च॥
लोहबन्धैर्बबन्धे नु वज्रेण किं विनिर्ममे।
मनो मे न विना रामाचत्पुस्फोट सहस्रधा॥
उत्तेरिथ समुद्रं त्वं मदर्थेऽरीञ् जिहिंसिथ।
ममर्थ चातिघोरा मां † धिग्जीवितलघूक्तताम्॥
मालिन्यं मार्जयामास चन्द्रमास्तिमिरैः कृतम्।
खलैर्दत्तं मृषा दोषमिव सत्पुरुषः सताम्॥

---

* राम इन्द्रजिताचें शस्त्र लागल्यामुळें मूर्च्छित होऊन मृतवत् पडला असतां तो राक्षसांनीं सीतेस पुष्पकविमानांत बसवून आकाशांत नेऊन तेथून दाखविला. तेव्हां सीतेची जी स्थिति झाली तिचें वर्णन ह्या पद्यांत आहे, व पुढील दोन पद्यांत त्या प्रसंगीं सीतेनें केलेल्या शोकाचें वर्णन आहे.

† धिक् ह्या अव्ययाच्या योगीं द्वितीया विभक्ति होते.

*ऐन्द्रेण ह वै महाभिषेकेण संवर्त आङ्गिरसो मरुत्तमाविक्षितमभिषिषेच। तस्मादु मरुत्त आविक्षितः समन्तं सर्वतः पृथिवीं जयन्परीयायाश्वेन च मेध्येनेजे। †तदप्येष श्लोकोऽभिगीतः। मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्यावसन्गृहे। आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद इति॥

---

१ जेव्हां कालेयांचा सेनापति मारला गेला (हन् कर्मणि) तेव्हां ते निकरानें लढले (युध्); परंतु शेवटीं देव त्यांस जिंकिते झाले (जि).

२ नंतर ते गुप्तपणें विचार करिते झाले (मन्त्र् अ० मन्त्रं कृ) व जगाचा संहार करण्याचा निश्चय करिते झाले (निस्+चि).

३ तो होण्यास ब्राह्मण व ऋषि ह्यांचा नाश हा उत्तम उपाय असें मानिते झाले (मन्), कारण ते जीं तपें करिते झाले (तप् अ० चर्) व यज्ञ करिते झाले (तन् अ० आ+हृ) त्यांवर जग अवलंबून होतें (आ+श्रि अ० आ+लम्ब्).

४ ह्याकरितां ते दिवसास समुद्रांत लपते झाले (प्र+छद्), रात्रीस चोहींकडे फिरते झाले (चर्), बहुत ब्राह्मणांस मारिते झाले (हन्) आणि सर्व लोकांस पीडिते झाले (पीड् अ० अर्द्).

५ वसिष्ठ, भार्गव, व इतर ऋषि ह्यांचे आश्रम मोडिते झाले (अव+साद् प्रयोजक) व ओसाड करिते झाले (कृ); नंतर ते त्यांस जाळिते झाले (दह्).

६ कोणीही यजन न करिते झाले (यज्) म्हणून देव भ्याले (भी अ० त्रस्).

७ हें कोण करिता झाला तें ते न जाणते झाले (ज्ञा), म्हणून विष्णूकडे जाते झाले (उप+गम्) आणि त्याचें साह्य मागते झाले (याच्).

८ कालेय हें रात्रीस करितात आणि दिवसास समुद्रांत लपतात असें विष्णु त्यांस सांगता झाला (कथ् अ० चक्ष्).

---

* ऐंद्रो महाभिषेकः हा एक राज्याभिषेकाचा प्रकार आहे. ह्याच प्रकाराप्रमाणें देवांनीं इंद्रास राज्याभिषेक केला होता. राजांस ह्याच प्रकारानें अभिषेक केला म्हणजे ते वज्रदेही आणि पृथ्वी जिंकण्यास समर्थ असे होतात.

† येथें तद् हें अव्यय तस्मात् ह्या शब्दाच्या अर्थी योजिलें आहे.

९ नंतर तो त्यांस आज्ञा करिता झाला ( **आ+दिश्** ) कीं, तुम्ही अगस्त्याप्रत जा आणि समुद्र पिऊन टाकण्याकरितां त्याची प्रार्थना करा.

१० देव त्या ऋषीकडे गेले ( **उप+इ** ), नमन करिते झाले ( **प्र+नम्** ) आणि त्याचें सामर्थ्य वाखाणिते झाले ( **स्तु** अ० **प्र+शंस्** ).

११ तो त्यांस येण्याचें कारण विचारता झाला ( **प्रच्छ्** ).

१२ ते त्यास हें सांगते झाले ( **कथ्** ).

१३ नंतर अगस्त्य समुद्राप्रत गेला ( **या** ) आणि देव त्याचे मागें गेले ( **अनु+या** अ० **इ** ). तो समुद्र प्याला ( **पा** ) आणि कालेय आपल्या आश्रयस्थानांतून ओढून काढिले गेले ( **आ+कृष्** ).

१४ नंतर युद्ध झालें ( **सम्+आ+पद्** ) आणि देव त्यांस मारिते झाले ( **हन्** ).

---

# शब्दकोश १४.

**अगस्त्य** पु० एका ऋषीचें नांव.

**अतिघोर** वि० फार भयंकर, फार दुष्ट.

**अन्ततः** क्रि० वि० अ० शेवटीं.

**अभिगीत** ( भू० धा० क० **अभि+गै** प्र० ग० प० प० धातूचें ) गाइलेला.

**अर्थ्** द० ग० आ० प० उप० **प्र**, प्रार्थना करणें.

**अर्द्** प्र० ग० व द० ग० पीडा देणें.

**अश्** पं० ग० आ० प० उप० **वि**, व्यापणें.

***अस्थि** न० हाड.

**आङ्गिरस** पु० अंगिरसाचा वंशज.

**आविक्षित** पु० अविक्षिताचा मुलगा.

**इ** द्वि० ग० प० प० उप० **परि**, सभोंवतीं फिरणें, प्रदक्षिणा करणें.

**इतस्ततः** अ० इकडे तिकडे.

**उ** अ० पादपूरणार्थक.

**उग्र** वि० तीक्ष्ण, कठोर.

**उष्** प्र० ग० प० प० जाळणें.

**एकैक** सर्व० वि० एकामागून एक, एकेक, प्रत्येक.

**ऐन्द्र** वि० इन्द्रसंबंधी.

**कामप्रि** पु० ज्याच्या इच्छा पूर्ण झाल्या आहेत असा.

**कारय** ( **कृ** धातूचें प्रयोजक रूप ) करविणें.

**कालेय** पु० कांहीं दैत्यांचें नांव.

**कृतयुग** न० कृतयुग.

**कुश** प्र० ग० प० प० उप० **वि**, ओरडणें.

**चर्** प्र० ग० प० प० जाणें, फिरणें.

---

* पाठ १६ नि० ११ पहा.

**चिरात्** अ० फार दिवसांनीं, फार वर्षांनीं.

**छद्** द० ग० उप० **प्र**, लपविणें.

**जीवितलघूकृत** वि० जगण्यानें जिची अप्रतिष्ठा केली अशी.

**तप्** प्र० ग० प० प० तप करणें.

**तादृश** वि० त्यासारखा, तसा.

**तिमिर** पु० न० अंधकार.

**तुमुल** वि० भयंकर, निकराचें.

**त्रस्** प्र० ग० व च० ग० प० प० उप० **सम्**, भिणें.

**त्रैलोक्य** न० तीन लोक.

**दद्** प्र० ग० आ० प० देणें.

**दधीच** पु० एका ऋषीचें नांव.

**दय्** प्र० ग० आ० प० दया करणें.

**दानव** पु० दैत्य.

* **दिश्** स्त्री० दिशा.

**दीन** वि० अनाथ, गरीब.

**दोष** पु० दोष.

**दौर्बल्य** न० अशक्तपणा.

**धिक्** अ० धिक्कारार्थी.

**पतङ्गवत्** अ० पतंगपक्ष्याप्रमाणें.

**परमेष्ठिन्** पु० ब्रह्मदेव.

**परासु** वि० मेलेला.

**परिवेष्टृ** पु० अन्न वाढणारा.

**पुरद्वार** न० नगराचें दार, वेस.

**प्रभाव** पु० पराक्रम, मोठेपणा.

**प्लवंगम** पु० माकड.

**फण्** प्र० ग० प० प० जाणें.

**फल्** प्र० ग० प० प० फल येणें.

**बहु** क्रि० वि० फार.

**बिभीषण** पु० रावणाच्या एका भावाचें नांव ( हा रामाचा साह्य करणारा होता. )

†**भ्रस्ज्** ष० ग० उ० प० भाजणें.

**भ्राज्** प्र० ग० आ० प० प्रकाशणें.

**भ्राश्** प्र० ग० आ० प० प्रकाशणें.

**भ्लाश्** प्र० ग० आ० प० प्रकाशणें.

**मदर्थे** क्रि० वि० मजकरितां.

**मन्त्र्** द० ग० आ० प० गुप्त विचार करणें, मसलत करणें.

**मरुत्** पु० देव.

**मरुत्त** पु० एका राजाचें नांव.

**महाभिषेक** पु० [ **महत्** मोठा, **अभिषेक** पु० पाणी शिंपडणें, जसें एखाद्या राजास गादीवर बसविते वेळीं ] मोठा राज्याभिषेक.

**मालिन्य** न० मलीनपणा, अंधकार.

**मृज्** द० ग० स्वच्छ करणें, निर्मळ करणें.

**मृषा** अ० खोटें.

**मेध्य** वि० बलि देण्यास योग्य असा.

**रणधुरा** लढाईचा धडाका किंवा मारा.

**रस्** प्र० ग० प० प० किंकाळी फोडणें, ध्वनि करणें.

---

* पाठ १६ नि० २२ पहा.

† **आशीर्वादार्थ** शिवाय करून बाकीच्या सर्व आर्धधातुक प्रकारांत ह्या धातूचीं **भ्रस्ज्** व **भर्ज्** अशीं दोन अंगें होतात. **भ्रस्ज्** धातूंतील **स्**चा जेव्हां लोप होत नाहीं तेव्हां त्यास **ज्** होतो. ( पृ० ६१ नि० १० पहा. )

**रोदसी** न० ( द्विवचनान्त ) पृथ्वी व आकाश.

**लप्** प्र० ग० प० प० उप० **वि**, शोक करणें.

**लम्ब्** प्र० ग० आ० प० उप० **अव**, आश्रय करणें, अवलंबून असणें.

**लोमश** पु० एका ऋषीचें नांव.

**लोहबन्ध** पु० ( **लोह** पु० न० लोखंड, **बन्ध** पु० बिडी ) लोखंडाची बिडी.

**वज्र** पु० न० वज्र, हिरा.

**वालिपुत्र** पु० वालीचा मुलगा, एक वानरमुख्य.

**विबुध** पु० देव.

**विश्रुत** वि० ( **वि+श्रु** धातूचें भू० धा० क० ) प्रख्यात.

**विश्वेदेवाः** पु० ब० व० सर्व देव.

**वेग** पु० गति, वेग.

**शक्र** पु० इंद्र.

**श्रि** उप० **आ**, आश्रय करणें.

**संवर्त** पु० एका उपाध्याचें नांव.

**सत्पुरुष** पु० चांगला मनुष्य.

**सभासद्** पु० सभासद.

**समन्तम्** क्रि० वि० सभोंवतीं.

**सर्वतः** अ० चोहोंकडे.

**सविस्मय** वि० साश्चर्य.

**सहस्रधा** अ० हजार प्रकारांनीं, हजार तुकडे होतील असें.

**साधु** क्रि० वि० चांगलें.

**सुग्रीव** पु० एका वानरमुख्याचें नांव. ( हा रामाचा साह्यकर्ता होता. )

**सृज्** उप० **उद्**, सोडणें, टाकणें.

**सेन्द्र** वि० इन्द्रासहित.

**स्तु** उप० **अभि**, स्तुति करणें.

**स्फुट्** ष० ग० प० प० फुटणें.

---

येणें **आगमन** न०, **आगम** पु०.

आश्रयस्थान **आश्रयस्थान** न०.

उपाय **उपाय** पु०, **अभ्युपाय** पु०.

ओसाड **निर्जन** वि०.

कारण **प्रयोजन** न०.

कोणीही **कोऽपि**.

तप **तपांसि** न० ब० व०.

तो होण्यास **तत्फलावाप्तये** च० ए० व०.

दिवसा **दिवा** अ०.

नंतर **अनन्तरम्** क्रि० वि०.

नाश **ध्वंस** पु०, **नाश** पु०, **अवसाद** पु०.

निकरानें **प्रसह्य** अ०, **आत्मनिरपेक्षम्** क्रि०वि०,**साहसेन** क्रि०वि०.

मारलेला **हत** वि०.

म्हणून **तेन हेतुना.**

रात्रीस **निशि.**

संहार करण्याचा **उद्+छिद्** स० ग०; **नि+सूद्** द० ग०; **उच्छेत्तुम्; निषूदयितुम्.**

सामर्थ्य **प्रभाव** पु०.

# पंचदशः पाठः ।

## भाग पहिला.

## प्रथम भविष्य, द्वितीय भविष्य आणि संकेतार्थक.

### १ प्रथम भविष्य.

१ धातूच्या अन्त्य आणि ऱ्हस्व उपान्त्य स्वरास गुण करून नंतर **तृ** प्रत्यय जोडावा. ह्याप्रमाणें केलेल्या नामाचीं जीं प्रथमान्त रूपें तींच तृतीय पुरुषाचीं रूपें समजावीं. परस्मैपदी **अस्** धातूचीं वर्तमानकाळीं प्रथम पुरुषाचीं व द्वितीय पुरुषाचीं रूपें वर सांगितलेल्या नामाच्या प्रथमैकवचनान्त रूपाशीं जोडून यथाक्रम प्रथम पुरुषाचीं व द्वितीय पुरुषाचीं रूपें करावीं. धातु आत्मनेपदी असल्यास **अस्** धातूचीं आत्मनेपदी रूपें जोडावीं.

२ **सेट्** धातूंपुढील **तृ** प्रत्ययामागें **इ** आगम होतो, **वेट्** धातूंपुढील **तृ** प्रत्ययामागें तो विकल्पानें होतो आणि **अनिट्** धातूंपुढील **तृ** प्रत्ययामागें मुळींच होत नाहीं. **इष्**, **सह्**, **लुभ्**, **रुष्**, ह्या धातूंपुढील **तृ** प्रत्ययामागें **इ** आगम विकल्पानें होतो.

३ **ग्रह्** धातूच्या द्वितीय भूताशिवाय सर्व आर्धधातुक प्रकारांतील रूपांत **इ** आगम दीर्घ होतो; **वृ** व ( दीर्घ ) ॠकारान्त धातूंच्या द्वितीयभूत, आशीर्वादार्थ आत्मनेपदी, आणि तृतीयभूत परस्मैपदी, ह्यांखेरीज सर्व आर्धधातुक प्रकारांतील रूपांत **इ** आगम विकल्पानें दीर्घ होतो.

४ पृ० ५५ ह्यांतील तिसऱ्या नियमास अनुसरून, जेव्हां **सह्** धातूंतील **ह्** चा लोप होतो, तेव्हां त्यामधील अ अ० आ ह्यास **वह्** धातूप्रमाणें ओ होतो [पृ० १०१ नि० ( २ ) पहा].

भू परस्मैपदी.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | भवितास्मि | भवितास्वः | भवितास्मः |
| द्वि० पु० | भवितासि | भवितास्थः | भवितास्थ |
| तृ० पु० | भविता | भवितारौ | भवितारः |

---

**सह्**–सह्+ता–सढ्+ता–सढ्+धा=सढ्+ढा–साढा वरच्या ४ थ्या नियमाप्रमाणें **सोढा**; त्याप्रमाणेंच **वह्**–**वोढा**; **लभ्**+ता–लभ्+धा–**लब्धा**;

दह्+ता-दघ्+ता-दघ्+धा-दग्धा; नह्+ता-पृ० १०१ नि (१) (ब) प्रमाणें नध्+धा-नद्धा; सृज्+ता-पृ० ९४ नि० १८ प्रमाणें स्रज्+ता-स्रष्+ता-स्रष्+टा-स्रष्टा; सृप्-सर्प्ता अ० स्रप्ता; तृप्-तर्पिता, तर्प्ता अथवा त्रप्ता.

**मुद्** आत्मनेपदी.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **मोदिताहे** | **मोदितास्वहे** | **मोदितास्महे** |
| द्वि० पु० | **मोदितासे** | **मोदितासाथे** | **मोदिताध्वे** |
| तृ० पु० | **मोदिता** | **मोदितारौ** | **मोदितारः** |

पृ० ३८-३९ नि० २ पहा.

## २ द्वितीय भविष्य.

१ वर्तमानकाळाच्या प्रत्ययांपूर्वी **स्य** प्रत्यय लावून ह्या काळाचे प्रत्यय तयार करितात. धातु **सेट्** असल्यास **स्य** पूर्वी **इ** आगम होतो, **अनिट्** असल्यास होत नाहीं, व **वेट्** असल्यास विकल्पानें होतो. हे प्रत्यय पुढें असतां धातूच्या अन्त्य आणि ऱ्हस्व उपान्त्य स्वरास गुण होतो.

२ पुरुषबोधक* प्रत्ययांहून भिन्न **स्**कारादि प्रत्यय पुढें असतां धातूच्या अन्तीं असणाऱ्या **स्** ह्या वर्णास **त्** आदेश होतो.

३ परस्मैस्पदी **गम्, हन्** व **ऋ**कारान्त धातु हे जरी **अनिट्** आहेत, तथापि ह्या काळांत व संकेतार्थांत त्यांपुढील **स्य** पूर्वी **इ** आगम होतो; आणि **कृत्** आणि **नृत्** हे जरी **सेट्** आहेत, तथापि त्यांपुढील **स्य** मागें **इ** आगम विकल्पानें होतो.

४ **कृप्, वृत्, वृध्, शृध्** व **स्यन्द्** हे धातु द्वितीय भविष्यांत विकल्पानें परस्मैपदी आहेत; आणि जेव्हां ते परस्मैपदी असतात, तेव्हां त्यांपुढील **स्य** पूर्वी **इ** आगम होत नाहीं. ह्याच नियम **कृप्** धातूस प्रथम भविष्यांतही लागू करावा.

**लभ्.**

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **लप्स्ये** | **लप्स्यावहे** | **लप्स्यामहे** |
| द्वि० पु० | **लप्स्यसे** | **लप्स्येथे** | **लप्स्यध्वे** |
| तृ० पु० | **लप्स्यते** | **लप्स्येते** | **लप्स्यन्ते** |

---

* पुरुषबोधक प्रत्ययांहून भिन्न म्ह० **मि, सि, ति,** इ० पुरुष व संख्या ह्यांचे दर्शक प्रत्यय व दुसरे एक दोन प्रत्यय ह्यांहून निराळे सर्व प्रत्यय.

### भू.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **भविष्यामि** | **भविष्यावः** | **भविष्यामः** |
| द्वि० पु० | **भविष्यसि** | **भविष्यथः** | **भविष्यथ** |
| तृ० पु० | **भविष्यति** | **भविष्यतः** | **भविष्यन्ति** |

**लभ्+स्य–लप्+स्य+ते–लप्स्यते; दिश्+स्य–देश्–देष्–देक्–देक्+ष्य+ति–देक्ष्यति; दुह्+स्य–दोह्–दोघ्–धोघ्–धोक्–धोक्+ष्यति–धोक्ष्यति; दृश्+स्य**–पृ० ९४ नि० १८ प्रमाणें **द्रश्–द्रष्–द्रक्–द्रक्+ष्यति–द्रक्ष्यति; सृप्+स्यति–सर्प्** अ० पृ० ९४ नि० १९ प्रमाणें **स्रप्–सर्प्स्यति** अ० **स्रप्स्यति; तृप्–तर्पिष्यति, तर्प्स्यति** अ० **त्रप्स्यति; वृध्+स्य–वर्ध्–वर्त्–वर्त्स्यति**, अ० वरील नियम ३ प्रमाणें **वर्धिष्यते; स्यन्त्स्यति, स्यन्दिष्यते** अथवा **स्यन्त्स्यते.**

### संकेतार्थक.

१ संकेतार्थकांत **स्य** पुढें वर्तमानकाळाचे प्रत्यय न जोडतां प्रथम भूतकाळाचे प्रत्यय जोडावयाचे; धातूच्या पूर्वी **अ** जोडावयाचा; इतर फेरफार द्वितीय भविष्याप्रमाणें करावयाचे.

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अलप्स्ये** | **अलप्स्यावहि** | **अलप्स्यामहि** |
| द्वि० पु० | **अलप्स्यथाः** | **अलप्स्येथाम्** | **अलप्स्यध्वम्** |
| तृ० पु० | **अलप्स्यत** | **अलप्स्येताम्** | **अलप्स्यन्त** |
| प्र० पु० | **अभविष्यम्** | **अभविष्याव** | **अभविष्याम** |
| द्वि० पु० | **अभविष्यः** | **अभविष्यतम्** | **अभविष्यत** |
| तृ० पु० | **अभविष्यत्** | **अभविष्यताम्** | **अभविष्यन्** |

२ **अधि+इ** ह्यांतील **इ** ह्यास तृतीय भूतांत व संकेतार्थकांत **गा** असा आदेश विकल्पानें होतो आणि नंतर व्यंजन पुढें असतां त्यास **गी** असा आदेश होतो. जसें—**अध्यैष्यत** अ० **अध्यगीष्यत.**

३ आर्धधातुक प्रकारांतील कर्मणि रूपें अंगास फक्त आत्मनेपदी प्रत्यय लावून करावयाचीं.

४ द्वितीय भविष्य सामान्यतः भविष्यकाळ व विशेषतः **चालू दिवसांतील भविष्यकाळ** दाखवितो; आणि प्रथम भविष्य **चालू दिवसाहून निराळ्या दिवसांतील मात्र** भविष्य दाखवितो.

१ संकेतार्थक वाक्यांत क्रियेची अनिष्पत्ति सुचवावयाची असतां (म्ह० क्रियेचें न घडणें सुचवावयाचें असतां ) ह्या संकेतार्थक क्रियापदाची योजना करितात. ह्यानें भूतकालिक व भविष्यकालिक संकेत दर्शविला जातो.

---

हरिद्वारं गमिष्यामि तत्र च गङ्गाया उद्गमं हिमाचलं च द्रक्ष्यामि सर्वासां देवतानां पूजां च विधाय स्वकीयं ग्रामं प्रतिनिवर्त्स्यामि।

यद्यत्ते हितकरं तत्सर्वं कर्तुं यतिष्ये।

स्वामिनादिष्टोऽपि पुष्पाणि नानयसि यदानीतानि न वेति स प्रक्ष्यति तदा किं प्रतिवक्ष्यसि।

अस्माकं मित्रं हिरण्यको नाम मूषकराजो गण्डकीतीरे चित्रवने निवसति सोऽस्माकं पाशांश्छेत्स्यति।

यदि मे बाणपथमायास्यस्यसंशयं मरिष्यसि।

सुवृष्टिश्चेदभविष्यत्तदा सुभिक्षमभविष्यत्।

यदि स धर्ममत्यक्ष्यद्दुःखभाक्समवर्तिष्यत।

कुसुमपुर एकस्मिन्गृहे शत्रुणा पातितमग्निं यदि कृष्णवर्मा न निरवापयिष्यत्तदा सर्वमेव नगरमग्निरधक्ष्यत्।

कुम्भकर्णस्य गात्राणि रामो रणे कर्त्स्यतीति केन संभावितम्।

पुष्करेण भ्रात्रा द्यूते जितो नलो राज्यात्परिभ्रष्टो दमयन्त्या सह वनमियाय। तत्रापि कलिना बहुविधैश्छलैः पीडितः सुप्तां दमयन्तीमुत्सृज्यैकस्मिन्स्थले जगाम। गच्छंश्च महान्तं दावं ददर्श। तन्मध्ये कर्कोटको नाम नाग आसीत्। तं स राजाग्नेर्मध्यादुद्धृत्य कानिचित्पदानि निनाय। दशमे पदे कर्कोटको नलमदशत्। तेन नैषधस्य स्वीयं रूपमन्तरधीयत। आत्मानं विकृतं दृष्ट्वा स राजा विस्मितस्तस्थौ।

ततः कर्कोटको नागः सान्त्वयन्नलमब्रवीत्।
मया तेऽन्तर्हितं रूपं न त्वां विद्युर्जना इति॥
यत्कृते चासि निकृतो दुःखेन महता नल।
विषेण स मदीयेन त्वयि दुःखं निवत्स्यति॥
विषेण संवृतैर्गात्रैर्यावत्त्वां न विमोक्ष्यति।
तावत्त्वयि महाराज दुःखं वै स निवत्स्यति॥

अनागा येन निकृतस्त्वमनर्हो जनाधिप ।
क्रोधादसूययित्वा त्वं रक्षा मे भवतः कृता ॥

न ते भयं महावीर दंष्ट्रिभ्यः शत्रुतोऽपि वा ।
ब्रह्मर्षिभ्यश्च भविता मत्प्रसादान्नराधिप ॥

राजन्विषनिमित्ता च न ते पीडा भविष्यति ।
संग्रामेषु च राजेन्द्र शश्वज्जयमवाप्स्यसि ॥

गच्छ राजन्नितः सूतो बाहुकोऽहमिति ब्रुवन् ।
समीपमृतुपर्णस्य स हि चैवाक्षनैपुणः ॥

अयोध्यां नगरीं रम्यामद्य वै निषधेश्वर ।
स तेऽक्षहृदयं दाता राजाश्वहृदयेन वै ॥

इक्ष्वाकुकुलजः श्रीमान्मित्रं चैव भविष्यति ।
भविष्यसि यदाक्षज्ञः श्रेयसा योक्ष्यसे तदा ॥

समेष्यसि च दारैस्त्वं मा स्म शोके मनः *कृथाः ।
राज्येन तनयाभ्यां च सत्यमेतद्ब्रवीमि ते ॥

स्वरूपं च यदा द्रष्टुमिच्छेथास्त्वं नराधिप ।
संस्मर्तव्यस्तदा तेऽहं वासश्चेदं निवासयेः ॥

अनेन वाससा च्छन्नः स्वं रूपं प्रतिपत्स्यसे ।
इत्युक्त्वा प्रददौ तस्मै दिव्यं वासोयुगं तदा ॥

एवं नलं च संदिश्य वासो दत्त्वा च कौरव ।
नागराजस्ततो †राजंस्तत्रैवान्तरधीयत ॥

मरिष्यामि विजेष्ये वा हृताश्चेत्तनया मम ।
हनिष्यामि रिपूंस्तूर्णं न जीविष्यामि दुःखितः ॥

समेष्यन्ते मुनयो देवाः कथयिष्यन्ति चानिशम् ।
दशग्रीवस्य दुर्नीतैर्विनष्टं रक्षसां कुलं ॥

---

* हें रूप कृ धातूच्या आत्मनेपदी तृतीय भूतकाळाच्या द्वितीय पुरुषाच्या एकवचनाचें आहे. येथें अ आगमाचा लोप झाला आहे. ( पाठ २२ नि० २ पहा. )

† ज्या राजाला नलाची कथा सांगितली आहे त्या राजाला उद्देशून हा शब्द योजिला आहे.

मधुकर मदिराक्ष्याः शंस तस्याः प्रवृत्तिं
वरतनुरथवासौ नैव दृष्टा त्वया मे ।
यदि सुरभिमवाप्स्यस्तन्मुखोच्छ्वासगन्धं
तव रतिरभविष्यत्पुण्डरीके किमस्मिन् ॥
अकरिष्यदसौ * पापमतिनिष्करुणैव सा ।
नाभविष्यमहं तत्र यदि तत्परिपन्थिनी ॥

---

१ जर नळ आज माझ्या दृष्टीस पडणार नाहीं ( दृश् ) तर मी अग्नींत देह टाकीन ( परि+त्यज् ) आणि मरेन ( मृ ).

२ राजा आपला येण्याचा हेतु सांगत नाहीं. बरें, तो शेवटीं मला समजेल ( ज्ञा ).

३ सुदेवा, ऋतुपर्णाकडे जा, आणि "दमयंती पुनः स्वयंवर करणार आहे ( आ+स्था ), पुष्कळ राजे व राजपुत्र तेथें जात आहेत, व उद्यां तो होणार आहे ( प्र+वृत् )" असें त्यास सांग.

४ तुझी इच्छा असेल तर एका दिवसांत कुंडिनपुरास जा. "कारण सूर्य उगवतांच ( उद्+इ ) ती अन्य पतीस वरील ( वृ )."

५ दमयंती पर्णादास पुष्कळ धन देती झाली आणि म्हणाली कीं, "नळ येईल ( आ+गम् ) तेव्हां मी तुला अधिक द्रव्य देईन ( दा ). तूं मजसाठीं फार श्रम करिता झालास, असे श्रम कोणी करणार नाहीं ( कृ ), तुझ्या † यत्नानें मी आपल्या पतीशीं संगत होईन ( युज् कर्मणि अ० सम्+गम्, सम्+इ )."

६ अरे बाहुका, तूं मला फसवूं नको; हे दुर्बळ घोडे मला एका दिवसांत कुंडिनपुरास कसे नेतील ( वह् अ० नी ) ?

७ आपण आपल्या घोड्यावर स्वार होऊं ( आ+रुह् ) आणि जलदीनें जाऊं.

८ बाहुक राजास म्हणाला, "ह्या झाडावरील पानांची व फळांची संख्या तूं मला सांगता झालास; बरें तुझ्या समक्ष हें झाड मी तोडीन ( शद् प्रयोजक अ० छिद् ) आणि पानें मोजीन."

---

* एक दुष्ट स्त्री मात्सर्यानें एका तरुण स्त्रीचा जीव घेत असतां ज्या वृद्ध स्त्रीनें तीस अटकाव केला ती हें म्हणते.

† यत्नसामर्थ्यात् हें अथवा ह्यासारिखें दुसरें योजावें.

९ तुम्ही चांडाळांबरोबर खातां म्हणून मी तुम्हांस शिवणार नाहीं ( **स्पृश्** ).
१० तो राहाण्याकरितां घर बांधण्यास केव्हां आरंभ करील ( **आ+रभ्** ) हें मला ठाऊक नाहीं.

११ यज्ञदत्त घरांत गेला, तेव्हां जर तो त्यास नमस्कार करिता ( **प्र+नम्** ) तर तो त्यास अभिमानी पुरुष न मानिता ( **मन्** ).

१२ जर तो शत्रूसमोर एकटाच गेला असता ( **गम्** ) तर तो शत्रु त्यास मारिता ( **हन्** ).

१३ जर तो नाग देवदत्तास डसता ( **दंश्** ) आणि औषध आणण्यास कोणी नसता ( **भू** ) तर तो खचित मेला असता ( **मृ** अ० **उप+रम्** ).

१४ माझ्या आशीर्वादानें तूं पृथ्वीचें सार्वभौमत्व भोगशील ( **भुज्** ). तुझ्या सर्व गुणांनीं युक्त असा पुत्र तुला प्राप्त होईल ( **आप्** अ० **लभ्** ). तूं आपल्या प्रजांचें रंजन कर.

---

## भाग २.

## कर्मणि.

प्रथम पुस्तकांत व ह्या पुस्तकांत कित्येक ठिकाणीं दिलेले व येथें खालीं लिहिलेले सर्व नियम विद्यार्थ्यांनीं तोंडपाठ करावे.

१ सार्वधातुक प्रकरणांत धातूस **य** जोडतात तो **अपित्** आहे.

२ कर्मणि **य** पुढें असतां खालीं लिहिलेले फेरफार होतातः—

( अ ) **ऋ**कारान्त धातुसंबंधी **ऋ** ह्या वर्णास **रि** असा आदेश होतो. जसें **कृ** धातूचें रूप **क्रियते**.

( ब ) संयोगादि **ऋ** व **जागृ** व **ऋ** धातु ह्यांस गुण होतो. जसें **स्मृ** धातूचें **स्मर्यते**.

( क ) चौदाव्या पाठांतील चवथा नियम येथें लागू पडतो. जसें **वच्** धातूचें **उच्यते**.

(ड) दा व धा ह्या धातूंच्या व असें रूप होणाऱ्या * धातूंच्या व मा, स्था, गै, पा 'पिणें', सो आणि हा 'टाकणें', त्यांच्या अंत्य स्वरास य पुढें असतां ई आदेश होतो. जसे–दीयते, धीयते इ०.

(इ) अन्त्य इ व उ हे स्वर दीर्घ होतात. जसें जि ह्याचें जीयते, स्तु ह्याचें स्तूयते.

(फ) शेवटील दीर्घ ॠकारास ईर् असा आदेश होतो, परंतु त्यामागें ओष्ठ्य वर्ण अ० व् असल्यास त्यास ऊर् असा आदेश होतो. (पाठ १ नि० ९ पहा).

(ज) मन्थ्, अञ्च् 'जाणें,' शंस्, दंश्, सञ्ज्, रञ्ज्, अञ्ज्, भञ्ज्, स्कन्द्, ग्रन्थ्, स्तम्भ्, बन्ध्, भ्रंश्, इ०कांहीं धातूंतील अनुनासिक लुप्त होतो.

३ अजंत धातूंचीं व हन्, ग्रह्, दृश्, ह्या धातूंचीं प्रथम भविष्यकाळीं व द्वितीय भविष्यकाळीं कर्मणि व भावे रूपें विकल्पें त्यांच्या स्वरास वृद्धि † करून व धातु सेट् असोत किंवा अनिट् असोत त्यांत इ आगमपूर्वक आत्मनेपदी प्रत्यय लावून होतात. धातु आकारांत असल्यास त्यास ह्या वैकल्पिक रूपांत य् हा वर्ण जोडावा.

(अ) खालीं लिहिलेलीं रूपें कशीं होतात तीं सांगाः—

स्तर्यते, स्तीर्यते, तीर्ये, पूर्ये, उह्यते, अवसीयते, भाविष्यते, घानिष्यते, भविष्यते, दर्शिष्यते, द्रक्ष्यते, हारिष्यते, नायिष्यते, नेष्यते, स्थास्यते, हरिष्यते, स्थायिष्यते.

(ब) खालीं लिहिलेल्या धातूंच्या द्वितीय भविष्याचीं कर्मणि व भावे रूपें लिहाः—

हृ, कॄ, वप्, यज्, सह्, नह्, रुह्, लिह्, बन्ध्, ग्लै, हा, भिद्, वृत्, रुच्, दु, लू, सो, स्तु, रु, शास्.

(क) शॄ, वप्, यज्, दॄ, वॄ, कॄ, सृ, स्मृ, व्यच् ह्या धातूंच्या वर्तमानकाळाचीं व प्रथम भूतकाळाचीं कर्मणि व भावे रूपें लिहा.

---

* जेथें जेथें हे शब्द योजिले असतील तेथें तेथें दा द्वि० ग० 'कापणें' व दै प्र० ग० 'शुद्ध करणें' ह्यांचें ग्रहण नाहीं असें समजावें.

† दृश् धातूस हा विकार न होतां गुण मात्र होतो, आणि षष्ठ गणांतील नू व धू ह्या धातूंस बहुधा गुण किंवा वृद्धि होत नाहीं, तरी ह्या स्थळीं त्यांस हा विकार होतो. (पृ० ९२ ति० ११ पहा.)

# शब्दकोश १५.

अक्ष पु० सोंगटी वगैरे खेळण्याचा फांसा.

अक्षज्ञ वि० फांसे (खेळण्याची विद्या) जाणणारा.

अक्षनैपुण वि० फांसे जुळण्याच्या कामांत निपुण.

अक्षहृदय न० फांसे धरण्याची अ० टाकण्याची युक्ति.

अतिनिष्करुण वि० (अति अत्यन्त) फार निर्दय, अति दुष्ट.

अनर्ह वि० अयोग्य.

अनागस् वि० निरपराधी.

अनिशम् क्रि० वि० नेहमीं, एकसारखें.

अश्वहृदय न० अश्वविद्या.

असंशयम् क्रि० वि० निस्संशय.

असूयय* मत्सर करणें.

इक्ष्वाकु पु० सूर्यवंशांतील राजांचा मूळ पुरुष.

ईश्वर पु० स्वामी, प्रभु.

उद्गम पु० उगम, वर जाणें.

कर्कोटक पु० एका सर्पाचें नांव.

कलि पु० कलिपुरुष, कलियुग.

कुण्डिनपुर न० एका शहराचें नांव.

कुम्भकर्ण पु० रावणाच्या एका भावाचें नांव.

कुलज वि० (कुल न० वंश, जन् धातूचें रूप ज, उत्पन्न झालेला) वंशज.

कृ उप० नि, पीडा देणें.

कृते अ० साठीं, मुळें, करितां.

कौरव पु० कुरुवंशज.

गण्डकी स्त्री० एका नदीचें नांव.

गण्डकीतीर न० गण्डकी ह्या नांवाच्या नदीचें तीर.

गात्र न० अवयव, शरीर.

चित्रवन न० एका अरण्याचें नांव.

छल पु० न० मिष, लबाडी.

तनय पु० पुत्र.

तन्मध्ये त्याच्यामध्यें.

तन्मुखोच्छ्वासगन्ध पु० (उच्छ्वास पु० उसासा, गन्ध पु० सुवास) तिच्या तोंडांतील श्वासाचा सुवास.

दंष्ट्रिन् पु० तीक्ष्ण दाढेचा प्राणी, साप.

दशम वि० दहावा.

दाव पु० वणवा, दावानल, अरण्य.

दिव्य वि० स्वर्गसंबंधी, सुंदर.

दुःखभाज् वि० दुःख भोगणारा, दुर्दैवी.

दुःखित वि० पीडित.

दुर्नीत न० दुराचरण.

---

* हा नामधातु असूया शब्दांतील अन्त्य स्वराचा लोप करून व दशम गणाप्रमाणें अय जोडून साधला आहे.

**धा** उप० **अन्तर्**, गुप्त होणें.
**निषधेश्वर** पु० निषध देशाचा राजा.
**नैपुण्य** न० कौशल्य.
**पद्** उप० **प्रति**, मिळविणें.
**परिपन्थिन्** वि० आडवा येणारा.
**तत्परिपन्थिनी** स्त्री० तिला आडवी येणारी.
**परिभ्रष्ट** भू० का० धा० **परि+भ्रंश्** धातूचें, भ्रष्ट झालेला, मुकलेला.
**पातित** (भू० धातुसाधित कर्मणि प्रयोजक **पत्** धातूचें)पडलेला,टाकलेला.
**पुष्कर** पु० विशेषनाम.
**बहुविध** वि० नानाप्रकारचें.
**बाणपथ** पु० ( **पथिन्** पु० मार्ग ) बाणाची वाट.
**बाहुक** पु० सारथ्याचा वेष घेतलेल्या नळाचें नांव.
**मूषक** पु० उंदीर; **मूषकराज** उंदरांचा राजा.
**युग** न० जोडी, जूग; **वासोयुग** न० वस्त्रांची जोडी.
**रति** स्त्री० प्रीति.
**वच्** उप० **प्रति**, उत्तर देणें.
**वस्** प्रयोजक, उप० **नि**, नेसणें,पांघरणें.
**वापय**, हें **वा** धातूचें प्रयोजक रूप, उप० **निर्**, घालविणें, मालविणें.
**विनष्ट** भू०का०धा० **वि+नश्** धातूचें, नाश पावलेलें.
**विस्मित** ( **वि+स्मि** धातूचें भू० का० धा० ) आश्चर्यचकित.
**शत्रुतस्** क्रि० वि० अ० शत्रूपासून.
**शश्वत्** क्रि० वि० अ० निरंतर.
**संभावित** भू० का०धा० क० प्रयोजक **सम्+भू** धातूचें, होण्याजोगें.
**संस्मर्तव्य** वि० ज्याचें स्मरण करावें असा.
**सुभिक्ष** न० अन्नाची विपुलता.
**सूत** पु० सारथी.
**स्वकीय** वि० आपला.
**हरिद्वार** न० हिमालयाच्या पायथ्याशीं असणाऱ्या एका पवित्र स्थलाचें नाव.
**हिमाचल** पु० हिमालय.
**हिरण्यक** पु० एका उंदराचें नांव.

---

अंत **उदर्क** पु०, **अवसान** न०.
अन्तीं **उदर्के**.
अभिमानी पुरुष **कापुरुष, कुपुरुष**.
आशीर्वाद **आशिस्** स्त्री०.
एकटा **अरक्षित** वि०.
पर्णाद **पर्णाद** पु० विशेषनाम.
फसविणें **अति+सम्+धा, वि+प्र+लभ्, वञ्च्** द० ग० आ० प०.
बांधणें **निर्+मा**.
येणें **आगमन** न०.
रंजन करणें **अनु+रञ्ज्** प्रयोजक.
संध्या **संध्या** स्त्री०.
समक्ष **समक्षम्** क्रि० वि०, **प्रत्यक्षम्** क्रि० वि०.
सार्वभौमत्व **साम्राज्य** न०, **पारमेष्ठ्य** न०,
सुदेव **सुदेव** पु०.
हेतु **प्रयोजन** न०. **उद्देश** पु०.

१० * **अय**चा अंत्य **अ** इट्संबंधीं **इ** पुढें असतां लुप्त होतो; आणि भूतकालवाचक धातुसाधितांच्या प्रत्ययांपूर्वी, **यादि** प्रत्ययांपूर्वी व इतर धातुसाधितांच्या स्वरादि प्रत्ययापूर्वी सगळ्या **अय**चा लोप होतो; परंतु हा **अय** लागण्यापूर्वी धातूच्या स्वरांत जे फेरफार होतात ते तसेच राहातात; जसें **विद्** जाणणें, **विदित** जाणलेलें व **वेदित** जाणविलेलें. **संहृत्य** ( मूळरूप ), **संहार्य** ( प्रयोजक ). धातूचा उपान्त्य वर्ण ऱ्हस्व स्वर असतां भूतकालवाचक धातुसाधित अव्ययाच्या **य** पूर्वीं **अय** यांतील अंत्य **अ**चा मात्र लोप होतो. जसें, **प्रणमय्य**.

११ दहाव्या गणांतील धातूंचीं प्रयोजक रूपें त्यांच्या मूलरूपाप्रमाणेंच होतात.

१२ अकर्मक, सकर्मक असून ज्ञानार्थक शब्दकर्मक, गत्यर्थक, व भक्षणार्थक आणि **दृश्** ह्या धातूंच्या प्रयोजकरूपाचा प्रयोग करणें असल्यास मूळ क्रियेचा कर्ता द्वितीयाविभक्त्यंत योजितात. **हृ** व **कृ** ह्या धातूंस हा नियम विकल्पानें लागतो; आणि **नी** आणि **वह्** धातूंस मुळींच लागत नाहीं. इतर ठिकाणीं मूळकर्ता तृतीयान्त असतो.

---

**यजमानो यज्ञकर्मर्त्विग्भिरारम्भयति ।**

**इन्द्रः स्वयशः किन्नरमिथुनानि गापयामास ।**

**पुष्पमित्रो यजते याजकास्तं याजयन्ति ।**

**कृष्णवर्मा पुत्रेण ब्राह्मणेभ्यः प्रत्यहं शतं गा दापयति ।**

**जानकीं रथमारोप्य जाह्नवीतीरमासाद्य रामाज्ञापितो लक्ष्मणस्तां विजहौ ।**

**प्रभुप्रसादलवोऽप्यधीरप्रकृतेर्दासजनस्य प्रागल्भ्यं जनयति ।**

**असुरस्य तिग्मतपसा प्रीतात्मा भगवाञ्शंकरः स्वीयं रूपं तं दर्शमायास ।**

**नगेन्द्रसक्तां दृष्टिं पार्श्वे कस्यापि क्रन्दितमाकर्ण्य राजा निवर्तयामास ।**

**अस्मिँल्लोकेऽनुष्ठितो धर्मस्तस्य कर्तारं स्वर्गलोकं प्रापयति ।**

**ग्रीष्मकाले घर्मोऽङ्गानि ग्लपयति स्वेदं प्रवर्तयति तृष्णां परिवर्धयति च ।**

---

* दहाव्या गणांतील **अय** ह्यासही हा नियम लागू आहे.

बहिर्द्वारि प्रवृत्तमृषिकुमारकं प्रवेशयितुं प्रतिहारीमाज्ञापयामास राजा।

चिरनष्टमात्मनो बालकं दृष्ट्वा सा सुन्दरी भृशं रुरोद तं च दृढं परिष्वज्याश्रुभिः स्नपयामास।

शत्रूनगमयत्स्वर्गं वेदार्थं स्वानवेदयत्।
आशयच्चामृतं देवान्वेदमध्यापयद्विधिम्।
आसयत्सलिले पृथ्वीं यः स मे श्रीहरिर्गतिः॥
रमयन्ति मनस्तावद्भावाः संसारसंभवाः।
यावन्न श्रूयते साश्रुलोकफूत्कारकाहलः॥
स्वीयं यशः पौरुषं च गुप्तये कथितं च यत्।
कृतं यदुपकाराय धर्मज्ञो न प्रकाशयेत्॥
वेदाविनाशिनं नित्यं य*एनमजमव्ययम्।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम्॥
नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः॥
संयोजयति विद्यैव नीचगापि नरं सरित्।
समुद्रमिव दुर्धर्षं नृपं भाग्यमतः परम्॥
यदि सत्याभिसंधस्त्वं राजन्रामं प्रवासय।
नव पञ्च च वर्षाणि निर्जने गहने वने॥
युधिष्ठिरस्तु कौन्तेयो मयमाहूय सत्वरम्।
कारयामास वै तेन सभामद्भुतदर्शनाम्॥

दृष्टिस्तृणीकृतजगत्त्रयसत्त्वसारा
धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम्।
कौमारकेऽपि गिरिवद्गुरुतां दधानो
वीरो रसः किमयमेत्युत दर्प एव॥

---

१ राजा ब्राह्मणांकडून द्रव्य घेववितो † ( प्रति+ग्रह् ).
२ वसिष्ठ दशरथाकडून यज्ञ करविता झाला ( यज् ).

---

* मनुष्याच्या आत्म्यास अथवा जगाच्या आत्म्यास अनुलक्षून हें वाक्य आहे.
† ह्या पाठांत प्रयोजक रूपें योजावीं.

३ बाजीरावाचीं दुष्ट कृत्यें आम्हांस लाजवितात ( **ह्री** ).

४ इंद्र आपल्या स्वतःचे रथांत मातलीकडून अर्जुनास स्वर्गास आणविता झाला ( **आ+नी** ).

५ तो पहिल्यानें मनुष्यांस विश्वासवितो ( **वि+श्वस्** ) आणि मग त्यांस संहारितो ( **नश्** अ० **अव+सद्** अ० **ध्वंस्** ).

६ गुरूनें आज्ञापिलेला ( **आ+ज्ञा** ) तो दररोज त्याच्या गाईस चारिता झाला ( **चर्** ) आणि त्यांस पाणी पाजिता झाला ( **पा** ).

७ तो आपली प्रातःसंध्या समाप्त करिता झाला ( **सम्+आप्** ), नंतर सोळा ब्राह्मणांस जेवूं घालिता झाला ( **भुज्** ), आणि मग आपण जेवता झाला.

८ रामाचें चौदा वर्षें वनांत राहण्याकरितां जाणें दशरथाच्या मृत्यूस कारण झालें ( **प्र+सञ्ज्** ).

९ पांडव व धृतराष्ट्राचे पुत्र जेथें युद्ध करीत होते, तेथें जें जें झालें तें तें संजय धृतराष्ट्रास ऐकविता झाला ( **श्रु** ).

१० जें कधीं कधीं भावांमध्यें व मित्रांमध्यें युद्ध करवितें ( **युध्** ) आणि कधीं कधीं मनुष्याकडून आपलें मस्तक कापवितें ( **छिद्** ) तें दुर्दैव होय.

११ पिता आपल्या कन्येचा विवाह चांगल्या चालीच्या विद्वान, कुलीन, तरुण पुरुषाशीं करो ( **परि+नी, वि+वह्** अ० **उद्+वह्** ).

१२ ह्या मुलानें जे श्लोक म्हटले ते मला माझी प्रिया व बंधु लक्ष्मण यांसह मी प्रस्रवण पर्वतावर असलेल्या वेळेचें स्मरण देतात ( **स्मृ** ).

१३ श्यापर्ण सौषद्मनाचे यज्ञांत गेले, आणि वेदीमध्यें बसले. त्यावरून राजा त्यांस उठविण्याकरितां ( **उद्+स्था*** ) आपल्या सेवकांस आज्ञा करिता झाला. ते त्याप्रमाणें त्यांस उठविते झाले. ते उठविले जात असतां मोठ्यानें ओरडले.

---

# शब्दकोश २१.

**अज** वि० जन्मरहित.

**अधीर** वि० उतावळा, कोत्या विचाराचा.

**अभिसंधा** स्त्री० प्रतिज्ञा, निश्चय.

**अम्** प्र० ग० प० प० जाणें.

**अमृत** न० अमृत.

**अर्थ** पु० अर्थ.

**अविनाशिन्** वि० अनश्वर.

**अव्यय** वि० निर्विकार.

**काहल** पु० ध्वनि.

**किन्नर** पु० देवयोनिविशेष.

**कृष्णवर्मन्** पु० एका मनुष्याचें नांव.

---

* **स्था** व **स्तम्भ्** या धातूंचा **स्**, **उद्** या उपसर्गानंतर लुप्त होतो.

**कौमारक** न० बाल्यावस्था.
**क्रन्दित** भू० धा० वि० ( नामाप्रमाणें योजिलेलें ) न० ओरडणें.
**क्लिद्** च० ग० प० प० ओलें होणें.
**क्षै** प्र० ग० प० प० क्षय पावणें.
**गति** स्त्री० चाल, चालण्याची ढब.
**गहन** वि० दुर्गम.
**गुप्ति** स्त्री० रक्षण, गुप्तपणा.
**गुरुता** स्त्री० मोठेपणा, शोभा.
**ग्लै** प्र० ग० प० प० ग्लानि येणें.
**घर्म** पु० उष्णता.
**जाह्नवी** स्त्री० गंगानदी.
**ज्वल्** प्र० ग० प० प० जळणें.
**तिग्म** वि० तीक्ष्ण.
**तृष्णा** स्त्री० तहान.
**दल्** प्र० ग० प० प० फोडणें, फाडणें.
**दुर्धर्ष** वि० दुर्गम, जवळ जाण्यास कठिण.
**धरित्री** स्त्री० पृथ्वी.
**नगेन्द्र** पु० पर्वतराज, हिमालय पर्वत.
**नित्य** वि० नित्य.
**निर्जन** वि० ओसाड, जनरहित.
**नीचग** वि० नीच मनुष्याकडे जाणारी, उतरत्या स्थलाकडे वाहणारी.
**पार्थ** पु० पृथेचा पुत्र, पांडवाचें नांव.
**पुष्पमित्र** पु० एका राजाचें नांव.
**पौरुष** न० पराक्रम, मर्दपणा.
**प्रकृति** स्त्री० स्वभाव.
**प्रतिहारी** स्त्री० द्वारपालिका, दरवाज्याजवळ पहारा करणारी स्त्री.
**प्रागल्भ्य** न० निर्भयपणा, धीटपणा.
**फूत्कार** पु० स्फुंदणें.
**मय** पु० एका शिल्पशास्त्रवेत्त्याचें नांव.
**मारुत** पु० वारा.
**मिथुन** न० युग्म, जोडा.
**वम्** प्र० ग० प० प० ओकणें.
**वल्** प्र० ग० आ० प० आच्छादणें.
**वीररस** पु० युद्धसंबंधीं भाव, नऊ रसांपैकीं एक रस.
**श्रीहरि** पु० विष्णु.
**संभव** पु० उगम.
**सत्त्व** न० मोठेपणा, शक्ति.
**सलिल** न० पाणी.
**स्वेद** पु० घाम.

---

ओरडणें **रु** द्वि० ग० प० प०, **क्रन्द्** प्र० ग० प० प०.
कधीं कधीं **काले काले, प्रसंगवशात्, कदा कदा.**
कुलीन **कुलीन** वि०, **अभिजनवत्** वि०.
चांगल्या चालीचा **सुचरित** वि.
त्याप्रमाणें **तथा च, तथा, इत्थम्.**
प्रस्रवण **प्रस्रवण** पु० ( एका पर्वताचें नांव ).
म्हणणें **पठ्** प्र० ग० प० प०.
विद्वान **कृतविद्य** वि०, **संस्कृतचित्त** वि०, **सुविनीत** वि०.
वेदि **वेदि** स्त्री० होमशाळेंतील दोन कुंडांमधील जागा.
सौषद्मन **सौषद्मन** एका राजाचें नांव.
श्यापर्ण **श्यापर्ण** पु० श्यापर्णवंशांतील एक व्यक्ति; **श्यापर्ण** हा पुरोहितांचा वंश होता.

---

# द्वाविंशः पाठः ।

## तृतीयभूत.

### ( किंवा सामान्य भूत. )

१ नुक्तीच घडलेली अ० आजच झालेली क्रिया दर्शविणें असल्यास अ० कोणत्याही काळाचा संबंध न ठेवितां फक्त क्रिया पूर्ण झाली असें दर्शविणें असल्यास तृतीयभूताची योजना करितात. कोणतीही गतकथा सांगावयाची असतां ह्या काळाची योजना करूं नये.* **अजनि ते वै पुत्रः ( ऐतरेय ब्राह्मण )** 'तुला पुत्र झाला आहे;' **तदहं तुभ्यमेव ददामि य एवं सत्यमवादीः ( ऐतरेय ब्राह्मण )** 'जो तूं असें खरें बोललास त्या तुला मी तें देतों;' **उदु श्रिय उषसो रोचमाना अस्थुः ( ऋग्वेदसंहिता )** 'प्रातःकालच्या दैदीप्यमान शोभा उगवल्या आहेत ( दिसूं लागल्या आहेत ).'

२ तृतीयभूताशीं **मा** ह्या निषेधार्थक अव्ययाचा योग केला असतां आज्ञार्थ गम्यमान होतो. अशा स्थलीं भूतकाळाच्या **अ** आगमाचा लोप होतो. जसें— **मा त्वं गमः** 'तूं जाऊं नको.' **मा नो हिंसीज्जनिता यः पृथिव्याः** 'पृथ्वीचा जो कर्ता तो आम्हांस न मारो.'

३ तृतीयभूताचे सात प्रकार आहेत. प्रथम भूताप्रमाणें त्यांतही धातूंस **अ** अथवा **आ** आगम होतो.

## प्रकार पहिला.

१ तृतीय पुरुषीं बहुवचनाचा प्रत्यय शिवायकरून बाकीचे सर्व प्रत्यय प्रथम भूताप्रमाणेंच जाणावे. तृतीयपुरुषीं बहुवचनाचा प्रत्यय **उस्** आहे. धातूंच्या अंतीं **आ** असल्यास त्याचा हा **उस्** पुढें असतां लोप होतो.

**प्रत्यय.**

| | ए० व० | द्वि० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अम्** | **व** | **म** |
| द्वि० पु० | **स्** | **तम्** | **त** |
| तृ० पु० | **त्** | **ताम्** | **उस्** |

२ **पा** 'पिणें,' **स्था, दा, धा,** व ज्यांचीं रूपें **दा** व **धा** अशीं पृ० ९३ नि० १४ प्रमाणें होतात असे दुसरे धातु, तृतीय भूतांत **इ** 'जाणें' ह्याच्या जागीं होणारा **गा** धातु आणि **भू** धातु, हे सर्व धातु पहिल्या प्रकारांत मोडतात.

---

* अर्वाचीन संस्कृतांत भूतकाळाच्या तीन भेदांकडे लक्ष्य न देतां अविचारानें ह्या सर्वांचा संकर करितात.

३ **भू** धातूच्या तृ० पु० बहुवचनाचा प्रत्यय **अन्** आहे. स्वरादि प्रत्यया-पूर्वी **भू** धातूच्या पुढें **व्** लावितात.

४ **घ्रा, धे, शो, सो,** आणि **छो** हे धातु विकल्पानें पहिल्या प्रकाराप्रमाणें चालतात. ( पृ० ९३ नि० १४ ध्यानांत ठेवा ). ह्यांचीं दुसरीं रूपें सहाव्या प्रकाराप्रमाणें होतात. **धे** धातूचीं रूपें तिसऱ्या प्रकाराप्रमाणेंही होतात.

५ हा प्रकार केवळ परस्मैपदी आहे. ह्या प्रकारानें चालणारे धातु उभयपदी असल्यास त्यांचीं आत्मनेपदी रूपें चवथ्या अ० पांचव्या प्रकाराप्रमाणें होतात.

**दा** 'देणें.'

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अदाम् | अदाव | अदाम |
| द्वि० पु० | अदाः | अदातम् | अदात |
| तृ० पु० | अदात्* | अदाताम् | अदुः |

वरच्या पहिल्या नियमाप्रमाणें **उस्** प्रत्ययापूर्वी **आ**चा लोप झाला. **अद्+उस्=अदुः**. याचप्रमाणें **अस्थुः, अगुः** इ०.

## २ दुसरा प्रकार.

१ धातूपुढें अ लागून नंतर पहिल्या वर्गांतील धातूंच्या प्रथम भूताचे प्रत्यय लावावे.

प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अम् | व | म |
| द्वि० पु० | स् | तम् | त |
| तृ० पु० | त् | ताम् | अन् |

**अम्** व **अन्** हे प्रत्यय पुढें असतां धातुपुढें लावलेल्या **अ**चा लोप होतो आणि **व, म** हे पुढें असतां ह्या **अ** दीर्घ होतो. (प्र० पु० पृ० ५, व ६ टीप *पहा)

आ० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | इ | वहि | महि |
| द्वि० पु० | थास् | इथाम् | ध्वम् |
| तृ० पु० | त | इताम् | अन्त |

---

*पृ० ६५ नि० २ हा येथें आणि ह्या सारिख्या इतर स्थलीं लागू पडतो.

**अन्त** हा प्रत्यय पुढें असतां **अ** जातो आणि **वहि, महि** हे प्रत्यय पुढें असतां दीर्घ होतो.

२ धातूंच्या स्वरांस गुण अथवा वृद्धि होत नाहीं.

३ कांहीं थोडे धातु शिवाय करून हा प्रकार परस्मैपदी आहे.

४ कांहीं धातू ह्या प्रकाराप्रमाणें नित्य चालतात व कांहीं विकल्पानें चालतात; त्यांपैकीं अत्युपयुक्त धातु खालीं लिहिले आहेत.

( अ ) दुसऱ्या प्रकाराप्रमाणें नित्य चालणारे धातु.

**लिप्** चोपडणें.
**सिच्** शिंपडणें.
**ह्वे*** ( **ह्व्** ) बोलावणें.
ह्या तीन धातूचीं आ० प० रूपें ह्या प्रकाराप्रमाणें विकल्पानें होतात.
**अस्** ( **अस्थ्** ) फेंकणें.
**आप्** मिळविणें.
**क्रुध्** रागावणें.
**क्लम्** थकणें.
**क्षम्** च० ग० क्षमा करणें.
**ख्या** ( **ख्य्** ) उ० प० सांगणें.
**गम्** जाणें.
**गृध्** लोभ करणें, हांव करणें.
**घस्** खाणें.
**तम्** मनांत किंवा शरीरांत दुःखी होणें.
**तुष्** संतोष पावणें.
**तृष्** तान्हेला होणें.
**दम्** निग्रह करणें.
**दुष्** वाईट होणें.
**द्रुह्** पीडा करणें, दगा करणें.
**नश्** नाश पावणें.
**पत्** ( **पप्त्** ) पडणें.
**पिष्** पीठ करणें.
**पुष्** च० ग० पुष्ट करणें.
**भ्रम्** च० ग० भटकणें.
**मद्** वेडा होणें.
**मुच्** सोडणें, मुक्त करणें.
**मुह्** मोह पावणें.
**लुप्** कापणें.
**लुभ्** च० ग० लोभ करणें.
**वच्** ( **वोच्** ) उ० प० बोलणें.
**शक्** शकणें, समर्थ असणें.
**शद्** नाश पावणें, क्षीण होणें.
**शम्** शांत होणें.
**शास्** ( **शिष्** ) अधिकार चालविणें, राज्य करणें, व्यवस्थित करणें.
**शिष्** पृथक करणें, निराळें करणें.
**शुध्** शुद्ध होणें.
**श्रम्** श्रम करणें.
**श्लिष्** च० ग० चिकटणें.
**सद्** निराश होणें, बसणें.
**सिध्** च० ग० तयार होणें.
**सृप्** सरकणें, पोटानें चालणें.
**स्निह्** दुसऱ्यावर प्रीति करणें.
**स्विद्** च० ग० घाम येणें.
**हृष्** च० ग० आनंद पावणें.

* अ लागण्यापूर्वी धातूंचीं जीं रूपें होतात तीं कंसांत लिहिलीं आहेत. जसें— **आस्थ्+अम्=आस्थम्** ; **अह्व्+अम्=अह्वम्**.

( ब ) दुसऱ्या प्रकाराप्रमाणें विकल्पानें चालणारे धातु.

**क्षुद्** चूर्ण करणें.
**घुष्** जाहीर करणें.
**च्युत्** गळणें.
**छिद्** कापणें.
**जॄ ( जर् )** जीर्ण होणें.
**तृप्** तृप्त होणें.
**दृप्** अभिमान धरणें.
**दृश् ( दर्श् )** पाहणें.
**निज्** धुणें.
**बुध्** जाणणें.
**भिद्** आंत शिरणें, भेदणें.
**युज्** जोडणें.
**रिच्** रिकामा करणें.
**रुद्** रडणें.
**रुध्** रोध करणें, अटकाव करणें.
**विच्** वेगळा करणें.
**श्वि ( श्व् )** फुगणें, वाढणें.
**शुच्** च० ग० पवित्र होणें.
**स्कन्द् ( स्कद् )** वर उडी मारणें.
**स्तंभ्, ( स्तभ् )** अटकाव करणें.
**स्फुट्** प्र० ग० फुगणें, उकलणें.

खालीं लिहिलेले प्रथम गणांतील धातु आ० प० आहेत, परंतु जेव्हां ते ह्या प्रकारांत येतात तेव्हां प० प० होतात.

**कृप्** (**क्लृप्**) समर्थ असणें, ( एखाद्याकडे ) वळणें.
**क्षुभ्** क्षोभणें.
**द्युत्** प्रकाशणें.
**ध्वंस् ( ध्वस् )** नाश पावणें.
**भ्रंश् ( भ्रश् )** पडणें.
**रुच्** प्रकाशणें.
**वृत्** असणें.
**वृध्** वाढणें.
**शुभ्** शोभणें.
**स्यन्द ( स्यद् )** पाझरणें.
**स्रंस् ( स्रस् )** खालीं पडणें, गळणें.
**स्विद्** घाम येणें.

५ **श्वि** हा धातु दुसऱ्या, पांचव्या व तिसऱ्या प्रकाराप्रमाणें चालतो आणि बाकी राहिलेले **अनिट्** व **सेट्** धातु अनुक्रमें चौथ्या व पांचव्या प्रकाराप्रमाणें चालतात.

६ **श्लिष्** धातु, आलिंगणें ह्या अर्थी असतो तेव्हां, सातव्या प्रकाराप्रमाणें चालतो.

७ वर सांगितलेल्या धातूंशिवाय जे दोन यादींत लिहिलेले धातु आत्मनेपदी असतील ते त्या पदीं चवथ्या अ० पांचव्या प्रकाराप्रमाणें चालतात.

**पुष्.**

| | ए०व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अपुषम्** | **अपुषाव** | **अपुषाम** |
| द्वि० पु० | **अपुषः** | **अपुषतम्** | **अपुषत** |
| तृ० पु० | **अपुषत्** | **अपुषताम्** | **अपुषन्** |

वच् आत्मनेप०

| | | |
|---|---|---|
| प्र० पु० अवोचे | अवोचावहि | अवोचामहि |
| द्वि० पु० अवोचथाः | अवोचेथाम् | अवोचध्वम् |
| तृ० पु० अवोचत | अवोचेताम् | अवोचन्त |

## ३ तृतीय प्रकार.

१ दहाव्या गणांतील धातु व प्रयोजक धातु ह्यांचीं तृतीय भूताचीं रूपें ह्या प्रकाराप्रमाणें होतात.

२ (अ) **अय**चा लोप होतो, परंतु तो पुढें असतां मूलधातूच्या स्वरांत वगैरे जे फेरफार झालेले असतात ते तसेच राहतात.

(ब) उपांत्य स्वर ऱ्हस्व होतो.

(क) नंतर सामान्य नियमांप्रमाणें धातूंस द्वित्व होतें. *अभ्यासानंतरचें अक्षर ऱ्हस्व असून छंदःशास्त्राप्रमाणें † दीर्घ नसल्यास (ड) अभ्यासांतील **अ**च्या जागीं **इ** हा वर्ण होतो, (इ) आणि अभ्यासाचा स्वर ऱ्हस्व असून छंदः-शास्त्राप्रमाणें दीर्घ नसल्यास दीर्घ होतो. (फ) ह्या सिद्ध झालेल्या **अंगास** दुसऱ्या प्रकाराप्रमाणें **अ** लागून प्रथम भूताचे प्रत्यय लागतात.

जसें, **भू** धातूचा प्रयोजक **भावय**, **अय**चा लोप झाल्यानें **भाव्**, उपांत्य ऱ्हस्व केल्यानें **भव्**; द्वित्व झाल्यानें **बभव्**; अभ्यासांतील अची **इ** होऊन **बिभव्**; दीर्घ केल्यानें **बीभव्**; **अ** लावून नंतर **अ** आगम होऊन **त्** प्रत्यय लागून **अबीभवत्**. तसेंच **स्पन्द्** धातूचें प्रयोजकरूप **स्पन्दयति**, (अ) प्रमाणें **स्पन्द्**, (क) व पृ० ७१ नि० २ (ड) प्रमाणें **पस्पन्द्**, आणि (फ) नियमानें **अपस्पन्दत्**. (ब) नियमानें येथें कांहीं कार्य झालें नाहीं. कारण या धातूचा उपांत्य वर्ण स्वर नाहीं. (ड) व (इ) प्रमाणेंही फेरफार झाले नाहींत. कारण **स्प** हें **प** ह्या अभ्यासापुढील अक्षर संयुक्तव्यंजनघटित असल्यामुळें दीर्घ आहे. **स्खल्** धातूचें प्रयोजकरूप **स्खलयति**, (अ) प्रमाणें **स्खल्**, (क) आणि पृ० ७१ नि० २ (ड) व (ब) नियमांनीं **चस्खल्**, (ड) नियमास अनुसरून **चिस्खल्**, आणि (फ) प्रमाणें **अचिस्खलत्**. (ब) नियमाची येथें आवश्यकता नाहीं. तशीच (इ) नियमाचीही नाहीं; कारण **चि** ह्या अभ्या-सांतील **इ** छंदःशास्त्राच्या नियमाप्रमाणें दीर्घ आहे.

---

* पृष्ठ ७१ टीप * पहा.

† छंदःशास्त्रांत ऱ्हस्व स्वरापुढें संयुक्त व्यंजन आल्यास ऱ्हस्व स्वर दीर्घ समजतात.

३ ( अ ) धातु स्वरादि असल्यास पुढील व्यंजनास द्वित्व होऊन अभ्यासास **इ** जोडतात. ( ब ) धातूच्या आद्यस्वरापुढील संयोगाचा पहिला अवयव **न्**, **द्** अ० **र्** असल्यास दुसऱ्या अवयवास द्वित्व होतें.

जसें **अट्-आटय**-नि० २ ( अ ) प्रमाणें **आट्**, नि० २ ( ब ) प्रमाणें **अट्**, नि० ३ ( अ ) प्रमाणें **अटिट्** ; भूतकालाचा **आ** आगम झाल्यानें **आटिट्** ( प्र० पुस्त० पृ० ५७ पहा ); २ ( फ ) प्रमाणें **आटिटत्**. तसेंच **उन्द्-उन्दय-उन्द्**-३ ( ब ) प्रमाणें **उन्दिद्**, प्र० पुस्त० पृ० ५७ ह्यांतील नियमाप्रमाणें **औन्दिद्** आणि नंतर **औन्दिदत्**. ह्याचप्रमाणें **अर्हूचें आर्जिहत्**. शेवटील दोन ठिकाणीं **उन्** व **अर्** ह्यांस एकीकडे ठेवून **द्** व **ह्** ह्यांस द्वित्व करून मग **इ** हा वर्ण जोडला.

४ ( अ ) एखाद्या धातूच्या अंतीं ( ऱ्हस्व अ० दीर्घ ) **उ** असल्यास अभ्यासांतील **इ**च्या जागीं **उ** होतो, परंतु अभ्यासानंतरचें अक्षर **ओष्ठ्य** अ० **य्**, **र्**, **ल्**, **व्**, **ज्**, हीं असून ह्यापुढें **अ** असल्यास हा फेरफार होत नाहीं.

जसें **कु**चें प्रयोजक **कावय-काव्-कव्-चकव्** व **चिकव्** असें व्हावें, परंतु धातु उकारान्त आहे म्हणून **चुकव्-चूकव्-अचूकवत्** असें होतें. **भू** व **पू** ह्यांचीं रूपें **अबीभवत्** व **अपीपवत्** अशीं होतात. **अबूभवत्** व **अपूपवत्** अशीं होत नाहींत, कारण अभ्यासानंतरचें व्यंजन ओष्ठ्य आहे.

( ब ) **स्रु**, **श्रु**, **द्रु**, **प्रु**, **प्लु**, व **च्यु** ह्या धातूंतील अभ्यासांत विकल्पानें **इ** होते. जसें **अशिश्रवत्** अ० **अशुश्रवत्** ( **श्रु** धातूच्या प्रयोजकाचा तृ० भू० ).

५ खालीं लिहिलेल्या धातूंचा उपांत्य स्वर विकल्पानें ऱ्हस्व होतो. **भ्राज्**, **भाष्**, **भास्**, **दीप्**, **जीव्**, **मील्**, **पीड्**, आणखी **ह्वे**, **लुट्**, **लुप्**, इ. जसें **अपीपिडत्** अ० **अपिपीडत्**.

**पीडय-पीड्-पिपीड्-अपिपीडत्**. २ ( इ ) प्रमाणें येथें कार्य झालें नाहीं. जेव्हां उपांत्य ऱ्हस्व होतो, त्यावेळेस **पीड्-पिड्-पिपिड्-पीपिड्-अपीपिडत्**.

६ कलम २ ह्यांत सांगितलेले स्वराचे फेरफार म्हणजे ( ब ) प्रमाणें उपांत्य ऱ्हस्व करणें, ( ड ) प्रमाणें अच्या जागीं **इ** करणें, ( इ ) प्रमाणें अभ्यासाच्या स्वरास दीर्घ करणें हीं कार्यें खालीं लिहिलेल्या धातूंस होत नाहींत.

**कथ्**, **वर्**, **शट्**, **रह्**, **स्पृह्**, **सूच्**, **मृग्**, **ध्वन्**, **पार्**; जसें **कथ-अचकथत्**, **वर्-अववरत्**.

७ **स्मृ, दृ, त्वर्, प्रथ्, म्रद्, स्तॄ, स्पश्**, ह्या धातूंच्या अभ्यासांतील अ कायम राहतो. **वेष्ट्** व **चेष्ट्** ह्यांतील इच्या स्थानीं अ विकल्पानें होतो. जसें **अससमरत्, अददरत्** इ०; आणि **अववेष्टत्** अ० **अविवेष्टत्.**

८ **गण्** धातूचीं दोन रूपें होतात. **अजगणत्** अ० **अजीगणत्.**

९ **श्रि, द्रु, स्रु**, ह्यांचीं मूळरूपें तिसऱ्या प्रकाराप्रमाणें होतात. **श्वि** धातूचीं रूपें विकल्पानें ह्या प्रकाराप्रमाणें होतात. **धे** धातूस द्वित्व झाल्यानंतर त्याच्या आचा लोप होतो. ( पृ० १८२ नि० ४ पहा ).

येथें फक्त द्वित्व करण्याचीच आवश्यकता आहे. **श्रि-शिश्रि+अत्** पृ० ४० नि० (२) प्रमाणें **अशिश्रियत्**, कारण अ हा **अपित्** प्रत्यय आहे; **धे-अदधत्.**

१० **स्थापयति**चें **अतिष्ठिपत्**, **पाययति**चें **अपीप्यत्** आणि **घ्रापयति**चें **अजिघ्रपत्** अथवा **अजिघ्रिपत्.**

११ धातूचा उपांत्य ऱ्हस्व **ऋ** विकल्पानें कायम राहतो व दीर्घ विकल्पानें ऱ्हस्व होतो. जसें, **वृत्** धातूचें प्रयोजक **वर्तय, अय** गेल्यानें **वर्त्** अ० ह्या नियमानें **वृत्** असें झालें; **वर्त्-ववर्त्-अववर्तत्.** २ ( ड ) व ( इ ) ह्या नियमांनीं येथें कांहीं कार्य झालें नाहीं. **वृत्-विवृत्** २ ( ड ) प्रमाणें-**वीवृत्** २ ( इ ) प्रमाणें-**अवीवृतत्** असें झालें. **कॄत्** धातूचें प्रयोजक रूप **कीर्तय** ह्यांतील **अय** गेल्यानें **कीर्त्** आणि ह्या नियमानें **अचिकीर्तत्** अ० **अचीकृतत्.**

१२ ज्या धातूंचा दीर्घ उपांत्य स्वर ऱ्हस्व होत नाहीं अशा धातूंपैकीं कांहीं विशेष उपयोगी धातु खालीं लिहिले आहेत. **लोक्, लोच्, शास्, श्लाघ्, बाध्, सेव्, वेप्, एज्, लाघ्, राध्, ताय्, दाश्, याच्** व **राज्.** जसें, **अलुलोकत्** व **अततायत्.**

१३ प्रयोजक तृ० भूतांत **ह्वे** धातूचें **हु** आणि **स्वप्**चें **सुप्** व **श्वि**चें विकल्पानें **शु** अशीं मूलरूपें आहेत असें समजावें. जसें, **अजूहवत्** अ० **अजुहावत्** ( नि० ५ पहा ), **असूषुपत्, अशूशवत्** अ० **अशिश्वयत्.**

१४ हा तिसरा प्रकार उभयपदी आहे.

**हृ** ( नेणें ) प्रयोजक प० प०

| | ए० व० | द्वि० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अजीहरम्** | **अजीहराव** | **अजीहराम** |
| द्वि० पु० | **अजीहरः** | **अजीहरतम्** | **अजीहरत** |
| तृ० पु० | **अजीहरत्** | **अजीहरताम्** | **अजीहरन्** |

आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अजीहरे | अजीहरावहि | अजीहरामहि |
| द्वि० पु० | अजीहरथाः | अजीहरेथाम् | अजीहरध्वम् |
| तृ० पु० | अजीहरत | अजीहरेताम् | अजीहरन्त |

---

काशीं गन्तुकामः श्रीनगरान्निरगात्पण्डितः सह परिवारेण ।

भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः ।

तस्मिन्गुर्वनुचरे गृहं प्रविष्टे यूयं किमधुनोदस्थात । गुरुरय-मिति मत्वा ।

अस्मिन्निर्जने वने नष्टमश्वमियन्तं कालमन्विष्यन्नपि न समा-सदम् ।

इदमाम्रफलं वृक्षादपप्तत् । यदि रोचते गृहीत्वा स्वादस्व ।

हे गङ्गे यदीदृशेभ्यः पापेभ्यो मामुददीधरस्ततः सत्यमनाथ-शरणमसि विष्णुपदपङ्कजोद्भवासि ।

प्रातरारभ्य पञ्चसप्ततिं वृक्षानसिचाम ।

वत्सस्य मरणेन तद्विषयकाः सर्वे मनोरथा मेऽध्वसन् ।

क्रीडार्थमुपवनमगमतां दंपती तयोर्निवृत्तयोरात्मनः करुणवार्तां कथय ।

इयं बालिका दुःखवार्तां श्रुत्वामुहत् । आश्वासयैनामुदकेन च सिञ्च ।

इमं ग्राममागच्छन्तौ भवन्निर्दिष्टे गहने वने नानापक्षिगणसमा-कुलं महावटवृक्षं तमदर्शाव ।

उपाध्यायो देवानपूपुजदधुनातिथयो यथेष्टं भुञ्जताम् ।

अस्मिन्मण्डपे समाहूतान्ब्राह्मणानहमजगणम् । पञ्च शतानि तेषां वर्तन्ते । एतेभ्योऽधुना दक्षिणां दातुमारभस्व ।

मच्चिन्तिता सरणिर्वरीयसेऽधिकारिणे नारुचदतः स तां निरा-स्थन्नवीनां च स्वयं कल्पितां प्रावीवृतत् ।

किं यूयमवोचत । पुनरपि कथयत नाहमवहितोऽभूवम् ।

प्रातिष्ठिपत्स बोधार्थं कुम्भकर्णस्य राक्षसान् ॥

राघवस्यामुषः कान्तामार्तैरुक्तो न चार्पिपः ॥

मुष्टिनाददरत्तस्य मूर्धानं मारुतात्मजः ॥

मुक्त्वा विःश्रीकमप्यब्जं मराली न गतान्यतः ।

भ्रमराली त्वगाद्वेगादिदं सदसदन्तरम् ॥

---

१ आम्ही सोमरस प्यालों ( **पा** ) आणि अमर झालों ( **भू** ).

२ देवदत्त हें सोनें तोलिता झाला ( **तुल्** ), त्याचे दागिने करा.

३ कलिंगाचा राजा पाटलिपुत्र वेढिता झाला ( **रुध्** ) परंतु त्याचे बहुतेक सैनिक आपल्या रांगेंतून बाहेर पडले आहेत ( **भ्रंश्** ), आणि लूट शोधित आहेत.

४ अष्टावक्र बारा कोसांवरून आल्यामुळें थकला आहे ( **श्रम्** ), त्यास अन्न व पाणी द्या.

५ पिशाचांच्या अस्तित्वाविषयीं माझा विश्वास निराधार आहे, अशी तो माझी खात्री करूं शकला नाहीं ( **शक्** ).

६ प्रधानानें त्या देशाचें राज्य नीतीनें चालविलें आहे ( **शास्** ) आणि सर्व लोक त्यावर प्रीति करतात.

७ गोविंदा आपलें हरवलेलें पुस्तक सर्व दिवसभर शोधिता झाला, परंतु तें त्यास सांपडलें नाहीं ( **अधि+गम्** , **सम्+आ+सद्** ).

८ यज्ञस्तंभ करण्याकरितां आम्ही पळसाची खांदी कापिते झालों ( **छिद्** ).

९ अद्यापि तुम्हीं आपले हात धुतले नाहींत ( **क्षल्** ) काय ?

१० मी आपल्या मुलांस उष्णोदकानें स्नान घालिता झालों ( **स्ना** प्रयोजक ).

११ मीं सांगितलें ( **वच्** ) त्याप्रमाणें तूं अद्यापि पाणी न तापविता झालास ( **तप्** प्रयोजक ) काय ?

१२ त्या घराचा धनी मेला म्हणून ते तें घर पाडविते झाले ( **उद्+सद्** प्रयोजक अ० **नश्** प्रयोजक ) आणि त्याचीं वस्त्रें जाळविते झाले ( **दह्** प्रयोजक ).

---

# शब्दकोश २२.

**अनाथ** वि० आश्रयहीन, दुबळा.
**अनुचर** पु० चाकर.
**अब्ज** न० कमल.
**अवहित** ( **अव+धा** धातूचें भू० धा० वि० ) सावध, लक्ष्य दिलेला.
**अष्टावक्र** पु० एका मनुष्याचें नांव.
**अस्** च० ग० उप० **निर्**, रद्द करणें, बंद करणें.
**आप्त** पु० मित्र, बरें इच्छिणारा.
**आली** स्त्री० ओळ, पंक्ति.
**इ** उप० **निर्**, निघणें.
**करुण** वि० शोककारक, दुःखकारक.
**कल्पित** ( **क्लृप्** धातूचें प्रयोजक भू० धा० क० ) कल्पिलेलें, शोधून काढिलेलें.
**कुम्भकर्ण** पु० रावणाच्या एका भावाचें नांव.
**गन्तुकाम** वि० जाण्यास इच्छिणारा.

**गार्हपत्य** पु० अग्निहोत्र्यानें सतत ठेविलेला एक पवित्र अग्नि; गृहकृत्यें.

**तद्विषयक** वि० त्याविषयींचें.

**ताय्** प्र० ग० आ० प० पसरणें.

**दीप्** च० ग० आ० प० प्रकाशणें.

**धृ** उप० **उद्**, बाहेर काढणें, उद्धार करणें.

**धे** प्र० ग० प० प० स्तनपान करणें, पिणें.

**ध्वन्** प्र० ग० प० प० शब्द करणें.

**नवीन** वि० नवा.

**परिवार** पु० लवाजिमा.

**पलाश** पु० पळस.

**पुरंधि** पु० एका देवतेचें नांव.

**बोध** पु० जागें करणें.

**भग** पु० एका देवतेचें नांव.

**भ्रंश्** प्र० ग० आ० प० व च० ग० प० प० पडणें.

**मण्डप** पु० मांडव.

**मनोरथ** पु० इच्छा.

**मराली** स्त्री० राजहंसीण.

**मारुतात्मज** पु० वायुपुत्र, मारुति.

**मुष्टि** पु० व स्त्री० मूठ.

**मृग्** द० ग० आ० प० शोधणें.

**रह्** द० ग० सोडून देणें.

**वटवृक्ष** पु० वडाचें झाड.

**वर्** द० ग० पसंत करणें.

**वृत्** उप० **प्र** ( प्रयोजक ), प्रवृत्त करणें, उपयोगांत आणणें.

**शठ्** द० ग० ठकविणें.

**श्री** स्त्री० सौन्दर्य.

**सद्** उप० **सम्** आणि **आ**, मिळविणें, भेटणें.

**समाकुल** वि० पूर्ण, व्यापलेलें.

**सरणि-णी** स्त्री० पद्धति; वस्तुव्यवस्था, व्यवस्था, मार्ग.

**सवितृ** पु० सूर्य.

**सूच्** द० ग० सुचविणें.

**स्वामिन्** वि० धनी, मालक.

---

अद्यापि **अद्यापि** अ०.

अनाधार **निर्मूल** वि०.

अमर **अमर** वि० मरणहीन, **अमृत** वि०.

अस्तित्व **अस्तित्व** न०, **भाव** पु०.

खातरी करूं **प्रतीतिं कर्तुम्** .

त्यावर प्रीति करितात **तस्मिन्स्निह्यन्ति**.

नीतीनें **धर्मेण, न्यायेन**.

पिशाच **प्रेत** पु०, **वेताल** पु०, **पिशाच** पु०.

रांग **व्यूह** पु० सेनेची रचना.

लूट **लोप्त्र** न०, **लुण्ठन** न०.

विश्वास **श्रद्धा** स्त्री०, **विश्वास** पु०.

# त्रयोविंशतितमः पाठः।

## १ सहावा प्रकार

१ धातूंचीं तृतीय भूताच्या सहाव्या प्रकारचीं रूपें करणें असल्यास **अस्** धातूचीं ह्याच कालाच्या तिसऱ्या प्रकाराचीं रूपें करून अचा लोप करावा. नंतर ह्या रूपांत थोडासा फेरफार करून जीं रूपें होतील तीं धातूंस जोडावीं. तींच प्रत्यय आहेत असें समजावें. ते प्रत्यय येणेंप्रमाणेः—

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **सिषम्** | **सिष्व** | **सिष्म** |
| द्वि०पु० | **सीः** | **सिष्टम्** | **सिष्ट** |
| तृ० पु० | **सीत्** | **सिष्टाम्** | **सिषुः** |

हे प्रत्यय ध्यानांत ठेवण्याकरितां शिकणारानें असें समजावें कीं, **अस्** धातूच्या प्र० भूताच्या रूपांतून **आ** जाऊन त्याच्या जागीं **सि** हें अक्षर येतें आणि **सि** पुढच्या **स्** चा **ष्** होतो; तृतीय पुरुषाच्या बहुवचनीं **सन्** च्या स्थानीं **सुस्** होतो. द्वितीय व तृतीय पुरुषाच्या एकवचनांत **सि** लावायाचा नाहीं.

२ **यम्** , **रम्** , **नम्** , व* आकारान्त धातु ह्या प्रकारांत येतात. ह्या प्रकार केवळ परस्मैपदी आहे.

## २ सातवा प्रकार.

१ तृ० भूताच्या दुसऱ्या प्रकारास अनुसरून जीं **अस्** ‘ असणें ’ ह्या धातूचीं रूपें होतात, त्यांतून अ काढून जीं बाकी राहतील तींच रूपें ह्या प्रकाराचे प्रत्यय आहेत. दुसरी रीति अशी आहे कीं **स्** पुढें अ लावून नंतर प्र० भूताचे प्रत्यय खालीं दाखविल्याप्रमाणें थोडा बदल करून जोडावे. अशा प्रकारें तयार केलेलीं रूपें प्रत्यय समजून धातूस जोडावीं.

प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **सम्** | **साव** | **साम** |
| द्वि०पु० | **सः** | **सतम्** | **सत** |
| तृ० पु० | **सत्** | **सताम्** | **सन्** |

---

* ए, ऐ, ओ एतदंत धातु आकारान्त समजावे. पृ० ९३ नियम १४ पहा.

आ० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | सि | सावहि | सामहि |
| द्वि० पु० | सथाः | साथाम् | सध्वम् |
| तृ० पु० | सत | साताम् | सन्त |

२ हा प्रकार उभयपदी आहे.

३ **श्**, **ष्**, **स्**, व **ह्** एतदंत असून **इ**, उ, **ऋ** अ० **ऌ** एतदुपांत्य जे **अनिट्** * धातु ते ह्या प्रकारांत मोडतात.

४ **दृश्** धातूस वरचा नियम लागू नाहीं.

५ **स्पृश्**, **मृश्**, व **कृष्**, ह्या धातूंचीं रूपें विकल्पानें ह्या प्रकाराप्रमाणें होतात.

६ आत्मनेपदी **दुह्**, **दिह्**, **लिह्**, आणि **गुह्** ह्या धातूंचें तृतीय पुरुषाचें एकवचन, द्वितीय पुरुषाचें एकवचन व बहुवचन आणि प्रथम पुरुषाचें द्विवचन हीं विकल्पें ( प्रत्ययांपैकीं ) **स** अ० **सा** ह्याचा लोप करून उर्वरित भाग धातूंस जोडून होतात.

ग्लै प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अग्लासिषम् | अग्लासिष्व | अग्लासिष्म |
| द्वि० पु० | अग्लासीः | अग्लासिष्टम् | अग्लासिष्ट |
| तृ० पु० | अग्लासीत् | अग्लासिष्टाम् | अग्लासिषुः |

लिह् प० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अलिक्षम् | अलिक्षाव | अलिक्षाम |
| द्वि० पु० | अलिक्षः | अलिक्षतम् | अलिक्षत |
| तृ० पु० | अलिक्षत् | अलिक्षताम् | अलिक्षन् |

आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | अलिक्षि | अलिक्षावहि-अलिह्वहि | अलिक्षामहि |
| द्वि० पु० | अलिक्षथाः–अलीढाः | अलिक्षाथाम् | अलिक्षध्वम्-अलीढ्वम् |
| तृ० पु० | अलिक्षत–अलीढ | अलिक्षाताम् | अलिक्षन्त |

---

* पृ० ८८ टीप † पहा–त्याप्रमाणेंच जे धातु विकल्पें सेट् असून जेव्हां **इ** घेत नाहींत तेव्हां.

अ+लिह्+सत्-लिह्+लिढ् (पृ० ५५ नि० १ पहा), पृ० ५६ नि० ४ प्रमाणें लिक्-प्र० पुस्तकांतील पृ० ८८ टीप † प्रमाणें लिक्+षत् चें अलिक्षत्. अ+दिह्+सत्-पृ० ५६ नि० ५ प्रमाणें दिह् चें दिघ्-पृ० ५७ नि० ७ प्रमाणें धिघ्-प्र० पुस्तक पृ० ५ टीप * प्रमाणें धिक्, वर सांगितल्या-प्रमाणें धिक्+षत्=अधिक्षत्. अ+दिश्+सत्-पृ० ५८ नि० ९ प्रमाणें दिश्चें दिष्-पृ० ५६ नि० ४ प्रमाणें दिक्, वर सांगितल्याप्रमाणें दिक्+षत्=अदिक्षत्. अ+कृष्+सत्-कृष्-कृक् इ० वर सांगितल्याप्रमाणें अकृक्षत्. अ+लिह्+सत-लिह्-लिढ् इ० वर सांगितल्याप्रमाणें अलिक्षत; आणखी लिह्+त-पृ० ५५ नि० १ प्रमाणें लिढ्+त-पृ० ५५ नि० २ प्रमाणें लिढ्+ध-प्र० पु० पृ० २१ टीप * प्रमाणें लिढ्+ढ-पृ० ५५ नि० ३ प्रमाणें व अ ह्या वर्ण मागें लावून अलीढ.

---

नित्यकर्मानुष्ठानायास्नासीस्तच्छूद्रादीन्मा स्पृक्षः ।

वेणुधमन्याग्निमध्मासिषम् । तदस्मिन्प्रदीप्ते वह्नावाहुतीः प्रास्य ।

भोः पुरोहित भवदाज्ञामनुसृत्य बटवेऽहं सावित्रीमुपादिक्षम् । तदधुनान्यत्करणीयं दर्शय ।

विवाहविधेरितिकर्तव्यतामत्रत्या ब्राह्मणा नाज्ञासिषुरतो मां तत्संपादनायाह्वन् ।

अस्तमयासीद्रविस्तिमिरेणावृतं नभः । तत्किमद्यापि गां नाधुक्षत पयः ।

कृषीवला भूमिमकृक्षन्परंत्वार्द्रासु स्थितेऽपि सूर्ये पर्जन्यो न वर्षति ।

मा वयं भ्रातरः परस्परं द्विक्षामेत्यस्माकं पितासन्नमरणो रिक्थस्य समानांश्चतुरो भागानकरोत् ।

महाकार्यारम्भे देवो गुरुजनश्च वन्दितव्य इति वचनमनुरुध्य गृहदेवतां मातरं पितरमन्यांश्च वृद्धान्प्राणंसिष्म ।

कूपतडागादिनिर्माणाय महान्तो यत्ना युष्माभिः कृतास्ते कस्मिन्पर्यवासासिषुः ।

इदं मधु किं नालिक्षः । रुचिकरमेतत् ।

---

१ तो आपल्या मुलास आलिंगन देता झाला ( श्लिष् ) आणि उकसाबुक्शी रडता झाला ( रुद् ).

२ आम्ही आपल्या घोड्यांवर स्वार झालों आहों ( आ+रुह् ) आणि आतां शत्रूवर जात आहों.

३ काल आणलेलीं फुलें आतां कोमेजलीं आहेत ( म्लै ); तीं बाहेर टाकून द्या आणि दुसरीं नवीं आणा.

४ चंद्रकेतु व लव परस्परांशीं कसे लढले आणि राम त्यांस शांत होण्यास कसा सांगता झाला * हें आम्हांस सांगून तो थांबला ( वि+रम् ).

५ धर्मशास्त्राचा किंवा वैद्यशास्त्राचा अभ्यास केल्यानें फायदा होईल ह्याविषयीं मी अद्यापि विचार केला नाहीं ( वि+मृश् ).

६. तुम्ही त्या फुलाचा वास घेतला ( घ्रा )? तें फार सुवासिक आहे.

७ राजा सिंहासनावर बसला आहे ( उप+विश् ) आणि आपल्या प्रधानाबरोबर मसलत करीत आहे.

८ ह्या वेळपर्यंत आम्ही तुम्हांस संकटापासून रक्षिते झालों ( पा ), आणि आतां तुम्ही आम्हांशीं द्रोह करितां; ह्याहून अधिक खेदकारक दुसरें काय आहे ?

९ तुम्हांस अप्रिय असें काम कधींही जी न करिती झाली अशा स्त्रीस तुम्ही कां त्यागितां झालां ( हा )?

---

# शब्दकोश २३.

**अनुष्ठान** न० करणें.

**अस्त** पु० मावळणें.

**आर्द्रा** स्त्री० सहावें नक्षत्र.

**आवृत** ( **आ+वृ** धातूचें भू० धा० क० ) भरलेला, आच्छादिलेला.

**आसन्नमरण** वि० ( **आसन्न** वि० जवळ आलेलें, **मरण** न० मृत्यु ) ज्याचा मृत्यु जवळ आला आहे असा.

**आहुति** स्त्री० यज्ञसंबंधी बळी.

**इतिकर्तव्यता** स्त्री० एखादें कार्य करण्याची रीत.

**करणीय** वि० ( विध्यर्थी ) कर्तव्य, करावयाचें कृत्य.

**गृहदेवता** स्त्री० कुलदेवता.

**तिमिर** न० काळोख.

**धमनी** स्त्री० फुंकणी.

**नित्यकर्मन्** न० धर्मसंबंधी नित्य कृत्य.

**पर्जन्य** पु० पाऊस.

**प्रदीप्त** भू० धा० ( **प्र+दीप्** प्रकाशणें ह्या धातूचें ) चांगला पेटलेला.

---

* प्रशाम्यतमित्यादिशत्.

**भाग** पु० वांटा, हिस्सा.

**रिक्थ** न० संपत्ति, द्रव्य.

**रुचिकर** वि० स्वादिष्ट.

**वन्दितव्य** ( विध्यर्थी धातुसाधित **वन्द्** धातूचें ) वंदन करण्यास योग्य.

**वृष्** प्र० ग० प० प० वर्षणें, वृष्टि होणें.

**वेणु** पु० बांबू, कळक.

**संपादन** न० मिळविणें.

**समान** वि० सारखा.

**सावित्री** स्त्री० ऋग्वेदांतील एक पवित्र मन्त्र किंवा ऋचा. हिला **गायत्री** म्हणण्याचा परिपाठ आहे. सर्व ब्राह्मण प्रतिदिवशीं हिचा जप करितात.

**सो** च० ग० प० प० शेवट करणें; **परि+अव+सो** शेवट होणें, परिणाम होणें.

---

अधिक खेदकारक **दुःखतरम्** न०.

उकसाबुक्शी **प्रमुक्तकण्ठम्** क्रि० वि०.

चंद्रकेतु **चन्द्रकेतु** पु० ( लक्ष्मणाचा पुत्र ).

द्रोह करणें **द्रुह्** च० ग० प० प०.

धर्मशास्त्र **धर्मशास्त्र** न०.

वैद्यशास्त्र **वैद्यक** न०, **आयुर्वेद** पु०.

संकट **पीडा** स्त्री०, **अनर्थ** पु०, **संकट** न०.

समोर जाणें **अभि+गम्**.

सुवासिक **सुरभि** वि०.

---

# चतुर्विंशतितमः पाठः ।

## भाग पहिला.

### चवथा व पांचवा प्रकार.

१ तृतीय भूताचे व्यापक प्रकार ( म्ह० ज्यांत पुष्कळ धातूंचा संग्रह होतो असे ) चवथा व पांचवा हे होत. जे धातु पूर्वोक्त प्रकारांत येत नाहींत ते सर्व त्यांपैकीं कोणत्या तरी एका प्रकारांत येतात. त्याचप्रमाणें ज्या धातूचा पूर्वोक्त प्रकारांत विकल्पानें समावेश होतो, अथवा जो धातु मागें सांगितलेल्या प्रकारांत फक्त परस्मैपदीच चालतो त्याचीं दुसरीं अथवा आत्मनेपदी रूपें चवथ्या किंवा पांचव्या प्रकाराप्रमाणें होतात.

२ (अ) चवथ्या व पांचव्या प्रकारांत भेद इतकाच कीं, पांचव्या प्रकाराच्या प्रत्ययांपूर्वी इ आगम होतो आणि चवथ्या प्रकाराच्या प्रत्ययांपूर्वी होत नाहीं; म्हणजे पांचव्यांत सेट् व चवथ्यांत अनिट् धातु येतात. (ब) स्तु व सु हे अनिट् आहेत, तरी हे परस्मैपदी असतां पांचव्या प्रकारांत येतात. (क) वृ धातु, संयोगपूर्वक ऋकारान्त धातु व (दीर्घ) ॠकारान्त धातु हे जेव्हां आ० प० असतात तेव्हां, आणि (ड) जे धातु विकल्पानें सेट् आहेत ते सर्व चवथ्या व पांचव्या प्रकारांत मोडतात. (इ) धू जेव्हां प० प० चालतो व अञ्ज् हे धातु फक्त पांचव्या प्रकारांस मोडतात.

३ स्नु व क्रम् हे धातु जेव्हां आत्मनेपदी असतात तेव्हां त्यांस इ आगम होत नाहीं.

४ (अ) अस् 'असणें' धातूच्या प्रथम भूताच्या रूपांतील आद्य आचा लोप करून बाकी जीं रूपें राहतील तींच प्रत्यय समजून धातूस जोडावीं. (ब) तृ० पु० बहुवचनीं सन् च्या जागीं सुः होतो. (क) पांचव्या प्रकारांत ह्या प्रत्ययांपूर्वी जेव्हां इ आगम होतो तेव्हां द्वि० पु० व तृ० पुरुषाच्या एकवचनीं स् चा लोप होतो. (ड) ध्वे चा ढ्वे होतो ह्याविषयीं पृ० ८९ नि० ४ मध्यें जें सांगितलें आहे, तेंच ह्या काळामध्यें ध्वम् विषयीं जाणावें. शिवाय र् सुद्धां पूर्वी आला असतां ध्वम् चा ढ्वम् होतो.

(१) अंतःस्थ व अनुनासिक वर्ण शिवाय करून कोणतेंही व्यंजन स् च्या मागें व पुढें आलें असतां त्या स् चा लोप होतो. जसें, अभिद्+स्त=अभित्त, अभैद्+स्ताम्=अभैत्ताम्.

प्रत्यय प० प०

| | चवथा प्रकार. | | | पांचवा प्रकार. | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए० व० | द्विव० | ब० व० | ए० व० | द्विव० | ब० व० |
| प्र० पु० | सम् | स्व | स्म | इषम् | इष्व | इष्म |
| द्वि० पु | सीः | स्तम् | स्त | ईः | इष्टम् | इष्ट |
| तृ० पु० | सीत् | स्ताम् | सुः | ईत् | इष्टाम् | इषुः |

आ० प०

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र० पु० | सि | स्वहि | स्महि | इषि | इष्वहि | इष्महि |
| द्वि० पु० | स्थाः | साथाम् | ध्वम् | इष्ठाः | इषाथाम् | इध्वम् |
| तृ० पु० | स्त | साताम् | सत | इष्ट | इषाताम् | इषत |

## परस्मैपद.

## चवथा प्रकार.

५ चवथ्या प्रकारांत परस्मैपदी धातूंच्या स्वरास वृद्धि होते, जसें—**भिद्-अभैत्सीत्.**

## पांचवा प्रकार.

६ पांचव्या प्रकारांत परस्मैपदी धातूंचे (अ) अंत्य **इ, उ, ऋ** व **लृ,** (ऱ्हस्व अ० दीर्घ) ह्यांस व (ब) अंतीं **र्** अ० **ल्** असल्यास उपांत्य अकारास आणि (क) **वद्** व **व्रज्** ह्या धातूंच्या उपांत्य अकारास अवश्य वृद्धि होते. जसें, **लू-अलौ+इषम=अलाविषम, चर्-अचारिषम, फल्-अफालिषम्.**

७ धातूंच्या आरंभीं व्यंजन असून अंतीं **र्** अथवा **ल्** खेरीज करून कोणतेंही व्यंजन असेल व उपांत्य अ छंदःशास्त्रांतील नियमाप्रमाणें दीर्घ नसेल तर त्यास विकल्पानें वृद्धि होते. जसें, **गद्-अगदीत्** अ० **अगादीत्.**

८ **अपवाद.—ह्, म्, य्,** एतदंत धातूंस आणि **क्षण्, श्वस्, जागृ, कद्, लग्, हस्, श्वि** ह्या धातूंस व दुसऱ्या कांहीं धातूंस वृद्धि होत नाहीं. जसें-**क्रम्-अक्रमीत्.**

९ धातूंचे उपांत्य **इ, उ, ऋ, लृ,** (ऱ्हस्व), व **जागृ** आणि **श्वि** यांचे अंत्य स्वर ह्यांस पांचव्या प्रकारांत गुण होतो. जसें **सिध्-असेधीत्, शुच्-अशोचीत्, कृत्-अकर्तीत्.**

## आत्मनेपद.

## चवथा प्रकार.

१० आत्मनेपदी चवथ्या प्रकारांत (अ) अंत्य **इ** अ० **उ** (ऱ्हस्व अ० दीर्घ) ह्यास गुण होतो. (ब) अंत्य ऋस आणि उपांत्य ऱ्हस्व स्वरास कांहीं विकार होत नाहीं. जसें, **नी-अनेष्ट, सु-असोष्ट, भू-अभूषत** (तृ० पु० ब० व०), **भिद्-अभित्त.** पृष्ठ २ नि० ९ प्रमाणें दीर्घ ॠस विकार होतात, **स्तॄ-अस्तीर्ष्ट, वॄ-अवूर्ष्ट.**

११ ऱ्हस्व स्वरापुढील **स्त** व **स्थाः** ह्यांतील **स्** चा लोप होतो. जसें, **हृ-अहृत.**

१२ आत्मनेपदी **दा, धा*** आणि ज्यांचीं रूपें आर्धधातुक प्रकारांत **दा** व **धा** अशीं होतात ते व **स्था** ह्या धातूंच्या अंत्य **आ**च्या जागीं **इ** होते, परंतु ह्या इकारास गुण होत नाहीं. जसें **अदित, अदिषाताम्.**

## पांचवा प्रकार.

१३ पांचव्या प्रकारांत धातूंच्या अंत्य स्वरास व उपांत्य ऱ्हस्व स्वरास गुण होतो. जसें, **लू—अलविष्ट, मुद्—अमोदिष्ट.**

१४ तृतीय भूताच्या आत्मनेपदी चवथ्या प्रकारांत **हन्** धातूच्या **न्** चा लोप होतो; व **गम्**, आणि विवाह करणें या अर्थी **यम्** ह्यांच्या **म्** चा लोप विकल्पानें होतो. परस्मैपदी **हन्** धातूच्या जागीं ह्या कालांत **वध्** असें रूप नित्य येतें आणि आत्मनेपदांत तें विकल्पानें येतें. **वध्** ह्याच्या उपांत्य अकारास वृद्धि होत नाहीं.

**आ+हन्** आ० प०—**आ+अ+हन्+स्त—ह+स्त**—ह्या पाठाच्या अकराव्या नियमानें **ह+त—अहत—आहत**; द्विव० **आहसाताम्**; ब० व० **आहसत.** दुसरें रूप **आवधिष्ट** इ०.

**उप+यम्** आ० प०—**उपायत, उपायसाताम्** इ०. अथवा **उपायंस्त, उपायंसाताम्** इ०. **सम्+गम्** आ० प०—**समगत** अ० **समगंस्त** इ०.

१५ **पद्** धातूच्या तृ० भूताच्या तृ० पुरुषाचें ए० व० **अपादि** असें होतें; ह्म० **स्त** प्रत्ययाच्या जागीं **इ** होते. **दीप्, जन्, बुध्, पूर्, ताय्, प्याय्,** ह्यांपुढील **स्त** ( अ० **इष्ट** ) च्या स्थानीं विकल्पानें इकार होतो.

१६ (अ) इतर **आर्धधातुक** प्रकारांतील कर्मणिरूपें जशीं अंगास आ० प० प्रत्यय लावून होतात, तशींच तृतीय भूताचीं कर्मणिरूपें होतात. (ब) प्रथम, द्वितीय, तृतीय आणि षष्ठ ह्या प्रकारांचीं रूपें कर्तरि आहेत म्हणून त्या प्रकारांतील धातूंचीं कर्मणिरूपें करणें असल्यास ते आ० प० चवथ्या, पांचव्या अ० सातव्या प्रकारांत मोडतात. (क) कर्मणि तृ० भूतांत सर्व धातूंच्या तृ० पु० ए० वचनीं **स्त** ( अ० **इष्ट** ) अ० **सत** प्रत्ययाच्या जागीं **इ** येते.

---

* जेव्हां जेव्हां असें लिहिण्यांत येतें तेव्हां **दा** द्वि० ग० 'कापणें' आणि **दै** प्र० ग० ' पवित्र करणें,' हे दोन धातु वर्ज्य करावे.

१७ ह्या इ पूर्वी अंत्य स्वरास व उपांत्य अकारास वृद्धि आणि इतर उपांत्य ऱ्हस्व स्वरास गुण होतो. **आ+चम्, कम्** व **वम्** हे धातु खेरीज करून सर्व **मान्त सेट्** धातूंच्या उपान्त्य अकारास व **जन्** ह्यांतील अकारास वृद्धि होत नाहीं.

१८ हा **इ** पुढें असतां धातुसंबंधी अंत्य आकारापुढें **य्** हा वर्ण येतो.

१९ **हन्** धातूच्या स्वरास जेव्हां वृद्धि होते तेव्हां **ह्** चा **घ्** होतो. (पृ० १७६ नि० ७ पहा.)

२० ह्या काळांत पृ० ११६ नि० ३ हाही लागू पडतो.

**भृ.**

| | प० प० | | | आ० प० | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए० व० | द्विव० | ब० व० | ए० व० | द्विव० | ब० व० |
| प्र० पु० | **अभार्षम्** | **अभार्ष्व** | **अभार्ष्म** | **अभृषि** | **अभृष्वहि** | **अभृष्महि** |
| द्वि० पु० | **अभार्षीः** | **अभार्ष्टम्** | **अभार्ष्ट** | **अभृथाः** | **अभृषाथाम्** | **अभृढ्वम्** |
| तृ० पु० | **अभार्षीत्** | **आभार्ष्टाम्** | **अभार्षुः** | **अभृत** | **अभृषाताम्** | **अभृषत** |

**अ+भृ+सीत्-भार्**-पृ० १९७ नि० ५ प्रमाणें **अभार्षीत्** (प्रथ० पुस्त० पृ० ८८ टीप † पहा).

**अ+भृ+स्त** पृ० १९७ नि० १० (**ब**) प्रमाणें स्वरास विकार झाला नाहीं, पृ० १९७ नि० ११ प्रमाणें **स्** चा लोप होऊन-**अभृत.**

**लू** प० प०

| | ए० व० | द्विव० | ब० व० |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अलाविषम्** | **अलाविष्व** | **अलाविष्म** |
| द्वि० पु० | **अलावीः** | **अलाविष्टम्** | **अलाविष्ट** |
| तृ० पु० | **अलावीत्** | **अलाविष्टाम्** | **अलाविषुः** |

**अ+लू+ईत्**-पृ० १९७ नि० ६ (**अ**) प्रमाणें **लौ+ईत्-अलावीत्.**

**लू** आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **अलविषि** | **अलविष्वहि** | **अलविष्महि** |
| द्वि० पु० | **अलविष्ठाः** | **अलविषाथाम्** | **अलविध्वम्-ढ्वम्** |
| तृ० पु० | **अलविष्ट** | **अलविषाताम्** | **अलविषत** |

**अ+लू+इष्ट**-वरील नि० १३ प्रमाणें **लू**चा **लो-अलविष्ट.**

१ **प्रछ्-अनिट्** असल्यानें चवथ्या प्रकारांत आला. **अ+प्रछ्+सीत्**-पृ० १९७ नि० ५ प्रमाणें **प्राछ्**, पृ० ५८ नि० ९ प्रमाणें **प्राष्**, पृ० ५६ नियम ४ प्रमाणें **प्राक्**, प्र० पुस्त० पृ० ८८ टीप † प्रमाणें **प्राक्+षीत-अप्राक्षीत्.** द्विव० **अ+प्रछ्+स्ताम्**-पृ० १९६ नि० (१) व पृ० १९७ नि० ५ प्रमाणें **प्राछ्+ताम्-प्राष्+ताम्**-प्र० पुस्त० पृ० २१टीप*प्रमाणें **प्राष्टाम्-अप्राष्टाम्.** ब० व० **अप्राक्षुः**. द्वि० पु० **अप्राक्षीः-अप्राष्टम्-अप्राष्ट.** प्र० पु० **अप्राक्षम्-अप्राक्ष्व-अप्राक्ष्म.**

२ **तृप्**-पाठ २२ नि० ४ (ब) प्रमाणें एक रूप **अतृपत्.** पृ० ९० नि० ६ प्रमाणें ह्या धातूस विकल्पानें इ आगम होतो, म्हणून हा चवथ्या व पांचव्या प्रकाराप्रमाणें चालतो; **अ+तृप्+सीत्**-पृ ९४ नि० १९ प्रमाणें विकल्पानें **त्रप्**, पृ० १९७ नि० ५ प्रमाणें **त्राप्-अत्राप्सीत्.** पृ० १९७ नि० ५ प्रमाणें **तृप्** चें **तार्प्-अतार्प्सीत्.** द्विव० पृ० १९६ नि० (१) प्रमाणें **स्ताम्** ह्यांतील **स्** चा लोप झाला म्हणून **अत्राप्ताम्** आणि **अतार्प्ताम्** झालें. पांचव्या प्रकाराप्रमाणें **अतर्पीत्** ( पृ० १९७ नि० ९ प्रमाणें गुण झाला ). द्विव० **अतर्पिष्टाम्** इ०. म्हणून ह्या धातूचीं चार रूपें होतात. **दृप्**चीं ह्याचप्रमाणें.

३ **त्यज्-अ+त्यज्+सीत्**-पृ० १९७ नि० ५ प्रमाणें **त्याज्**, प्रथ० पुस्तक पृ० ८८ टीप * प्रमाणें **त्याक्**, प्र० पुस्त० पृ० ८८ टीप † प्रमाणें **त्याक्+षीत्-अत्याक्षीत्.** द्विवचन ह्याच पाठांतील नि० (१) प्रमाणें **स्** चा लोप होऊन **अत्याक्ताम्.**

४ **दह्-अ+दह्+सीत**-ह्याच पाठांतील नि० ५ प्रमाणें **दाह्**-पृ० ५६ नि० ५ प्रमाणें **दाघ्**-पृ० ५७ नि० ७ प्रमाणें **धाघ्**-प्र० पुस्त० पृ० ५ टीप * प्रमाणें **धाक्-अधाक्षीत्**; द्विव० **अ+दह्+स्ताम्-अ+दाह्+स्ताम्.** पहिल्यानें **स्**चा लोप झाला, नंतर **अ+दाह्+ताम्**-पृ० ५६ नि० ५ प्रमाणें **दाघ्+ताम्**-पृ० ५५ नि० २ प्रमाणें **दाघ्+धाम्**-पृ० ५७ नि० ६ प्रमाणें **अदाग्धाम्**; ब० व० **अधाक्षुः.**

५ **वस्-अ+वस्+सीत्-वास्**-पृ० ११० नि० २ प्रमाणें **वात्-अवात्सीत्**; द्विव० **अ+वास्+स्ताम्-अवात्ताम्.** येथें ह्याच पाठांतील नि० (१) प्रमाणें **स्ताम्** ह्यांतील **स्**चा लोप करण्यापूर्वी **वस्** ह्यांतील **स्**चा **त्** केला पाहिजे.

६ **वह्-अ+वह्+सीत्-वाह्**-पृ० ५५ नि० १ प्रमाणें **वाढ्**, पृ० ५६ नि० ४ प्रमाणें **वाक्-वाक्+षीत्-अवाक्षीत्**; द्विव० **अ+वह्+स्ताम्-**

**वाह्+ताम्-वाद्+ताम्**, पृ० ५५ नि० २ प्रमाणें **वाद्+धाम्-वाद्+ढाम्**, पृ० ५५ नि० ३ प्रमाणें **वाढाम्**, पृ० १०१ नि० (२) प्रमाणें **अवोढाम्**. त्याचप्रमाणें बदल **तम्**, **त**, आणि आ० प० **त**, **थास्**, **ध्वम्** त्यांपूर्वी होतो.

७ **रुध्** उ० धातु आहे. पाठ २२ नि० ४ (ब) प्रमाणें त्याच्या तृ० भूताचें एक रूप **अरुधत्**. दुसरें रूप **अ+रुध्+सीत्**-पृ० १९७ नि० ५ प्रमाणें **रौध्**, प्र० पुस्त० पृ० ५ टीप*प्रमाणें **रौत्-अरौत्सीत्**; द्विव० **रौध्+स्ताम्**, **स्**चा लोप झाल्यानें **रौध्+ताम्** पृ० ५५ नि० २ प्रमाणें **रौध्+धाम्**, पृ० ५७ नि० ६ प्रमाणें **रौद्धाम्-अरौद्धाम्**; ब० व० **अरौत्सुः**; आ० प० **अरुध्+स्त**, **स्** गेल्यानें **रुध्+त**, नंतर **रुद्ध-अरुद्ध**; द्विव० **अरुत्साताम्**; ब० व० **अरुत्सत**.

८ **लभ्** आ० प०-**अलभ्+स्त-लभ्+त-लभ्+ध-लब्ध-अलब्ध**; द्विव० **अलभ्+साताम्**-प्र० पुस्तक पृ० ५ टीप *प्रमाणें **अलप्साताम्**.

९ **स्खल्** त्याच पाठांतील नि० ६ (ब) प्रमाणें **अस्खालीत्**; त्याच पाठांतील नि० ७ प्रमाणें **नद्-अनदीत्** अ० **अनादीत्** व **नन्द्-अनन्दीत्** अशीं रूपें होतात.

१० **सृज्** हा धातु **अनिट्** असल्यामुळें चौथ्या प्रकारांत येतो; **अ+सृज्+सीत्**-पृ० ९४ नि० १८ प्रमाणें **स्रज्**-पृ० १९७ नि० ५ प्रमाणें **स्राज्**-पृ० ५८ नि० ९ प्रमाणें **स्राष्**-पृ० ५६ नि० ४ प्रमाणें **स्राक्-स्राक्+सीत्** त्याचें प्र० पु० पृ० ८८ टीप † प्रमाणें **अस्राक्षीत्**.

११ **वृ** उभयपदी आहे. तो **सेट्** असल्यामुळें पांचव्या प्रकारांत येतो; प० प० **अवारीत्**. त्याचीं आत्मनेपदी रूपें पृ० १९६ नि० (क) त्यास अनुसरून चौथ्या व पांचव्या प्रकाराप्रमाणें होतात. **अ+वृ+स्त**-पृ० १९७ नि० ११ प्रमाणें **अ+वृ+त-अवृत**; **अ+वृ+इष्ट**-पृ० १९८ नि० १३ प्रमाणें **अवरिष्ट**; **वर्+ईष्ट** पृ० १०९ नि० ३ प्रमाणें विकल्पानें-**अवरीष्ट**.

१२ **अधि+इ** हा धातु **अनिट्** असल्यामुळें चौथ्या प्रकारांत येतो; **अधी+आ+इ+स्त-अधि+आ+ए+स्त-अधि+ऐ+स्त-अध्यैष्ट**; अथवा **अधि+अ+गा+स्त**-पृ० १११ नि० २ प्रमाणें **गी+स्त-अध्यगीष्ट**.

दुष्टाञ् शब्दान्मा प्रयुक्ष्महि म्लेच्छाश्च मा भूमेत्यध्येयं व्याकरणम् ।

ओदनं शाकांश्च सूदा अपाक्षुरतोऽधुना सर्वान्ब्राह्मणान्भोजय ।

कनिष्ठं पुत्रमहमब्रवं पुत्रक कुसुमपुरं गत्वा तत्रैकस्मिन्गृहे मया निक्षिप्तं धनमास्ते तद्गृहाण । सोऽगच्छत् । निवृत्य च मामब्रवीत्तात भ्रातरो मे तत्रागत्यास्मभ्यमेतद्धनं पितादादिति वदन्तः सर्वमेव तदादिषत ।

यत्त्वं सत्यमवादीस्तत्तुभ्यमेतद्गवां शतं ददामि ।

त्वमात्मनः पूर्वभार्यामत्याक्षीरन्यां च पर्यणैषीरिति यदश्रौषं तत्किं सत्यम् ।

मुग्धाकृतिरतीव प्रियश्चावयोः शिशुरमृतेति शोकविकलोऽहं भार्या च मे । परंतु किं वृथाशोकेन सत्यमेव तद्यत्कविराह ।

कस्यैकान्तं सुखमुपगतो दुःखमेकान्ततो वा ।

नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ॥

ऋषयो वै सरस्वत्यां सत्रमासत । ते कवषमैलूषं सोमादनयन्दास्याः पुत्रः कितवोऽब्राह्मणः कथं नो मध्येऽदीक्षिष्टेति ।

साचिव्ये मामेवान्यान्सर्वाननादृत्य राजाऽयौक्षीदतोऽभियुक्तेन मनसा मया कार्यमनुष्ठेयम् ।

अस्मिन्क्षेत्रे विपुलं धान्यमवाप्सम् ।

अङ्गीकृतं महत्कार्यं पारयितुमक्षमा वयमुदस्राक्ष्म ।

अखिला मनोरथा मेऽफालिषुरतोऽहं सुखमस्वाप्सं न किंचिदवेदिषम् ।

किं नाद्याप्यग्निरथमद्राष्ट प्रत्यहं त्रिरनेन मार्गेण स नीयते ।

मुक्तकेशीं मां दृष्ट्वा दुर्योधनस्य भार्या भानुमत्यहसीत्तन्मे दहति देहमित्यब्रवीद्भीमं द्रौपदी ।

असमर्थोऽयमर्जुनो धार्तराष्ट्रैः सह योद्धुमतः संग्रामाद्व्यवर्तिष्टेति जना ब्रूयुः ।

भार्या मे पुत्रमसविष्ट । अतो जातकर्मादिसंस्काराणां संभारान्करोमि ।

अधुनैव सोऽत्रागत्यायं पुरुषः सुविनीतोऽयं दुर्विनीत इति बहु प्रालापीत् । मैवं पुनः प्रलपीदित्येकदा तं भृशं ताडय ।

अस्माभिराज्ञप्तः पौराणिकः पुराणकथाः कथयितुमारब्ध तदेहि श्रोतुम् ।

परिचारकं मे दन्दशूकोऽदाङ्क्षीत्तत्त्वरस्व भिषजं गत्वौषधमानय ।

इयन्तं कालमुद्यमं कुर्वन्नपि सुखं नालप्सि तस्मान्नियतिर्बलियसी ।

महता प्रयत्नेन तेन संचितं धनमहृथास्तस्मात्पापोऽसि गर्हणीयचरितोऽसि ।

तेऽभ्यगुर्भवनं तस्य सुप्तं चैक्षिषताथ तम् ॥
अवोचत्कुम्भकर्णस्तं वयं मन्त्रेऽभ्यधाम यत् ।
न त्वं सर्वं तदश्रौषीः फलं तस्येदमागमत् ॥
प्राज्ञवाक्यान्यवामंस्था मूर्खवाक्येष्ववास्थिथाः ।
अध्यगीष्ठाश्च शास्त्राणि प्रत्यपत्था हितं न च ॥
मूर्खास्त्वामववञ्चन्त ये विग्रहमचीकरन् ।
अभाणीन्माल्यवान्युक्तमक्षंस्थास्त्वं न तन्मदात् ॥
ततोऽक्रन्दीद्दशग्रीवस्तमाशिश्वसदिन्द्रजित् ।
निरयासीच्च संक्रुद्धः प्रार्चिचच्च स्वयंभुवम् ॥
सोऽलब्ध ब्रह्मणः शस्त्रं स्यन्दनं च जयावहम् ॥
प्रोदपाति नभस्तेन स च प्रापि महागिरिः ।
यस्मिन्नज्वालिषू रात्रौ महौषध्यः सहस्रशः ॥

एतं ह वा ऐन्द्रं महाभिषेकं वासिष्ठः सात्यहव्योऽत्यरातये जानंतपये प्रोवाच । तस्माद्वत्यरातिर्जानंतपिरराजा * सन्विद्यया समन्तं सर्वतः पृथिवीं जयन्परीयाय । स होवाच वासिष्ठः सात्यहव्योऽजैषीर्वै समन्तं सर्वतः पृथिवीं महन्मा† गमयेति । स होवाचात्यरातिर्जानंतपिर्यदा ब्राह्मणोत्तरकुरूञ्जयेयमथ त्वमु हैव पृथिव्यै ‡ राजा स्याः सेनापतिरेव तेऽहं स्यामिति । स होवाच वासिष्ठः सात्यहव्यो देवक्षेत्रं वै तन्न वै तन्मर्त्यो जेतुमर्हत्यद्रुक्षो § वै म आऽत इदं दद इति । ततो हात्यरातिं जानंतपिमात्तवीर्यं निःशुक्रममित्रतपनः शुष्मिणः शैब्यो राजा जघान ।

---

* सामासिक शब्दाच्या अन्तीं होणारे फेरफार अ अथवा अन् ह्या अव्ययाशीं झालेल्या तत्पुरुष समासांत होत नाहींत.

† अस्मद् शब्दाचें द्वि० ए० व०.

‡ षष्ठ्यर्थी चतुर्थी.

§ सामान्य नियमास अनुसरून येथें द्रुह्चें रूप सातव्या प्रकरणाप्रमाणें झालें. परंतु द् ह्यास ध् आदेश झाला नाहीं.

१ शत्रु वीस गांवें जाळिते झाले ( दह् ) आणि आतां राजधानीकडे चाल करीत आहेत.

२ पिंजऱ्यांत घातलेले सर्व पक्षी उडून गेले ( उद्+डी ).

३ ज्या मित्रांची मी इतके दिवस वाट पहात होतों, ते आले ( आ+गम् ) (अ० आ+इ), आणि आतांच गाड्यांतून उतरले ( अव+तॄ ).

४ बागेंतील झाडांच्या फांद्या आम्हीं तोडिते झालों ( लू अ० छिद् ).

५ शेतकीकरितां सिंधुनदाशीं मिळणारे पुष्कळ कालवे ते खोदिते झाले ( खन् ).

६ मी दहा दिवसांत संस्कृत पंडित होईन, असें जेव्हां तो बोलला ( वच् ) तेव्हां मी हंसलों ( स्मि ).

७ यज्ञदत्त नुकताच आपल्या पुत्राची मुंज करिता झाला ( कृ, वि+धा, अनु+स्था ). त्या समयीं तो ब्राम्हणांस पुष्कळ दक्षिणा देता झाला ( दा ).

८ मदतीकरितां गोविंदास बोलावण्यास मनुष्य पाठविला, असें त्यांस नुकतेंच स्मरण झालें ( स्मृ ).

९ भिऊं नका ( मा+भी ) तुम्ही पुढें जें पहातां तो नाग नाहीं, दोरी आहे.

१० इंग्रज लोक पुढारी लोकांस मारिते झाले ( वध् ) आणि देश पुनः जिंकिते झाले ( पुनर्+जि ).

११ त्याच्या नेहमीं घरीं बसण्यानें आणि कांहींही काम न करण्यानें दारिद्र्य व शरीरास पीडा करणारे रोग उत्पन्न झाले आहेत ( जन् अ० निस्+पद् ).

१२ जे दागिने मी करण्यास सांगितले ते तुम्ही केले आहेत ( कृ )? केले असल्यास मला दाखवा.

१३ राजाचे जमीन मापणारे अद्यापि जमीन न मापिते झाले ( मा ).

१४ आम्ही ते सर्व कागद फाडिते झालों ( दॄ ). कारण ते आतां निरुपयोगी आहेत.

१५ तो औषध कुटिता झाला ( क्षुद् ), भांडें रिकामें करिता झाला ( रिच् ), त्यांत ती भुकटी घालिता झाला ( नि+क्षिप् ), पाणी घालिता झाला (जलेन पृ अ० नि+सिच्*) आणि बिस्तरावर ठेविता झाला.

१६ गोविंदाच्या इच्छा पूर्ण झाल्या ( तृप् ) आणि आतां तो सुखी आहे.

१७ तो संसार सोडिता झाला ( परि+त्यज् ) आणि संन्यासी झाला (परि+व्रज् ).

---

* नि हा उपसर्ग मागें असला म्हणजे षिच् असें रूप होतें.

१८ जे पैसे ते आम्हांस काल देते झाले, त्यांचा अंगीकार आम्ही अद्यापि न करिते झालों ( **प्रति+ग्रह्** ).

१९ ते आपल्या राजाची निष्ठेनें सेवा करिते झाले ( **सेव्** ).

२० बाजारांतील सर्व कापूस व्यापारी विकत घेते झाले ( **परि+क्री** ) आणि इंग्लंडास पाठविते झाले ( **प्र+हि** ).

२१ वानर घराचें छप्पर मोडिते झाले ( **भञ्ज्** ).

२२ बंधु वडिलांची मिळकत विभागते झाले ( **वि+भज्** ).

२३ मी शांतपणानें लोकांचें उपरोधी बोलणें सहन करिता झालों ( **सह्** ) आणि राज्य करण्याची जबाबदारी अखंड सोसिता झालों ( **वह्** ).

२४ लढाईकरतां दोन राजे आपल्या सेना सिद्ध करिते झाले (**सम्+नह्***).

---

# शब्दकोश २४.

**अक्षम** वि० असमर्थ.
**अग्निरथ** पु० आगगाडी.
**अत्यराति** पु० एका क्षत्रियाचें नांव.
**अनुष्ठेय** वि० ( विध्यर्थी ) **अनु+स्था** धातूचें, कर्तव्य असेल तें.
**अभियुक्त** भू० धा० **अभि+युज्** धातूचें, उद्योगी, झटणारा.
**अमित्र** पु० शत्रु.
**आज्ञप्त** भू० धा० क० आज्ञापिलेला.
**आत्त** वि० ( **आ** आणि **दत्त** भू० धा० क० **दा** देणें ह्या धातूचें ) घेतलेलें.
**उत्तरकुरवः** पु० ब० व० हिमालयापलीकडचा देश ( बहुतकरून आर्यलोकांचें मूलस्थान ).
**उपरि** क्रि० वि० वर.
**एकान्त** वि० एकसारखें.
**एकान्ततः** क्रि० वि० एकसारखें.
**ऐलूष** पु० इलूषाचा पुत्र.
**औषध** न० औषध.
**कवष** पु० एका मनुष्याचें नांव.
**कितव** पु० लबाड, धूर्त.
**कुसुमपुर** न० एका शहराचें नांव.
**जयावह** वि० जय करणारा.
**जातकर्मन्** न० जन्मकाळीं संस्कार करितात तो.
**जानंतपि** पु० जनंतपाचा पुत्र.
**तपन** पु० जुलमी.
**तृप्** च० ग० प० प० तृप्त होणें.
**दंश्** प्र० ग० प० प० डसणें.
**दन्दशूक** पु० साप.
**दशा** स्त्री० स्थिति.

---

* पृ० १०१ नि० ( **ब** ) प्रमाणें **नह्** धातूचें **नध्** असें रूप होतें.

**दह्** प्र० ग० प० प० जाळणें.
**दीक्ष्** प्र० ग० आ० प० दीक्षा घेऊन यज्ञ करण्यास योग्य होणें.
**दुर्विनीत** वि० वाईट चालीचा.
**दृ** ष० ग० आ० प० उप० **आ**, आदर करणें.
**देवक्षेत्र** न० देवभूमि.
**नियाति** स्त्री० दैव.
**निःशुक्र** वि० निःशक्त.
**नीचैः** क्रि० वि० खालीं.
**नेमि** स्त्री० चाकाची धाव, चाकाचा घेर.
**पत्** उप० **प्र** आणि **उद्**, उडणें.
**पद्** उप० **प्रति**, जाणणें, स्वीकारणें, करणें, अभ्यास करणें.
**पौराणिक** पु० पुराणिक.
**फल्** प्र० ग० प० प० सिद्धि पावणें.
**भज्** प्र० ग० उ० प० उप० **वि**, विभागणें.
**भानुमती** स्त्री० दुर्योधनाची स्त्री.
**मन्** उप० **अव**, अनादर करणें, दुर्लक्ष करणें.
**महत्** न० मोठेपणा.
**महत्त्व** न० मोठेपणा, सामर्थ्य.
**माल्यवत्** पु० एका राक्षसाचें नांव, रावणाच्या आईचा बाप.
**मुक्तकेशी** स्त्री० मोकळया केसाची.
**मुग्धाकृति** वि० सुंदर आकृतीचा.
**म्लेच्छ** पु० अडाणी मनुष्य.
**लप्** प्र० ग० प० प० उप० **प्र**, बोलणें, बडबड करणें.
**वञ्च्** द० ग० आ० प० फसविणें.
**वासिष्ठ** पु० वसिष्ठाचा वंशज.
**शाक** पु० भाजी.
**शुष्मिण** वि० सशक्त.
**शैब्य** पु० एका राजाचें नांव.
**शोकविकल** वि० दुःखाकुल.
**सत्र** न० यज्ञ; **सत्रमासत** यज्ञ करण्याकरितां जमले.
**सरस्वती** स्त्री० एका नदीचें नांव.
**साचिव्य** न० सचिवपणा.
**सात्यहव्य** पु० एका ऋत्विजाचें नांव.
**सुविनीत** वि० चांगल्या चालीचा, मर्यादशील.

---

अखंड **अविरतम्** क्रि० वि०.
इंग्रज **आंग्लभौम** पु०.
इतके दिवस **एतावत्कालम्**.
उपरोधी बोलणें **उपालम्भ** पु०.
औषध **औषध** न०, **ओषधि** स्त्री०.
कागद **पत्रक** न०.
कापूस **तूल** पु०, **पिचु** पु०.
कालवा **कुल्या** स्त्री०.
घातलेला **नियंत्रित** भू० धा० क०, **निबद्ध** भू० धा० वि०.
चाल करणें **अभि+गम्**.
छप्पर **छदिस्** न०, **पटल** न०.
जमीन मापणारे **भूमापक** पु०.
दरिद्र **दारिद्र्य** न०, **दुर्गति** स्त्री०.
नाग **फणिन्** पु०, **नाग** पु०.
मिळणारे **संगत** भू० धा० वि०, **संगच्छमान** व० धा० वि०.
निष्ठेनें **भक्त्या, निष्ठया.**
नुकताच **अधुनैव**.
पिंजरा **पञ्जर** पु०.

पीडा करणारे **व्यथाकर** वि०, **पीडाकर** वि०.
पुढारी **प्रधानराजद्रोहिन्** पु०.
बाजार **पण्यवीथिका** स्त्री०, **आपण** पु०.
भुकटी **क्षोद** पु०, **चूर्ण** न०.
मदतीस **साहाय्यार्थम्**.
मिळकत **रिक्थ** न०, **वित्त** न०.
यज्ञदत्त **यज्ञदत्त** पु० (एका व्यक्तीचें नांव).
राजधानी **राजधानी** स्त्री०.
राज्य चालविण्याची जबाबदारी **राज्यधुरा** स्त्री०.
रोग **व्याधि** पु०.
वडिलांची **पितृपैतामह** वि०.
व्यापारी **वणिज्** पु०.
शेतकीकरितां **कृषिहेतोः**, **कृषिकर्मणे**.

---

# भाग २.

## १ आशीर्वादार्थक.

१ परस्मैपदी प्रथम भूताच्या प्रत्ययांपूर्वी **यास्** लावून ह्या अर्थी परस्मैपदी प्रत्यय होतात. तृ० पु० बहुवचनाचा प्रत्यय **यासुः** आहे आणि द्वितीय व तृतीय पुरुषांच्या एकवचनाच्या **स्** व **त्** ह्या प्रत्ययांपूर्वी **यास्** ह्यांतील **स्**चा लोप होतो.

२ विध्यर्थाच्या आत्मनेपदी प्रत्ययांपूर्वी आणि त्यांतील **त्** व **थ्** ह्या वर्णांपूर्वी **स्** लाविला म्हणजे आ० प० आशीर्वादार्थक प्रत्यय होतील. पृ० ८९ नि० ४ प्रमाणें **षीध्वम्**चें **षीढ्वम्** होतें.

३ परस्मैपदी प्रत्यय **अपित्** आणि आत्मनेपदी प्रत्यय **पित्** आहेत.

### परस्मैपदी रूपांचे नियम.

४ पंधराव्या पाठांतील भाग २ ह्यांतील दुसऱ्या नियमांतील **अ**, **ब**, **क**, **ई**, **फ**, आणि **ज** हीं कलमें येथें लागू पडतात.

५ पृ० ११६ नि० २ (ड) ह्यांत सांगितलेल्या धातूंच्या अन्त्य स्वरास **ए** असा आदेश होतो.

६ संयोगपूर्वक इतर (मूळ किंवा पृ० ९३ नि० १४ प्रमाणें झालेल्या) आकारान्त धातूस वर सांगितलेला विकार विकल्पानें होतो; म्हणजे **आ**चा **ए** विकल्पानें होतो; जशीं **ग्लै**चीं—**ग्लेयात्**—**ग्लायात्**, **ग्लेयास्ताम्**—**ग्लायास्ताम्** इ०.

## आत्मनेपदी रूपांचे नियम.

७ **सेट्** धातूंपुढील प्रत्ययांमागें इ आगम नित्य होतो आणि **वेट्** धातूं-पुढील प्रत्ययांमागें विकल्पानें होतो.

८ **वृ** धातु, ( दीर्घ ) ॠकारांत व संयोगपूर्वक ( ऱ्हस्व ) ऋकारांत धातु ह्यां-पुढील प्रत्ययांमागें विकल्पानें इ आगम होतो; जसें, **वृचें वरिषीष्ट, वृषीष्ट,** ( खालचा नि० पहा ); **स्तृचें स्तरिषीष्ट, स्तृषीष्ट.**

९ प्रत्ययांमागें इ आगम होत नसल्यास अन्त्य ऋ अ० ॠ ह्यास व उपांत्य स्वरास गुण होत नाहीं. जसें **हृचें हृषीष्ट; स्तॄचें स्तरिषीष्ट; स्तीर्षीष्ट; मुच्चें मुक्षीष्ट.**

१० आर्धधातुक प्रकारांतील काळांचीं व अर्थांचीं कर्मणि रूपें, तयार केलेल्या अंगास, आत्मनेपदी प्रत्यय लावून तयार करण्यांत सामान्य नियमाबरोबर पृ० ११६ नि० ३ हाही ह्या अर्थांत उपयोगी पडतो.

**कृ.**

प० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **क्रियासम्** | **क्रियास्व** | **क्रियास्म** |
| द्वि० पु० | **क्रियाः** | **क्रियास्तम्** | **क्रियास्त** |
| तृ० पु० | **क्रियात्** | **क्रियास्ताम्** | **क्रियासुः** |

आ० प०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० पु० | **कृषीय** | **कृषीवहि** | **कृषीमहि** |
| द्वि० पु० | **कृषीष्ठाः** | **कृषीयास्थाम्** | **कृषीढ्वम्** |
| तृ० पु० | **कृषीष्ट** | **कृषीयास्ताम्** | **कृषीरन्** |

( अ ) खालीं लिहिलेलीं रूपें कोणत्या ( पूर्वोक्त ) नियमांस अनुसरून झालीं हें सांगा.

**दिश्यात्, दिक्षीष्ट, रुध्यात्, त्सीष्ट, उच्यात्, स्मर्यात्, स्तर्यात्, नीयात्, नेषीष्ट, देयात्, दासीष्ट, घाक्षीष्ट, गाहिषीष्ट, घ्रेयात्, घ्रायात्, तीर्यात्, पूर्यात्, उह्यात्, वक्षीष्ट, मोदिषीष्ट, धुक्षीष्ट, दुह्यात्.**

( ब ) खालीं लिहिलेल्या धातूंचीं आशीर्वादार्थक रूपें सांगाः—

**ह्व, हृ, वप्, यज्, सह्, नह्, रुह्, लिह्, बन्ध्, ग्लै, हा, भिद्, भू, धृत्, रुच्, दु, लू, सो, स्तु, रु, शास्.**

---

# पंचविंशतितमः पाठः ।

## इच्छादर्शक ( रूपें ).

१ ( अ ) अकराव्या पाठांतील सामान्य नियमाप्रमाणें व पाठ २२ प्रकार ३ नि० ३ प्रमाणें धातूंस द्वित्व करून नंतर **स्** लावावा. सार्वधातुक प्रकारांमध्यें **ह्या स्**ला **अ** विकरण लागतें. ( ब ) अभ्यासांतील अच्या जागीं **इ** होते.

२ धातु **सेट्** असल्यास **स्** पूर्वी **इ** आगम होतो आणि **अनिट्** असल्यास होत नाहीं. खालीं लिहिलेले धातु ह्या नियमांस अपवादक आहेत.

( अ ) **ग्रह्**, **गुह्** आणि उकारान्त अ० ऊकारान्त धातूंपुढील **स्**च्या मागें **इ** आगम होत नाहीं; जसें–**जिघृक्षति**, **बुभूषति**.

( ब ) **ह** आ० प०, **धृ** आ० प०, **कृ**, **गृ** हे सर्व षष्ठगणांतील धातु आणि **स्मि**, **पू** आ० प०, **अञ्ज्**, **प्रच्छ्**, **ऋ** व **अश्** ह्यांपुढील **स्**च्या मागें **इ** आगम होतो; जसें **पिपृच्छिषति**, **दिधरिषते** इ०.

( क ) ज्या धातूंच्या अंतीं ( दीर्घ ) **ॠ** व **इव्** असेल त्यांपुढील **स्**च्या मागें व **वृ**, **दम्भ्**, **श्रि**, **यु**, **भृ** आणि **ज्ञप्** ह्यांपुढील **स्** च्या मागें विकल्पानें **इ** आगम होतो. जसें **दिव्** ह्याचें * **दुद्यूषति** अ० **दिदेविषति**, **श्रि** ह्याचें **शिश्रीषति** अ० **शिश्रयिषति** इ०.

३ खालीं लिहिलेले अपवाद ध्यानांत ठेवून गुणाविषयींचे सामान्य नियम येथें लागू करावे ( पृ० १३ नि० ६ पहा ).

( अ ) **इ**, **उ**, **ऋ** ( सर्व दीर्घ अ० ऱ्हस्व ) एतदंत धातूंपुढील **स्**च्या मागें आणि हेच स्वर उपांत्य असणाऱ्या धातूंपुढील **स्**च्या मागें **इ** आगम होत नसल्यास ह्या धातूंच्या स्वरास गुण होत नाहीं; जसें, **बुभूषति**, **निनीषति**.

( ब ) **रुद्**, **विद्**, व **मुष्** ह्यांस गुण होत नाहीं. जर धातूंचा उपांत्य ऱ्हस्व **इ** अ० **उ** असेल, व आदि कोणतेंहि व्यंजन असून अंतीं **य्** अ० **व्** ह्यांखेरीज इतर व्यंजन असेल व धातूंपुढील **स्** च्या मागें **इ** आगम होत असेल, तर धातूच्या स्वरास गुण विकल्पानें होतो; जसें **रुरुदिषति**, **मुमुदिषते** अ० **मुमोदिषते** इ०.

४ **स्** पूर्वी **इ** आगम होत नसल्यास धातूचा अंत्य **स्वर** दीर्घ होतो; जसें, **जि**चें **जिगीषति**. **हन्** धातूचाही अकार दीर्घ होतो.

---

* पृ० २१५ टीप † पहा.

५ ( अ ) **ग्रह्**, **प्रच्छ्** व **स्वप्** ह्यांतील **र्** आणि **व्** ह्यांच्या स्थानीं यथानुक्रमें ऋ व उ होतो. जसें **सुषुप्सति**. ( पृ० १०० नि० ६ पहा. )

( ब ) **द्युत्** धातुसंबंधी अभ्यासांतील **य्** च्या जागीं **इ** होते.

( क ) खालीं लिहिलेल्या धातूंस द्वित्व होत नाहीं आणि त्यांतील स्वराच्या जागीं **इ** होते.

**मि, मी, मा, दा, धा,** व ज्यांचीं रूपें **दा** आणि **धा** अशीं होतात असे दुसरे धातु, आणि **रभ्, लभ्, शक्, पत्, पद्.** ह्यांपैकीं अजंत धातूंपुढें **त्** जोडावा.

( ड ) **आप्** धातूचें **ईप्सति** व **ज्ञप्** धातूचीं **ज्ञीप्सति** व **जिज्ञपयिषति** अशीं रूपें होतात.

( इ ) **दम्भ्** धातूचीं तीन रूपें होतात. **धिप्सति, धीप्सति, दिदम्भिषति. तन्** *धातूचींहि **तितांसति, तितंसति, तितनिषति** अशीं तीन रूपें; **पत्, पित्सति, पिपतिषति.**

( फ ) **पू** आ० प० **पिपविषते** आणि **यु**, जेव्हां **इ** आगम होतो तेव्हां, **यियविषति.**

( ज ) **ऋ, अरिरिषति** आणि **प्रति+** 'खात्री होणें' **प्रतीषिषति.** 'जाणें' ह्या अर्थी असल्यास त्यास **गम्** आदेश होतो.

( ह ) अभ्यासापुढील **जि** धातूंतील **ज्**चा **ग्**, **हि** व **हन्** धातूंतील **ह्**चा **घ्** होतो; आणि **चि** यांतील **च्**चा **क्** विकल्पानें होतो.

६ प्रयोजक धातूंच्या व दशम गणांतील धातूंच्या अंगावरून इच्छादर्शक रूपें पूर्वोक्त सामान्य नियमाप्रमाणें होतात. **बिभावयिषति, जिगणयिषति.**

७ पाठ २२ प्रकार ३ नि० ४ हा प्रयोजक धातु व दहाव्या गणांतील धातु ह्यांचीं इच्छादर्शक रूपें करण्यांत लागू करावा.

८ ( अ ) मूलधातूचें जें पद ( आ० प०, प० प० अ० उ० प० ) असतें तेंच त्या धातूच्या इच्छादर्शक रूपाचें असतें.

( ब ) **ज्ञा, श्रु, स्मृ,** व **दृश्** ह्यांचीं इच्छादर्शक रूपें आत्मनेपदी होतात.

**कृ+स्**–नि० २ प्रमाणें **स्**ला **इ** आगम झाला नाहीं, नि० ३ ( अ ) प्रमाणें ऋस गुण झाला नाहीं,–नि० ४ प्रमाणें **कॄ**, † पृ० २ नि० ९ प्रमाणें **कीर्**-

---

* **तन्** व **पत्** हे धातु इच्छादर्शक रूपांत विकल्पानें सेट् आहेत.

† जेव्हां **स्**ला इडागम होत नाहीं तेव्हां होणारे स्वरांचे विकार प्रथम करून मग अभ्यास ( द्वित्व ) करावा.

नि० १ (अ) प्रमाणें चिकीर्-चिकीर्षति. येथें स्चा ष् झाला व नि० १ प्रमाणें त्यापुढें अ आला; प० प० नि० ८ (अ). मृ+स्-मृ-मूर्-मुमूर्-मुमूर्षति.

भू+स्-नि० १ (अ) प्रमाणें बुभू, नि० २ (अ) प्रमाणें स् पूर्वीं इ आगम होत नाहीं म्हणून व नि० ३ (अ) प्रमाणें ऊचा गुण न झाल्यानें बुभूषति असें रूप झालें.

ग्रह्+स्-जग्रह्-जिग्रह्+स्, नि० २ (अ) प्रमाणें इ आगम होत नाहीं-नि० ५ (अ) प्रमाणें जिगृह्-जिगृढ्-जिघृढ्-जिघृक्-जिघृक्+सति-जिघृक्षति.

द्युत्+स्-नि० ५ (ब) प्रमाणें दिद्युत्-नि० ३ (ब) प्रमाणें दिद्योत् अ० दिद्युत-नि० २ प्रमाणें इ आगम होतो, नि० ८ (अ) प्रमाणें आ० प०-दिद्योतिषते-दिद्युतिषते.

भिद्+स्-नि० १ (अ) प्रमाणें बिभिद्-नि० ३ (अ) प्रमाणें गुण झाला नाहीं, बिभित्सति.

९ (अ) इच्छादर्शक रूपास उ लाविल्यानें 'करण्यास इच्छिणारा' या अर्थी नाम होतें; ह्या नामाचा द्वितीयान्त कर्माशीं अन्वय होतो; जसें चिकीर्षुः कटम्.

(ब) इच्छादर्शक रूपास आ लाविल्यानें भाववाचक नामें होतातः जसें जिज्ञासा 'जाणण्याची इच्छा.'

---

प्रारिप्सितस्य ग्रन्थस्याविघ्नपरिसमाप्तय इष्टदेवतां स्तौति।

स्वयंवरकाले सीतां लिप्सवो रावणादयो बहवो राजानो विदेहाञ्जग्मुः। किं तु रुद्रधनुर्नमयितुमशक्ताः सर्वे भग्नाशा बभूवुः।

अभितापसंपदमथोष्णरुचिर्निजतेजसामसहमान इव।
पयसि प्रपित्सुरपराम्बुनिधेरधिरोढुमस्तगिरिमभ्यपतत्॥

ब्रह्मतत्त्वं जिज्ञासमानः कश्चिदाचार्यमुपेत्याध्यापय भो ब्रह्मेत्युवाच।

तस्यां सभायामेव दुर्योधनं गदाघातेन जिघांसुर्भीमसेनो युधिष्ठिरेण निवारितः।

यियक्षमाणेनाहूतः पार्थेनाथ द्विषन्मुरम्।
अभिचैद्यं प्रतिष्ठासुरासीत्कार्यद्वयाकुलः॥

प्रासादतलमारुरुक्षुः सोपानपङ्क्तिषु पदं निधत्ते ।

यूरोपीयवैभवं दिदृक्षमाणाः प्रतिसंवत्सरं कतिचिद्भरतखण्डीय। अङ्ग्लभूम्यादिदेशानग्निनौकाभिर्गच्छन्ति ।

ब्राह्मणो बुभूषू राजर्षिर्विश्वामित्र उग्रं तपश्चक्रे ।

प्रभूतवर्षणादस्या नद्याः कूलं पिपातिषति। तदस्मिन्मा पदं निधेहि ।

सूर्यवंशसंभवानां राज्ञां यशो जिगासुः कालिदास आह ।

क्व सूर्यप्रभवो वंशः क्व चाल्पविषया मतिः ।
तितीर्षुर्दुस्तरं मोहादुडुपेनास्मि सागरम् ॥

भूरि धनमादित्सुना बलेनानुगम्यमानः शरदारम्भे दिगन्ताञ्जिगीषू रघुरयोध्यायाः प्रतस्थे ।

बटुमुपनिनीषुराचार्यः स्वाधिकारसिद्धये कृच्छ्रत्रयं कुर्यात् ।

राजगृहं प्रविविक्षुर्ऋषिकुमारको हठान्निःसारितो दुर्विनीतैर्द्वारपालैः ।

आत्मनः कौशलं दिदर्शयिषन्त्यङ्गना महान्तं कालमनृत्यत् ।

अर्थयन्ते द्विजन्मानो तस्मादर्थं यियक्षवः ।
अर्थापयत्यसा सम्यग् दुर्बुद्धं वैदिकं वचः ॥

---

१ तो कुत्रा **मरावयास टेकला आहे*** ( **मृ** ) त्याला पीडा देऊं नका.

२ झाडाची खांदी **वांकाविण्यास** (प्रयोजकभेदीं **नम्**) **इच्छिणारा** तो आपला हात वर करिता झाला.

३ फार जबरें तुफान झालें, सूर्य दिसेनासा झाला, आणि वारा सर्व झाडांस **मुळांसकट उपटण्याच्या** ( **उद्+मूल्** ) आणि सर्व घरें **मोडण्याच्या बेतांत** आहे ( **भञ्ज्** ) असें वाटलें.

४ विश्वामित्र एक हजार वर्षे तप करिता झाला, तोंपर्यंत त्याचें शरीर तपस्तेजानें इतकें दैदीप्यमान झालें कीं, तो सर्व सृष्टीस आपल्या अलौकिक तेजानें **जाळूं पाहतो** ( **दह्** ) काय असा दिसला.

५ आपले आप्त आपल्याशीं **युद्ध करण्यास सिद्ध झालेले** ( **युध्** ) पाहून त्याचें मुख म्लान झालें.

---

* जीं अक्षरें मोठीं लिहिलीं आहेत त्यांबद्दल इच्छादर्शक रूपें योजा.

६ तें मूल **निजेस आलें आहे ( स्वप् )**; त्यास पाळण्यांत घाला आणि हालवा.

७ दरवाज्याजवळ उभा राहिलेला मनुष्य तुम्हांपाशीं कांहीं महाकार्याविषयीं **बोलण्यास इच्छीत आहे ( वच् )**.

८ संसारबंधनापासून **मुक्त होण्यास इच्छिणारा ( मुच् )** तत्त्वज्ञापाशीं जावो, ब्रह्माचा परिचय करो आणि त्याचें चिंतन करो.

९ विधवाविवाहाच्या प्रचाराची **प्रवृत्ति करवूं इच्छिणारे ( प्र+वृत्** प्रयोजक ) तें काम एकदम करोत; कारण वाद करण्याचा वेळ गेला.

१० त्या युद्धांत एक शिपाई जखमी झाल्यानें **तान्हेनें पीडित झाला ( पाणी पिण्यास इच्छितो ) ( पा )**.

११ एका ऋषीस आपला शत्रु समजून धृष्टकेतु तरवारीनें त्यास **मारण्याच्या बेतांत होता ( प्र+हृ )** इतक्यांत मी त्याचा हात धरिला.

१२ गंगेच्या पवित्र जलांत **स्नानाच्या इच्छेनें ( स्ना )** आणि दोन वर्षेपर्यंत सांख्यशास्त्र शिकण्यास **राहण्याच्या इच्छेनें ( नि+वस् )** मी काशीस गेलों.

१३ फुलें **वेंचण्याच्या इच्छेनें ( अव+चि )** त्या दोन मुली बागेंत गेल्या.

१४ स्वयंभू परमेश्वर जग **निर्माण करण्याच्या इच्छेनें ( सृज् )** पाण्यावर दिसला, जें पाणी सर्व जागा आच्छादितें झालें.

१५ जो पोपट आज सकाळीं पिंजऱ्यांत घातला, तो **उडून जाण्याच्या बेतांत आहे ( डी** अ० **उद्+पत् )**.

---

# शब्दकोश २५.

**अधिकार** पु० हुकमत, एखादा संस्कार करण्यास योग्यता.

**अपराम्बुनिधि** पु० ( **अपर** दुसरा म्ह० पश्चिम, **अम्बुनिधि** समुद्र ) पश्चिमसमुद्र.

**अभिचैद्यम्** क्रि० वि० ( **चैद्य** पु० चेदिदेशाचा राजा, कृष्णाचा शत्रु शिशुपाल ) चैद्याकडे.

**अभिताप** पु० अति उष्णता.

**अर्थ्** द० ग० आ० प० याचना करणें.

**अर्थापय** ( नामधातु ) उ० प० स्पष्ट करून सांगणें.

**अल्पविषया** स्त्री० जिला पोंच कमी अशी.

**अविघ्न** वि० निर्विघ्न.

**अस्तगिरि** पु० अस्ताचल, पश्चिमेकडचा पर्वत. ज्यावर सूर्य, चंद्र व तारे अस्त पावतात अशी कल्पना आहे तो.

**आचार्य** पु० मुंज लावणारा व वेद शिकविणारा गुरु.
**आशा** स्त्री० आशा.
**इष्टदेवता** स्त्री० आराध्य देवता.
**उग्र** वि० घोर, कडक.
**उडुप** पु० न० होडी.
**उष्णरुचि** पु० सूर्य.
**कतिचित्** सर्व० कितीएक.
**कार्यद्वयाकुल** वि० एकाच कालीं दोन कर्में करावयाचीं असल्यामुळें गोंधळलेला.
**कूल** न० तीर, कांठ.
**कृच्छ्रत्रय** ( **कृच्छ्र** न० प्रायश्चित्त, **त्रय** तीन ) तीन प्रायश्चित्तें.
**ग्रह्** उप० **सम्**, संग्रह करणें.
**दिगंत** पु० दिशांचा अंत, चोहोंकडचे देश.
**दुर्बुद्ध** वि० समजण्यास कठीण, दुर्बोध.
**द्वारपाल** पु० द्वाराचें रक्षण करणारा.
**नी** उप० **उप**, उपनयन करणें, मुंज करणें.
**पङ्क्ति** स्त्री० ओळ.
**पत्** उप० **अभि**, उडी मारून जवळ जाणें.
**परिसमाप्ति** स्त्री० पूर्णता, शेवट.
**प्रचण्ड** वि० प्रखर.
**बल** न० सेना.
**भग्न** भू० धा० क० **भञ्ज्** धातूचें, मोडलेली.
**भूरि** वि० पुष्कळ.
**मुर** पु० विष्णूच्या शत्रूचें नांव.
**यूरोपीय** वि० युरोपखंडासंबंधी.
**रुह्** उप० **अधि**, चढणें.
**वर्षण** न० पर्जन्य पडणें, वृष्टि.
**वृ** द० ग० उप० **नि**, प्रतिबंध करणें, एखाद्या गोष्टीपासून मन वळविणें.
**वैदिक** वि० वेदसंबंधी.
**संभव** पु० जन्म.
**सांख्य** न० एक शास्त्र.
**सिद्धि** स्त्री० संपादन.
**सूर्यवंश** पु० सूर्यवंश.
**सृ** ( प्रयोजक ) उप० **निर्**, घालवून देणें.
**सोपान** न० जिना, पायरी.
**हठात्** क्रि० वि० हट्टानें, हेक्यानें.

---

अलौकिक **अद्भुत** वि०.
आप्त **बंधु** पु०, **ज्ञाति** पु०.
जबरें **प्रचण्ड** वि०.
तत्त्वज्ञ **तत्त्वविद्** पु०.
तेजस्वी **देदीप्यमान**, **विभ्राजमान** वर्त० धा०.
दिसेनासा **अदृश्य** वि०.
पाळणा **प्रेङ्खा** स्त्री०.
पिंजरा **पञ्जर** पु०.
पीडा देणें **तुद्**.
पीडित झाला **आर्त** भू० धा० वि०, **अर्दित** भू० धा० वि० क०.
प्रचार **विधि** पु०, **पद्धति** स्त्री०
बंधन **बन्धन** न०, **निगड** पु० न०.
भयंकर **प्रचण्ड** वि०.
महाकार्य **गुरुत्व** न०, **महत्त्व** न०, **गुरुकार्य** न०.
मोठी **प्रबल** वि०, **बलीयस्** वि०.
म्लान **पाण्डु** वि०, **विवर्ण** वि०.
वर करणें **उद्+नम्** ( प्रयोजक ).
वाद **वादविवाद** पु०.
हलविणें ( पाळणा ) **दोलय** अ० **आंदोलय** ( नामधातु ).

# षड्विंशतितमः पाठः ।

## धातुसाधितें.

१ **सेट्** धातूपुढील **तुम्** प्रत्ययापूर्वी **इ** आगम होतो, **अनिट्** धातूपुढील **तुम्** प्रत्ययापूर्वी **इ** आगम होत नाहीं आणि **वेट्** धातूपुढील **तुम्** प्रत्ययापूर्वी विकल्पानें होतो.

(अ) **कर्मणि भूतकालवाचक धातुसाधिताचा त** प्रत्यय **अपित्*** आहे, म्हणून त्या प्रत्ययापूर्वी गुण होत नाहीं. (पृ० १३ नि० ६ पहा). हा प्रत्यय लावण्यापूर्वी पृ० ९९ नि० ४ व पृ० २ नि० ९ ह्यांत सांगितल्याप्रमाणें फेरफार करावा; जसें **कृ–कृत, वद्–उदित.**

(ब) **इ** आगम करण्याचा पाठारंभीं दिलेला सामान्य नियम ध्यानांत ठेवावा. परंतु ह्या नियमास बहुत अपवाद आहेत.

(क) खालीं लिहिलेल्या धातूंस **इ** आगम होत नाहीं:—

(१) उ अ० ऊ व ॠ एतदंत धातूंस **इ** आगम होत नाहीं; जसें, **नु–नुत, भू–भूत, कॄ–कीर्ण.**

(२) ज्या धातूपुढें कोणत्याही एखाद्या प्रत्ययापूर्वी **इ** आगम विकल्पानें होतो, त्या धातूपुढील **त** प्रत्ययापूर्वी **इ** आगम होत नाहीं. **इष्–इष्ट** (पृ० १०९ नि० २), **दंभ्–दब्ध** (पृ० २०९ नि० २ (क), **सिव्–स्यूत** † (पृ० २०९ नि० २ (क), ) **मुह्–मुग्ध–मूढ** (पृ० ९० नि० ६, पृ० १०० नि० (१) (अ), **क्रम्–क्रांत** (पृ० २१७ नि० ६ (अ) आणि खालचा (ह) नियम.

ह्यांशिवाय आणि पुष्कळ धातूंस **इ** आगम होत नाहीं.

(ड) अंत्य **द्** व **र्** पुढें **त**चा **न** होतो आणि हा **न** पुढें आला असतां धातूच्या अंत्य **द्**चाही **न्** होतो; जसें **भिद्+त=भिद्+न=भिन्+न=भिन्न; शॄ चें शीर्ण.**

---

* **अपित्** म्हणजे गुण अथवा वृद्धि न करणारा प्रत्यय.

† अनुनासिक व अंतःस्थ वर्ण खेरीज करून कोणतेंही व्यंजन आदि असणाऱ्या **अपित्** प्रत्ययापूर्वी अंत्य **व्** चा **ऊ** होतो; ह्या **ऊ**चा त्या पूर्वीच्या **अ** अ० **आ** ह्या वर्णांशीं वृद्धिसंधि होतो.

(इ) य्, र्, ल् अ० व् ह्यांपैकीं एखादा वर्ण असणाऱ्या संयोगादि आकारांत धातूंपुढील आणि आणखी कित्येक धातूंपुढील तचा न होतो.

अपवाद—नुद्, विद् स० ग०, त्रै, घ्रा व ह्री ह्यांपुढील त चा न विकल्पानें होतो आणि ध्यै, ख्या, मद्, ह्यांपुढील तचा न होत नाहीं.

(फ) शी, स्विद् (प्र० ग०), मिद्, क्ष्विद् व धृष् ह्यांपुढील प्रत्ययामागें जेव्हां इ आगम होतो तेव्हां ह्यांतील स्वरास गुण होतो.

(ग) त पूर्वी यम्, रम्, नम्, गम्, हन्, मन्, तन्, क्षण्, क्षिण्, ऋण्, व वन् ह्यांतील अनुनासिकाचा लोप होतो. जसें गम्चें गत, व तन्चें तत (अशीं कर्मणि भूतकालवाचक धातुसाधितें होतात).

(ह) अंतीं अम् व अन् असणाऱ्या कित्येक धातूंपुढील त प्रत्ययामागें इ आगम होत नसल्यास धातूंतील स्वर दीर्घ होतो, जसें शम्चें शान्त, क्षम्चें क्षान्त, दम्चें दान्त. (ह्याच पाठांतील नि० ६ (अ) व पृ० ९० नि० ६ पहा).

(ऐ) त पूर्वी इ आगम होत नसल्यास उपांत्य अनुनासिकाचा लोप होतो; जसें रञ्ज् चें रक्त, अञ्ज्चें अक्त.

३ (अ) कर्मणि भूतकालवाचक धातुसाधितांस वत् प्रत्यय लागून कर्तरि भूतकालवाचक धातुसाधितें होतात; जसें कृ-कृत-कृतवत्-कृतवान्, लभ्+त-लब्ध-लब्धवत्-लब्धवान्.

(ब) ह्या कर्तरि भूतकालवाचक धातुसाधिताचें स्त्रीलिंगी रूप ई लागून होतें. जसें कृतवत्+ई-कृतवती.

४ (अ) द्वितीयभूताच्या तृतीयपुरुषीं बहुवचनी अपित् प्रत्ययापूर्वी धातूचें जें रूप होतें त्यास वस् प० प० व आन आ० प० हे प्रत्यय लाविले असतां द्वि० भूताचीं कर्तरि धातुसाधितें होतात.

(ब) वर सांगितलेलें रूप एकाक्षरी म्हणजे ज्यांत एकच स्वर असें असल्यास अ० धातु आकारान्त असल्यास वस् पूर्वी इ आगम होतो. घस् धातूपुढील वस् प्रत्ययामागेंही इ आगम होतो, जसें दाचें ददिवस्, पत्-पेतिवस्; परंतु कृचें चकृवस्-चक्राण, हृचें जह्रवस्-जह्राण.

(क) गम्, हन्, विद् ष० ग०, विश् व दृश् ह्या धातूंस वस् पूर्वी इ आगम विकल्पानें होतो, जसें गम्चें जग्मिस् व * जगन्वस्.

---

* पृ० ९० टीप पाहा.

( ड ) **वस्** व **आन** प्रत्ययांपूर्वी कितीएक ( जसें **बन्ध्, अञ्ज्** इ० ) धातूंतील अनुनासिकाचा लोप होतो; जसें **आजिवस्.** धातूच्या अंत्य ( दीर्घ ) ॠस गुण होत नाहीं; जसें **तितीर्वस्.** पहिला फेरफार द्वितीय भूतांत होत नाहीं, परंतु दुसरा होतो.

( इ ) द्वि० भूताच्या तृ० पु० बहुवचनाचें जें रूप तेंच ह्या धातुसाधिताचें अंग समजून त्यासच द्वितीयाबहुवचनादिक स्वरादि प्रत्यय लावावे आणि तसेंच स्त्रीलिंगी ई पूर्वी व न० लिं० प्र० व द्वि० द्विवचनी प्रत्ययांपूर्वी हेंच अंग समजावें; जसें **चिक्रीवस्–चिक्रियुषा** तृ० ए० व०, **चिक्रियुषी** स्त्री०; **जगन्वस्** अ० **जग्मिवस्–जग्मुषा** तृ० ए० व०, **जग्मुषी** स्त्री०. हीं रूपें करितांना कांहीं बाबतींत ( ड ) नियमाप्रमाणें फेरफार करावा.

५. द्वि० भविष्यावरून धातुसाधितें करणें असल्यास ह्या कालाच्या कोणत्याही एका रूपांतून प्रत्यय काढून जें रूप राहील तें परस्मैपदी असल्यास त्यास **अत्** व आ० प० असल्यास **मान** हे प्रत्यय लावावे. **अत्** लावण्यापूर्वी वर सांगितल्याप्रमाणें बनलेल्या रूपांतील अंत्य अचा लोप करावा; जसें **करिष्यति-करिष्य–करिष्य्+अत्–करिष्यत्** 'करणार,' **करिष्यमाण** ( कर्तरि ) 'करणार,' ( कर्मणि ) 'केला जाणार.' **द्रक्ष्यत्** 'पाहणार,' **द्रक्ष्यमाण** 'पाहिला जाणार.' **स्यत्** ह्याचें स्त्रीलिंग **स्यन्ती** अ० **स्यती** असें होतें; जसें **करिष्यन्ती** अ० **करिष्यती.**

६ ( अ ) धातूस **त्वा** प्रत्यय लागून **भूतकालवाचक धातुसाधित** अव्यय होतें, आणि **सेट्** धातूंपुढील **त्वा** ह्या प्रत्ययापूर्वी **इ** आगम होतो. ज्या **सेट्** धातूंच्या अंतीं **अम्** अ० **अन्** असतो त्यांपुढील **त्वा** ह्या प्रत्ययापूर्वी विकल्पानें **इ** आगम होतो.

( ब ) हा प्रत्यय **अपित्** आहे. परंतु कितीएक प्रसंगीं जेव्हां त्यास **इ** आगम होतो तेव्हां धातूच्या स्वरास गुण होतो.

( क ) जेव्हां **त्वा** पूर्वी **इ** आगम होत नाहीं तेव्हा त्यास नि० २ ( ग ) व ( ह ) नियम लागू पडतात; जसें **तन्–तत्वा** अ० **तनित्वा** ( नि० ६ ( अ ) पहा ). **मन्–मत्वा, शम्–शान्त्वा** अ० **शमित्वा** इ०.

( ड ) **त्वा**च्या जागीं होणाऱ्या **य** पूर्वी **यम्, रम्, गम्** व **नम्** ह्यांतील अनुनासिकाचा लोप विकल्पानें होतो. नि० २ ( ग ) ह्यांत सांगितलेल्या बाकीच्या धातूंच्या अनुनासिकाचा लोप नित्य होतो.

७ (अ) तव्य, अनीय व य हे विध्यर्थी * कर्मणि धातुसाधिताचे प्रत्यय आहेत.

(ब) तव्य व अनीय ह्या प्रत्ययांपूर्वी धातूंच्या अंत्य स्वरास व उपांत्य ऱ्हस्व स्वरास गुण होतो.

(क) धातु सेट् इ० असल्यास तव्य प्रत्ययापूर्वी इ आगम होतो.

(ड) (१) य पूर्वी धातुसंबंधी इ व उ ह्यांस गुण होतो. उकारास गुण होऊन झालेल्या ओचा अव् होतो; जसें कु-को-कव्य, नी-नेय.

(२) अंत्य आचा ए होतो; जसें दाचें देय.

(३) ऋकारांत धातूस य पूर्वी वृद्धि होते; कृचें कार्य.

(४) इ, स्तु, वृ उ० प०, दृ, जुष् आणि उपांत्य ऋ असणाऱ्या धातूंच्या स्वरास य पूर्वी गुण होत नाहीं. ऱ्हस्व स्वरानंतर य पूर्वी त् योजिला जातो; जसें स्तुत्य.

ह्या नियमास कांहीं अपवाद आहेत, परंतु ते नानाविध आहेत, म्हणून येथें दिले नाहींत.

८ (अ) तृ व अक हे प्रत्यय धातूस लागून जीं नामें होतात त्यांचा अर्थ धातुबोधित क्रिया करणारा असा होतो.

(ब) तृ पूर्वी अंत्य व ऱ्हस्व उपांत्य स्वरांस गुण होतो.

(क) अक पूर्वी अंत्य स्वरास व (सेट् मूकारांत धातु खेरीज करून) उपांत्य अकारास वृद्धि होते आणि इतर ऱ्हस्व उपांत्यास गुण होतो. जसें नीचें नेतृ, नायक; वच् चें वक्तृ, वाचक; बुध्चें बोद्धृ, बोधक; शम्चें शमक; आ+चम्चें आचामक.

(ड) हा अक प्रत्यय लावण्यापूर्वी आकारान्त धातूच्या पुढें य लागतो. जसें स्था-स्थायक, दा-दायक.

(इ) वृद्धि करणाऱ्या धातुसाधिताच्या प्रत्ययापूर्वी हन् धातूंतील न्चा त् होतो. जसें, घातक. पृ० (१९९ नि० १९ पहा).

(फ) तृचें स्त्रीलिंगी त्री आणि अकचें इका व कधीं कधीं अका असें होतें. कर्त्री, कारिका, कारका.

९ (अ) धातूस अन, अ व ति हे प्रत्यय लागून भाववाचक नामें होतात.

(ब) ति हा अपित् प्रत्यय आहे. जीं कार्यें कर्मणि भूतकालवाचक धातुसाधिताच्या त पूर्वी होतात, तींच प्रायः होतात. जसें वच्-उक्ति, मुच्-मुक्ति.

---

* धातु सकर्मक असल्यास हे प्रत्यय कर्मणि आणि अकर्मक असल्यास भावे होतात.

(क) अ पूर्वी कितीएक धातूंस गुण व कितीएक धातूंस वृद्धि होते. अन पूर्वी अंत्य व ऱ्हस्व उपांत्य स्वरास गुण होतो; जसें **भू-भाव-भवन, जि-जय, बुध्-बोध-बोधन, हन्-घात-हनन.**

(ड) ह्या अ पूर्वी अंत्य च् अ० ज् ह्यास क् अ० ग् होतो; जसें **पच्-पाक, युज्-योग.**

१० **ति** प्रत्यय लागून स्त्रीलिंगी, अ लागून पुल्लिंगी आणि **अन** प्रत्यय लागून नपुंसकलिंगी नामें होतात.

---

**तस्मादेवं विदुषे ब्राह्मणायैवं चक्रुषे न क्षत्रियो द्रुह्यात् ।**

**राजा यक्ष्यमाणो ब्राह्मणं पुरोदधीत ।**

***छन्दांसि वै देवेभ्यो हव्यमूढ्वा श्रान्तानि जघनार्धे यज्ञस्य तिष्ठन्ति यथाश्वो वाश्वतरो वोहिवांस्तिष्ठेदेवम् ।**

**असुरैः सह योत्स्यमान इन्द्रो वरुणस्य साहाय्यं ययाचे ।**

**वरुणसाहाय्यं लब्धवतस्तस्मात्सर्वेऽसुरा अबिभयुः ।**

**व्यर्थं मे जन्म न मया कृतं कर्तव्यं न भुक्तं भोक्तव्यं न दृष्टं द्रष्टव्यं न श्रुतं श्रोतव्यम् ।**

**निषेदुषीं राज्ञीं दृष्ट्वा दास्योऽपि सपत्नीवृत्तं कथयिष्यन्त्योऽधस्तस्थुः ।**

**ब्राह्मणेभ्यो दत्तसर्वस्वो रघुः प्रत्यग्रागतायार्थिने धनं दित्सुः कुबेरात्तन्निष्क्रष्टुं चकमे । कुबेरस्तु तेनाभियास्यमानमात्मानं प्रेक्ष्य स्वयमेव तस्य कोशे धनवृष्टिं पातयामास । तत्सर्वं धनमात्मने ददिवांसं रघुं वक्ष्यमाणामाशिषं सोऽर्थ्युवाच ।**

**आशास्यमन्यत्पुनरुक्तभूतं श्रेयांसि सर्वाण्यधिजग्मुषस्ते ।**

**पुत्रं लभस्वात्मगुणानुरूपं भवन्तमीड्यं भवतः पितेव ॥**

**ततो रघुः पुत्रं प्रापाजं नाम । तं कतिभिः संवत्सरैर्विवाहयोग्यदशं ज्ञात्वा ससैन्यमिन्दुमतीस्वयंवराय विदर्भान्प्रस्थापितवान् ।**

**मार्गे नर्मदारोधस्येकरात्रमुषितवतस्तस्य सेनानिवेशो वन्यगजत्वमृषिशापात्समापेदानेन केनचिद्गन्धर्वेण तुमुलश्चक्रे ।**

---

* यज्ञांत जे मंत्र म्हणतात ते मंत्र देवांस आहुति नेतात असें मानिलें आहे.

समापतन्तं नृपतेरवध्यो वन्यः करीति श्रुतवान्कुमारः ।
निवर्तयिष्यन्विशिखेन कुम्भे जघान नात्यायतकृष्टचापः ॥

स विद्धमात्रः *स्वीयं दिव्यं रूपं प्राप । ततः प्रजहृषेऽप्यात्मन उपचक्रुषेऽजाय संमोहनाख्यमस्त्रं ददौ ।

एवं तयोरध्वनि दैवयोगादासेदुषोः सख्यमचिन्त्यहेतु ।
एको ययौ चैत्ररथप्रदेशान्सौराज्यरम्यानपरो विदर्भान् ॥

तं नगरोपकण्ठे तस्थिवांसं तदागमनहृष्टो विदर्भनाथः प्रत्युज्जगाम नगरं चानीय सर्वां सत्क्रियां चकार ।

त्रैलोक्यदीपके देवे लोकान्तरमुपेयुषि ।
तमस्तान्तमभूद्विश्वं कः सुखी महदापदि ॥

---

१ जो निषाद क्रौंच पक्ष्याच्या जोड्यापैकीं एकास **मारिता**†**झाला** ( हन् ) त्यास वाल्मीकि शापिता झाला.

२ शंभर गाई देण्याचें ज्या राजानें **वचन दिलें** ( प्रति+श्रु ) त्यास ऋषि आशीर्वाद देता झाला.

३ जेव्हां पांडव वारणावतीस **जाण्याच्या तयारींत होते** ( गम् अ० इ ) तेव्हां विदुर त्यांस बोध करिता झाला.

४ तें शहर **जाळण्यापूर्वी** ( दह् ) सेनापतीनें बायका व मुलें त्यांतून दुसरीकडे नेलीं.

५ त्याचें द्रव्य परत द्या असें **सांगण्यापूर्वी** ( आ+दिश् ) न्यायाधीश त्यास चांगल्या रीतीनें वागण्यास सांगता झाला.

६ यज्ञदत्तास काशीहून **जाऊं देण्यापूर्वी** ( अनु+ज्ञा ) त्यानें केलेल्या पापाचें प्रायश्चित्त करण्यास देवदत्त त्यास सांगता झाला.

७ जेव्हां पतीचे घरीं शकुंतलेस **पाठवावयाची होती** ( प्र+इष् अ० प्र+हि ) तेव्हां कण्व तीस अग्नीस प्रदक्षिणा करण्यास व आपल्या मोठेपणाविषयीं गर्विष्ठ न होण्यास सांगता झाला.

८ विष्णूला **द्यावयाचीं** ( दा ) वस्त्रें फार उत्तम व मोठ्या किंमतीचीं आहेत.

---

* हा प्रत्यय लागला म्हणजे त्याचा अर्थ केवळ, फक्त, असा होतो; जसें **विद्धमात्र** ‘ टोंचला जातांच ’.

† मोठ्या अक्षरांनीं जे शब्द लिहिले आहेत त्या शब्दांच्या जागीं धातुसाधितें योजावीं.

९ तें झाड **कापावयाचें आहे** ( छिद् ).

१० त्यानें हा चमत्कारिक निरोप पाठविला त्यावरून काय **समजावें** ( बुध् ) ?

११ ज्यानें सर्व राजे **जिंकून** ( जि ) कैदेंत घातले त्या जरासंधास कृष्ण व भीम मारिते झाले.

१२ त्याचें वचन **विश्वास ठेवण्याजोगें** नाहीं ( वि+श्वस् ), व कर्म **निंदा करण्याजोगें** ( निन्द् ) आहे.

१३ तो पदार्थ **खाण्यास योग्य** ( भक्ष् अ० अभि+अव+हृ ) नाहीं व **पिण्यास योग्य** ( पा ) नाहीं. त्याचा शोध आम्हीं कशासाठीं करावा ?

१४ त्यानें शहाणपणाचें कांहीं लक्षण दाखविलें म्हणून तो मूर्ख **मानिला न जावा** ( मन् ).

---

## शब्दकोश २६.

**अज** पु० रघूचा पुत्र.

**अत्यायत** क्रि० वि० अथवा वि० फार लांब.

**अधस्** क्रि० वि० खालीं.

**अनुरूप** वि० सारखा, योग्य.

**अश्वतर** पु० खेंचर.

**आख्या** स्त्री० नांव.

**आशिषम्+वच्** आशीर्वाद देणें.

**इन्दुमती** स्त्री० एका स्त्रीचें नांव.

**उपकण्ठ** न० गांव अ० शहर याचे जवळचा प्रदेश, किंवा त्याची सीमा.

**कुम्भ** पु० गंडस्थळ ( हत्तीचें ).

**कृ** उप० **उप**, उपकार करणें.

**गम्** उप० **प्रति+उद्**, पुढें जाणें, सामोरें जाणें.

**चैत्ररथ** पु० गंधर्वांचा देश.

**छन्दस्** न० छंद, वृत्त.

**जघनार्ध** पु० न० ( **जघन** न० बांदन, ओंटी; **अर्ध** अर्धा भाग ) ओंटीचा अर्धा भाग.

**तम्** च० ग० प० प० दुःखी होणें.

**दीपक** वि० प्रकाशक.

**नर्मदा** स्त्री० एका नदीचें नांव.

**पुनरुक्तभूत** वि० ( **पुनरुक्त** पुनः बोललेलें, किंवा पुनः बोलणें; **भूत** झालेलें ) पुनः पुनः बोलल्यासारखें.

**पुरस्+धा** उपाध्याय करणें.

**प्रत्यग्र** वि० अ० क्रि० वि० नवीन.

**प्रदेश** पु० देश.

**रोधस्** न० तीर, किनारा.

**लोकान्तरम्** न० ( **अन्यो लोकः लोकान्तरम्** ) अन्य जगत्.

**वन्य** वि० वनांत असणारा अ० वनांत झालेला.

**वरुण** पु० वरुण.

**विदर्भ** पु० ( ब० व० ) एका देशाचें नांव ( हल्लींचें वऱ्हाड ).

**विशिख** पु० बाण.

**वृष्टि** स्त्री० वर्षणें.

**शाप** पु० शाप.

**शास्** द्वि० ग० उप० आ, इच्छिणें, आशा करणें, आशीर्वाद देणें.
**संमोहन** न० एका अद्भुत अस्त्राचें नांव.
**सत्क्रिया** स्त्री० पाहुणचार, सत्कार.
**सपत्नी** स्त्री० सवत.
**सर्वस्व** न० ( **सर्व** सकल, **स्व** न० ) सर्व संपत्ति अ० मालमत्ता.
**सेनानिवेश** पु० लष्कराची छावणी.
**सौराज्य** न० उत्तम राज्य.
**हव्य** न० होम द्रव्य.

---

किंमतीचीं **महार्ह** वि०.
कैद करणें **कारागृहे निक्षिप्.**
क्रौंच **क्रौंच** पु० (एका जातीचा पक्षी).
गर्विष्ठ **उत्सिक्त** भू० धा० वि०, **उत्सेकिन्** ( **नी** स्त्री० ).
चमत्कारिक **विलक्षण** वि०.
चांगल्या रीतीनें वागणें **सदाचारेण वृत्, सदाचारं प्रतिपद्.**
जरासंध **जरासंध** पु० ( मगध देशाच्या राजाचें नांव ).
निषाद **निषाद्** पु० एक रानटी जाति अ० तींतील व्यक्ति.
परत देणें **प्रति+दा.**
प्रदक्षिणा करणें **प्रदक्षिणी+कृ.**
लक्षण **चिह्न** न०.
वारणावती **वारणावती** स्त्री० ( एका जागेचें नांव ).
विदुर **विदुर** पु० ( एक व्यक्ति ).

---

## अभ्यासाकरितां वेंचे.

( ऐतरेय ब्राह्मणाच्या सातव्या पंचिकेंतील )

**हरिश्चन्द्रो ह वैधस ऐक्ष्वाको राजाऽपुत्र * आस। तस्य ह शतं जाया बभूवुः। तासु पुत्रं न लेभे। तस्य ह पर्वतनारदौ गृह ऊषतुः। स ह नारदं पप्रच्छ।**

**यन्न्विमं पुत्रमिच्छन्ति ये विजानन्ति ये च न।**
**किंस्वित्पुत्रेण विन्दते तन्म आचक्ष्व नारद॥ इति।**
**स एकया † पृष्टो दशभिः ‡ प्रत्युवाच।**
**ऋणमस्मि§ न्त्संनयत्यमृतत्वं च गच्छति।**

---

***अस्** धातूचा द्वितीय भूत. हा उत्तम कवीच्या काव्यांत **आम्** युक्त द्वितीयभूत करण्यास मात्र सहायभूत होतो.

† **एकया** ह्या शब्दापुढें **गाथा** 'पद्य' हा शब्द अध्याहृत आहे.

‡ ह्यांपैकीं फक्त २॥ येथें दिलेल्या आहेत.

§ अंत्य **न्** आणि **स्** ह्या दोहोंमध्यें विकल्पानें **त्** येतो.

पिता पुत्रस्य जातस्य पश्येच्चेज्जीवतो मुखम् ॥
यावन्तः पृथिव्यां भोगा यावन्तो जातवेदसि ।
यावन्तो अप्सु प्राणिनां भूयान्पुत्रे पितुस्ततः ॥
शश्वत्पुत्रेण पितरोऽत्यायन्बहुलं तमः ।

* * * *

अथैनमुवाच वरुणं राजानमुपधाव पुत्रो मे जायतां तेन त्वा यजा इति । तथेति । स वरुणं राजानमुपससार पुत्रो मे जायतां तेन त्वा यजा इति । तथेति । तस्य ह पुत्रो जज्ञे रोहितो नाम । तं होवाचाजनि ते वै पुत्रो यजस्व मानेनेति । स होवाच यदा वै पशुर्निर्दशो भवत्यथ स मेध्यो भवति निर्दशो न्वस्त्वथ त्वा यजा इति । तथेति । स ह निर्दश आस । तं होवाच निर्दशो न्वभूद्यजस्व मानेनेति । स होवाच यदा वै पशोर्दन्ता जायन्तेऽथ स मेध्यो भवति दन्ता न्वस्य जायन्तामथ त्वा यजा इति । तथेति । तस्य ह दन्ता जज्ञिरे । तं होवाचाज्ञत* वा अस्य दन्ता यजस्व मानेनेति । स होवाच यदा वै पशोर्दन्ताः पद्यन्तेऽथ स मेध्यो भवति दन्ता न्वस्य पद्यन्तामथ त्वा यजा इति । तथेति । तस्य ह दन्ताः पेदिरे । तं होवाचापत्सत वा अस्य दन्ता यजस्व मानेनेति । स होवाच यदा वै पशोर्दन्ताः पुनर्जायन्तेऽथ स मेध्यो भवति दन्ता न्वस्य पुनर्जायन्तामथ त्वा यजा इति । तथेति । तस्य ह दन्ताः पुनर्जज्ञिरे । तं होवाचाज्ञत वा अस्य पुनर्दन्ता यजस्व मानेनेति । स होवाच यदा वै क्षत्रियः सांनाहुको भवत्यथ स मेध्यो भवति संनाहं नु प्राप्नोत्वथ त्वा यजा इति । तथेति । स ह संनाहं प्रापत्तं होवाच संनाहं नु प्राप्नोद्यजस्व मानेनेति । स तथेत्युक्त्वा पुत्रमामन्त्रयामास ततायं वै मह्यं त्वामददाद्धन्त त्वयाहमिमं यजा इति । स ह नेत्युक्त्वा धनुरादायारण्यमपातस्थौ । स संवत्सरमरण्ये चचार ।

अथ हैक्ष्वाकं वरुणो जग्राह । तस्य होदरं जज्ञे । तदु ह रोहितः शुश्राव । सोऽरण्याद्ग्राममेयाय तमिन्द्रः पुरुषरूपेण पर्येत्योवाच ।

---

* जन् धातूच्या तृ० भू० तृ० पु० ब० व० ( वैदिक ).

नानाश्रान्ताय श्रीरस्तीति रोहित शुश्रुम ।
पापो नृषद्वरो जन इन्द्र इच्चरतः सखा ।

चरैवेति । चरैवेति वै मा ब्राह्मणोऽवोचदिति ह द्वितीयं संवत्सरमरण्ये चचार । सोऽरण्याद्ग्राममेयाय । तमिन्द्रः पुरुषरूपेण पर्येत्योवाच ।

पुष्पिण्यौ चरतो जङ्घे भूष्णुरात्मा फलग्रहिः ।
*शेरेऽस्य सर्वे पाप्मानः श्रमेण प्रपथे हताः ॥

चरैवेति । चरैवेति वै मा ब्राह्मणोऽवोचदिति ह तृतीयं संवत्सरमरण्ये चचार । सोऽरण्याद्ग्राममेयाय । तमिन्द्रः पुरुषरूपेण पर्येत्योवाच ।

आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः ।
शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः ॥

चरैवेति । चरैवेति वै मा ब्राह्मणोऽवोचदिति ह चतुर्थं संवत्सरमण्ये चचार । सोऽरण्याद्ग्राममेयाय । तमिन्द्रः पुरुषरूपेण पर्येत्योवाच ।

कलिः शयानो भवति संजिहानस्तु द्वापरः ।
उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन् ॥

चरैवेति । चरैवेति वै मा ब्राह्मणोऽवोचदिति ह पञ्चमं संवत्सरमरण्ये चचार । सोऽरण्याद्ग्राममेयाय । तमिन्द्रः पुरुषरूपेण पर्येत्योवाच ।

चरन्वै मधु विन्दति चरन्स्वादुमुदुम्बरम् ।
सूर्यस्य पश्य श्रेमाणं यो न तन्द्रयते चरन् ॥

चरैवेति । चरैवेति वै मा ब्राह्मणोऽवोचदिति ह षष्ठं संवत्सरमरण्ये चचार । सोऽजीगर्तं सौयवसिमृषिमशनया परीतमरण्य उपेयाय । तस्य ह त्रयः पुत्रा आसुः शुनःपुच्छः शुनःशेपः शुनोलाङ्गूल इति । तं होवाच ऋषेऽहं ते शतं ददाम्यहमेषामेकेनात्मानं निष्क्रीणा इति । स ज्येष्ठं पुत्रं निगृह्णान उवाच न त्विममिति नो एवेममिति कनिष्ठं माता । तौ ह मध्यमे संपादयांचक्रतुः शुनःशेपे । तस्य ह शतं दत्त्वा स तमादाय सोऽरण्याद्ग्राममे-

---

* शी धातूच्या वर्तमान का० तृ० पु० ब० वचनासारिखें दिसतें ( वैदिक ). नियमाप्रमाणें शेरते होतें.

याय। स पितरमेत्योवाच तत हन्ताहमनेनात्मानं निष्क्रीणा इति। स वरुणं राजानमुपससारानेन त्वा यजा इति। तथेति भूयान्वै ब्राह्मणः क्षत्रियादिति वरुण उवाच। तस्मा एतं राजसूयं यज्ञक्रतुं प्रोवाच। तमेतमभिषेचनीये पुरुषं पशुमालेभे।

तस्य ह विश्वामित्रो होतासीज्जमदग्निरध्वर्युर्वसिष्ठो ब्रह्मायास्य उद्गाता। तस्मा उपाकृताय नियोक्तारं न विविदुः। स होवाचाजीर्गतः सौयवसिर्मह्यमपरं शतं दत्ताहमेनं नियोक्ष्यामीति। तस्मा अपरं शतं ददुस्तं स*निनियोज। तस्मा उपाकृताय नियुक्तायाप्रीताय पर्यग्निकृताय विशसितारं न विविदुः। स होवाचाजीर्गतः सौयवसिर्मह्यमपरं शतं दत्ताहमेनं विशसिष्यामीति। तस्मा अपरं शतं ददुः। सोऽसिं निःशान एयाय। अथ ह शुनःशेप ईक्षांचक्रेऽमानुषमिव वै मा विशसिष्यन्ति हन्ताहं देवता उपधावामीति। स प्रजापतिमेव प्रथमं देवतानामुपससार। तं प्रजापतिरुवाचाग्निर्वै देवानां नेदिष्ठस्तमेवोपधावेति। सोऽग्निमुपससार। तमग्निरुवाच सविता वै प्रसवानामीशो † तमेवोपधावेति। स सवितारमुपससार। तं सवितोवाच वरुणाय वै राज्ञे नियुक्तोऽसीति तमेवोपधावेति। स वरुणं राजानमुपससार। तं वरुण उवाचाग्निर्वै देवानां मुखं सुहृदयतमस्तं नु स्तुह्यथ त्वोत्स्रक्ष्याम इति। सोऽग्निं तुष्टाव। तमग्निरुवाच विश्वान्देवान्स्तुह्यथ त्वोत्स्रक्ष्याम इति। स विश्वान्देवांस्तुष्टाव। तं विश्वेदेवा ऊचुरिन्द्रो वै देवानामोजिष्ठो बलिष्ठः सहिष्ठः सत्तमः पारयिष्णुतमस्तं नु स्तुह्यथ त्वोत्स्रक्ष्याम इति। स इन्द्रं तुष्टाव। तस्मा इन्द्रः स्तूयमानः प्रीतो मनसा हिरण्यरथं ददौ। तमिन्द्र उवाचाश्विनौ नु स्तुह्यथ त्वोत्स्रक्ष्याम इति। सोऽश्विनौ तुष्टाव। तमश्विना ऊचतुरुषसं नु स्तुह्यथ त्वोत्स्रक्ष्याम इति। स उषसं तुष्टाव। तस्य ‡ ह स्मर्चर्यृच्युक्तायां विपाशो मुमुचे। कनीय ऐक्ष्वाकस्योदरं भवति। उत्तमस्यामेवर्च्युक्तायां विपाशो मुमुचे। अगद ऐक्ष्वाक आस।

---

* धातूच्या पूर्वाक्षरास द्वित्व न होतां उपसर्गास झालें असें दिसतें.

† वर्तमान का० तृ० पु० ए० वचन. नियमाप्रमाणें ईष्टे असें असावें.

‡ शुनःशेपानें ऊषसाचें (प्रातःकालचें) जें स्तवन केलें त्याचें हें दर्शक आहे.

## २ त्रयाणां धूर्तानाम् ।

कस्मिंश्चिदधिष्ठाने मित्रशर्मा नाम ब्राह्मणः प्रतिवसति स्म। स कदाचिन्माघमासे पशुप्रार्थनाय ग्रामान्तरं गतः। तत्र तेन कश्चिद्यजमानो याचितः। भो यजमान आगामिन्याममावास्यायां यक्ष्यामि यज्ञं तद्देहि मे पशुमेकम्। अथ तेन तस्य शास्त्रोक्तः पीवरतनुः पशुः प्रदत्तः। सोऽपि तं समर्थमितश्चेतश्च गच्छन्तमवलोक्य स्कन्धे कृत्वा सत्वरं स्वपुराभिमुखः प्रतस्थे।

अथ तस्य गच्छतो मार्गे त्रयो धूर्ताः संमुखा बभूवुः। तैश्च तादृशं पीवरतनुं पशुं स्कन्धमारूढमवलोक्य मिथोऽभिहितम्। अहो अस्य पशोर्भक्षणादद्यतनो हिमपातो व्यर्थतां नीयते। तदेनं वञ्चयित्वा पशुमादाय शीतत्राणं कुर्मः।

अथ तेषामेकतमो वेषपरिवर्तनं विधाय संमुखो भूत्वा तमूचे। भो भोः किमेवं जनविरुद्धं हास्यकार्यमनुष्ठीयते यदेष सारमेयोऽपवित्रः स्कन्धारूढो नीयते। ततश्च तेन कोपाभिभूतेनाभिहितमहो किमन्धो भवान्यत्पशुं सारमेयं प्रतिपादयसि। सोऽब्रवीद्ब्रह्मन् कोपस्त्वया न कार्यो यथेच्छं गम्यतामिति।

अथ यावत्किंचिदध्वान्तरं गच्छति तावद्द्वितीयो धूर्तः संमुखः समुपेत्य तमुवाच। भो ब्रह्मन् कष्टं कष्टं यद्यपि वल्लभोऽयं ते सारमेयस्तथापि स्कन्धमारोपयितुं न युज्यते। अथासौ सकोपमिदमाह। भोः किमन्धो भवान्यत्पशुं सारमेयं वदसि। सोऽब्रवीद्भगवन् मा कोपं कुर्वज्ञानान्मयाभिहितम्। त्वमात्मरुचितं समाचरेति।

अथ यावत्स्तोकं वर्त्मान्तरं गच्छति तावत्तृतीयोऽन्यवेषधारी धूर्तः संमुखः समुपेत्य तमुवाच। भो अयुक्तमेतद्यत्त्वं सारमेयं स्कन्धाधिरूढं नयसि तत्त्यज्यतामेष यावदन्यः कश्चिन्न पश्यति। अथासौ बहु विमृश्य तं पशुं सारमेयमेव मन्यमानो भयाद्भूमौ प्रक्षिप्य स्वगृहमुद्दिश्य पलायितः। ततस्ते त्रयो मिलित्वा तं पशुमादाय प्रतस्थिरे।

---

## ब्राह्मणभुजंगमयोः ।

अस्ति कस्मिंश्चिदधिष्ठाने हरिदत्तो नाम ब्राह्मणः। तस्य च कृषिं कुर्वतः सदैव निष्फलः कालोऽतिवर्तते। अथैकस्मिन्दिवसे स ब्राह्मणो घर्मार्तः स्वक्षेत्रमध्ये वृक्षच्छायायां प्रसुप्तः। अनतिदूरे वल्मीकोपरि प्रसारितं भीषणं भुजंगमं दृष्ट्वासौ चिन्तयामास। नूनमेषा क्षेत्रदेवता कदाचिदपि न पूजिता तेनेदं मे कृषिकर्म विफलीभवति तदहमस्याः पूजामद्य करिष्यामि। इत्यवधार्य कुतोऽपि क्षीरं याचित्वा शरावे निक्षिप्य वल्मीकान्तिकमुपगम्योवाच। भोः क्षेत्रपाल मयैतावन्तं कालं न ज्ञातं यत्त्वमत्र वससि तेन पूजा न कृता तत्सांप्रतं क्षमस्वेति। एवमुक्त्वा दुग्धं निवेद्य गृहाभिमुखं प्रायात्।

अथ प्रातर्यावदागत्य पश्यति तावद्दीनारमेकं शरावे दृष्टवान्। एवं च प्रतिदिनमेकाकी समागत्य तस्मै क्षीरं ददात्येकैकं च दीनारं गृह्णाति।

अथैकस्मिन्दिवसे वल्मीके क्षीरनयनाय पुत्रं नियुज्य ब्राह्मणो ग्रामं जगाम। पुत्रोऽपि क्षीरं तत्र नीत्वा संस्थाप्य च पुनर्गृहं समायातः। दिनान्तरे तत्र गत्वा स दीनारमेकं दृष्ट्वा गृहीत्वा च चिन्तितवान्। नूनं सौवर्णदीनारपूर्णोऽयं वल्मीकस्तदेनं भुजंगं हत्वा सर्वमेकवारं ग्रहीष्यामि। एवं संप्रधार्यान्येद्युः क्षीरं ददता ब्राह्मणपुत्रेण सर्पो लगुडेन शिरसि ताडितः। स च दैववशादमुक्तजीवितो रोषात्तं ब्राह्मणकुमारं तीव्रविषैर्दशनैस्तथादशद्यथा स सद्यः पञ्चत्वमुपागतः।

अथ पुनरपि ब्राह्मणः प्रत्यूषे क्षीरं गृहीत्वा तत्र गत्वा तारस्वरेण सर्पमस्तौत्। तदा सर्पो वल्मीकान्तर्लीन एव ब्राह्मणं प्रत्युवाच। त्वं लोभादत्रागतः पुत्रशोकमपि विहाय। इतः परं तव मम च प्रीतिर्नोचिता। तव पुत्रेण यौवनोन्मत्तेनाहं ताडितो मया च स दष्टः। कथं मया लगुडप्रहारो विस्मर्तव्यस्त्वया च पुत्रशोकदुःखं कथं विस्मर्तव्यम्। इत्युक्त्वा बहुमूल्यं हीरकमणिं तस्मै दत्त्वा पुनस्त्वया नागन्तव्यमिति कथयित्वा विवरं प्रविष्टः। ब्राह्मणोऽपि मणिं गृहीत्वा पुत्रबुद्धिं निन्दन्स्वगृहमागतः।

---

## ३. भर्तृहरिकृत नीतिशतकांतील वेंचे.

अज्ञः सुखमाराध्यः सुखतरमाराध्यते विशेषज्ञः ।
ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि नरं न रञ्जयति ॥ १ ॥

लभेत सिकतासु तैलमपि यत्नतः पीडय-
न्पिबेच्च मृगतृष्णिकासु सलिलं पिपासार्दितः ।
कदाचिदपि पर्यटञ्शशविषाणमासादये-
न्नतु प्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत् ॥ २ ॥

व्यालं बालमृणालतन्तुभिरसौ रोद्धुं समुज्जृम्भते
छेत्तुं वज्रमणीञ्शिरीषकुसुमप्रान्तेन संनह्यते ।
माधुर्यं मधुबिन्दुना रचयितुं क्षाराम्बुधेरीहते
नेतुं वाञ्छति यः खलान्पथि सतां सूक्तैः सुधास्यन्दिभिः ॥३॥

स्वायत्तमेकान्तगुणं विधात्रा विनिर्मितं छादनमज्ञतायाः ।
विशेषतः सर्वविदां समाजे विभूषणं मौनमपण्डितानाम् ॥ ४ ॥

साहित्यसंगीतकलाविहीनः साक्षात्पशुः पुच्छविषाणहीनः ।
तृणं न खादन्नपि जीवमानस्तद्भागधेयं परमं पशूनाम् ॥ ५ ॥

येषां न विद्या न तपो न दानं ज्ञानं न शीलं न गुणो न धर्मः ।
ते मृत्युलोके भुवि भारभूता मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति ॥ ६ ॥

वरं गहनदुर्गेषु भ्रान्तं वनचरैः सह ।
न मूर्खजनसंपर्कः सुरेन्द्रभवनेष्वपि ॥ ७ ॥

हर्तुर्याति न गोचरं किमपि शं पुष्णाति यत्सर्वदा-
प्यर्थिभ्यः प्रतिपाद्यमानमनिशं प्राप्नोति वृद्धिं पराम् ।
कल्पान्तेष्वपि न प्रयाति निधनं विद्याख्यमन्तर्धनं
येषां तान्प्रति मानमुज्झत नृपाः कस्तैः सह स्पर्धते ॥८॥

अम्भोजिनीवननिवासविलासमेव
हंसस्य हन्ति नितरां कुपितो विधाता ।
न त्वस्य दुग्धजलभेदविधौ प्रसिद्धां
वैदग्ध्यकीर्तिमपहर्तुमसौ समर्थः ॥ ९ ॥

केयूरा न विभूषयन्ति पुरुषं हारा न चन्द्रोज्ज्वला
न स्नानं न विलेपनं न कुसुमं नालंकृता मूर्धजाः ।
वाण्येका समलंकरोति पुरुषं या संस्कृता धार्यते
क्षीयन्ते खलु भूषणानि सततं वाग्भूषणं भूषणम् ॥ १० ॥

विद्या नाम नरस्य रूपमधिकं प्रच्छन्नगुप्तं धनं
विद्या भोगकरी यशःसुखकरी विद्या गुरूणां गुरुः ।
विद्या बन्धुजनो विदेशगमने विद्या परा देवता
विद्या राजसु पूजिता न तु धनं विद्याविहीनः पशुः ॥ ११ ॥

सूनुः सच्चरितः सती प्रियतमा स्वामी प्रसादोन्मुखः
स्निग्धं मित्रमवञ्चकः परिजनो निष्क्लेशलेशं मनः ।
आकारो रुचिरः स्थिरश्च विभवो विद्यावदातं मुखं
तुष्टे विष्टपहारिणीष्टदहरौ संप्राप्यते देहिना ॥ १२ ॥

प्राणाघातान्निवृत्तिः परधनहरणे संयमः सत्यवाक्यं
काले शक्त्या प्रदानं युवतिजनकथामूकभावः परेषाम् ।
तृष्णास्रोतोविभङ्गो गुरुषु च विनयः सर्वभूतानुकम्पा
सामान्यः सर्वशास्त्रेष्वनुपहतविधिः श्रेयसामेष पन्थाः ॥ १३ ॥

प्रारभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः
प्रारभ्य विघ्नविहता विरमन्ति मध्याः ।
विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥ १४ ॥

प्रिया न्याय्या वृत्तिर्मलिनमसुभङ्गेऽप्यसुकर-
मसन्तो नाभ्यर्थ्याः सुहृदपि न याच्यः कृशधनः ।
विपद्युच्चैः स्थेयं पदमनुविधेयं च महतां
सतां केनोद्दिष्टं विषममसिधाराव्रतमिदम् ॥ १५ ॥

स्वल्पं स्नायुवसावशेषमलिनं निर्मांसमप्यस्थिकं
श्वा लब्ध्वा परितोषमेति न तु तत्तस्य क्षुधाशान्तये ।
सिंहो जम्बुकमङ्कमागतमपि त्यक्त्वा निहन्ति द्विपं
सर्वः कृच्छ्रगतोऽपि वाञ्छति जनः सत्त्वानुरूपं फलम् ॥ १६ ॥

लाङ्गूलचालनमधश्चरणावपातं
भूमौ निपत्य वदनोदरदर्शनं च ।
श्वा पिण्डदस्य कुरुते गजपुंगवस्तु
धीरं विलोकयति चाटुशतैश्च भुंक्ते ॥ १७ ॥

परिवर्तिनि संसारे मृतः को वा न जायते ।
स जातो येन जातेन याति वंशः समुन्नतिम् ॥ १८ ॥

कुसुमस्तबकस्येव द्वयी वृत्तिर्मनस्विनः ।
मूर्ध्नि वा सर्वलोकस्य विशीर्येत वनेऽथवा ॥ १९ ॥

तानीन्द्रियाणि सकलानि तदेव कर्म
सा बुद्धिरप्रतिहता वचनं तदेव ।
अर्थोष्मणा विरहितः पुरुषः स एव
अन्यः क्षणेन भवतीति विचित्रमेतत् ॥ २० ॥

दौर्मन्त्र्यान्नृपतिर्विनश्यति यतिः सङ्गात्सुतो लालना-
द्विप्रोऽनध्ययनात्कुलं कुतनयाच्छीलं खलोपासनात् ।
ह्रीर्मद्यादनवेक्षणादपि कृषिः स्नेहः प्रवासाश्रया-
न्मैत्री चाप्रणयात्समृद्धिरनयात्त्यागात्प्रमादाद्धनम् ॥ २१ ॥

दानं भोगो नाशस्तिस्रो गतयो भवन्ति वित्तस्य ।
यो न ददाति न भुंक्ते तस्य तृतीया गतिर्भवति ॥ २२ ॥

रे रे चातक सावधानमनसा मित्र क्षणं श्रूयता-
मम्भोदा बहवो वसन्ति गगने सर्वेऽपि नैतादृशाः ।
केचिद्वृष्टिभिरार्द्रयन्ति धरणीं गर्जन्ति केचिद्वृथा
यं यं पश्यसि तस्य तस्य पुरतो मा ब्रूहि दीनं वचः ॥ २३ ॥

जाड्यं ह्रीमति गण्यते व्रतरुचौ दम्भः शुचौ कैतवं
शूरे निर्घृणता ऋजौ विमतिता दैन्यं प्रियालापिनि ।
तेजस्विन्यवलिप्तता मुखरता वक्तर्यशक्तिः स्थिरे
तत्को नाम गुणो भवेत्सुगुणिनां यो दुर्जनैर्नाङ्कितः ॥ २४ ॥

लोभश्चेदगुणेन किं पिशुनता यद्यस्ति किं पातकैः
सत्यं चेत्तपसा च किं शुचि मनो यद्यस्ति तीर्थेन किम् ।
सौजन्यं यदि किं निजैः सुमहिमा यद्यस्ति किं मण्डनैः
सद्विद्या यदि किं धनैरपयशो यद्यस्ति किं मृत्युना ॥ २५ ॥

न कश्चिच्चण्डकोपानामात्मीयो नाम भूभुजाम् ।
होतारमपि जुह्वानं स्पृष्टो दहति पावकः ॥ २६ ॥

आरम्भगुर्वी क्षयिणी क्रमेण लघ्वी पुरा वृद्धिमती च पश्चात् ।
दिनस्य पूर्वार्धपरार्धभिन्ना छायेव मैत्री खलसज्जनानाम् ॥ २७ ॥

मृगमीनसज्जनानां तृणजलसंतोषविहितवृत्तीनाम् ।
लुब्धकधीवरपिशुना निष्कारणवैरिणो जगति ॥ २८ ॥

वाञ्छा सज्जनसंगमे परगुणे प्रीतिर्गुरौ नम्रता
विद्यायां व्यसनं स्वयोषिति रतिर्लोकापवादाद्भयम् ।
भक्तिः शूलिनि शक्तिरात्मदमने संसर्गमुक्तिः खले-
ष्वेते येषु वसन्ति निर्मलगुणास्तेभ्यो नरेभ्यो नमः ॥ २९ ॥

प्रदानं प्रच्छन्नं गृहमुपगते संभ्रमविधिः
प्रियं कृत्वा मौनं सदसि कथनं नाप्युपकृतेः ।
अनुत्सेको लक्ष्म्यां निरभिभवसाराः परकथाः
सतां केनोद्दिष्टं विषममसिधाराव्रतमिदम् ॥ ३० ॥

संपत्सु महतां चित्तं भवत्युत्पलकोमलम् ।
आपत्सु च महाशैलशिलासंघातकर्कशम् ॥ ३१ ॥

संतप्तायसि संस्थितस्य पयसो नामापि न ज्ञायते
मुक्ताकारतया तदेव नलिनीपत्रस्थितं राजते ।
स्वात्यां सागरशुक्तिमध्यपतितं सन्मौक्तिकं जायते
प्रायेणाधममध्यमोत्तमगुणः संवासतो जायते ॥ ३२ ॥

नम्रत्वेनोन्नमन्तः परगुणकथनैः स्वान्गुणान्ख्यापयन्तः
स्वार्थान्संपादयन्तो विततबहुतरारम्भयत्नाः परार्थे ।
क्षान्त्यैवाक्षेपरुक्षाक्षरमुखरमुखान्दुर्मुखान्दूषयन्तः
सन्तः साश्चर्यचर्या जगति बहुमताः कस्य नाभ्यर्चनीयाः ॥ ३२ ॥

भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमैर्नवाम्बुभिर्भूरिविलम्बिनो घनाः ।
अनुद्धताः सत्पुरुषाः समृद्धिभिः स्वभाव एवैष परोपकारिणाम् ॥३४॥

श्रोत्रं श्रुतेनैव न कुण्डलेन दानेन पाणिर्न तु कङ्कणेन ।
विभाति कायः करुणापराणां परोपकारैर्न तु चन्दनेन ॥ ३५ ॥

पापान्निवारयति योजयते हिताय
गुह्यं च गूहति गुणान्प्रकटीकरोति ।
आपद्गतं न च जहाति ददाति काले
सन्मित्रलक्षणमिदं प्रवदन्ति सन्तः ॥ ३६ ॥

एते सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थान्परित्यज्य ये
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृतः स्वार्थाविरोधेन ये ।
तेऽमी मानवराक्षसाः परहितं स्वार्थाय निघ्नन्ति ये
ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे ॥ ३७ ॥

इतः स्वपिति केशवः कुलमितस्तदीयद्विषा-
मितश्च शरणार्थिनः शिखरिणां गणाः शेरते ।
इतोऽपि वडवानलः सह समस्तसंवर्तकै-
रहो विततमूर्जितं भरसहं च सिन्धोर्वपुः ॥ ३८ ॥

तृष्णां छिन्धि भज क्षमां जहि मदं पापे रतिं मा कृथाः
सत्यं ब्रूह्यनुयाहि साधुपदवीं सेवस्व विद्वज्जनान् ।
मान्यान्मानय विद्विषोऽप्यनुनय प्रच्छादय स्वान्गुणा-
न्कीर्तिं पालय दुःखिते कुरु दयामेतत्सतां लक्षणम् ॥ ३९ ॥

मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णा-
स्त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः प्रीणयन्तः ।
परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्यं
निजहृदि विकसन्तः सन्ति सन्तः कियन्तः ॥ ४० ॥

रत्नैर्महार्हैस्तुतुषुर्न देवा न भेजिरे भीमाविषेण भीतिम् ।
सुधां विना न प्रययुर्विरामं न निश्चितार्थाद्विरमन्ति धीराः ॥ ४१ ॥

ऐश्वर्यस्य विभूषणं सुजनता शौर्यस्य वाक्संयमो
ज्ञानस्योपशमः श्रुतस्य विनयो वित्तस्य पात्रे व्ययः ।
अक्रोधस्तपसः क्षमा प्रभवितुर्धर्मस्य निर्व्याजता
सर्वेषामपि सर्वकारणमिदं शीलं परं भूषणम् ॥ ४२ ॥

---

# कादंबरीच्या पहिल्या भागांतील कथाभाग.

*देवि किमत्र क्रियतां दैवायत्ते वस्तुनि। अलं रुदितेन। न वयमनुग्राह्याः प्रायो देवतानाम्। आत्मजपरिष्वङ्गामृतास्वादसुखस्य नूनमभाजनमस्माकं हृदयम्। अन्यस्मिञ्जन्मनि न कृतमवदातं कर्म। जन्मान्तरविहितं हि कर्म फलमुपनयति पुरुषस्येह जन्मनि। न हि शक्यं दैवमन्यथा कर्तुमभियुक्तेनापि। यावत्तु मानुष्यके शक्यमुपपादयितुं तावत्सर्वमुपपाद्यताम्। अधिकां कुरु देवि गुरुषु भक्तिम्। द्विगुणामुपपादय देवतासु पूजाम्। ऋषिजनपरिचर्यासु दर्शितादरा भव। परं हि दैवतमृषयो यत्नेनाराधिता यथासमीहितफलानामतिदुर्लभानामपि दातारो भवन्ति। श्रूयते हि पुरा चण्डकौशिकप्रसादान्मगधेषु बृहद्रथो नाम राजा जनार्दनस्य जेतारमतुलबलपराक्रमं जरासंधं नाम तनयं लेभे। दशरथश्च राजा परिणतवया अपि विभाण्डकमहामुनिसुतस्यर्ष्यश्रृङ्गस्य प्रसादान्नारायणभुजानिवाप्रतिहतानुदधीनिवाक्षोभ्यानवाप चतुरः पुत्रान्। अन्ये च राजर्षयस्तपोधनानाराध्य पुत्रदर्शनामृतस्वादसुखभाजो बभूवुः। अमोघफला हि महामुनिजनसेवा। अहमपि खलु कदा समुपारूढगर्भभरालसामापाण्डुरमुखीमासन्नचन्द्रोदयामिव पौर्णमासीनिशां देवीं द्रक्ष्यामि। कदा मे तनयजन्ममहोत्सवानन्दनिर्भरो हरिष्यति पूर्णपात्रं परिजनः। कदा हारिद्रवसनधारिणी सुतसनाथोत्सङ्गा द्यौरिवोदितरविमण्डला सबालातपा मामानन्दयिष्यति देवी। कदा सर्वौषधिपिञ्जरजटिलकेशो गोरोचनाचित्रितकण्ठसूत्रग्रन्थिरुत्तानशयो दशनशून्यस्मिताननः पुत्रको जनयिष्यति मे हृदयाह्लादम्। कदा गोरोचनाकपिलद्युतिरन्तःपुरिकाकरतलपरंपरासंचार्यमाणमूर्तिरशेषजनाभिनन्दितो मङ्गलप्रदीप इव मे शोकान्धकारमुन्मूलयिष्यति चक्षुषोः। कदा च क्षितितलरेणुधूसरो मण्डयिष्यति मम हृदयेन दृष्टया च सह परिभ्रमन्भवनाङ्गनम्। कदा केसरिकिशोरक इव संजातजानुचङ्क्रमणारम्भः संचरिष्यतीतस्ततः स्फटिकमणिमयभित्त्यन्तरितान्भवनमृगशावकानाजिघृक्षुः। कदान्तःपुरिकानूपुर-

---

* एका राजानें आपली राणी अपत्य नसल्यामुळें फारच कष्टी होत आहे असें पाहून तीस असें म्हटलें आहे.

निनादसंगतान्गृहकलहंसकाननुसरन्कक्षान्तरप्रधावितः कनकमेखलाघण्टिकारवानुसारिणीमायासयिष्यति धात्रीम्। कदा मातुश्चरणरागोपयुक्तशेषेण पिण्डालक्तकरसेन कञ्चुकिनां विडम्बयिष्यति मुखानि। कदा कुतूहललोललोचनो मणिकुट्टिमेष्वधोदत्तदृष्टिरनुसरिष्यति स्खलद्गतिरात्मनः प्रतिबिम्बानि। कदा नरेन्द्रसहस्रप्रसारितभुजयुगलाभिनन्द्यमानागमनो भूषणमणिमयूखलेखाकुलीक्रियमाणलोलदृष्टिरास्थानस्थितस्य मम पुरः पर्यटिष्यति सभान्तरेषु। इत्येतानि चान्यानि मनोरथशतानि चिन्तयतोऽन्तःसंतप्यमानस्य यान्ति रजन्यः। मामपि दहत्येवायमहर्निशमनल इवानपत्यतासमुद्भवः शोकः। शून्यमिव मे प्रतिभाति जगत्। अफलमिवाखिलं पश्यामि जीवितं राज्यं च। अप्रतिविधेये तु विधातरि किं करोमि। तन्मुच्यतां देवि शोकानुबन्धः। आधीयतां धैर्ये धर्मे च धीः। धर्मपरायणानां हि सदा समीपसंचारिण्यः कल्याणसंपदो भवन्ति। एवमभिधाय सलिलमादाय स्वयं करतलेनाभिनवपल्लवेनेव विकचकमलतुल्यमाननमस्याः साश्रुलेखं ममार्ज।

---

## ह्या पुस्तकांतील प्रत्येक पाठांत दिलेल्या संस्कृत मराठी कोशांचा एकवट केलेला

# कोश.

अ.

**अकरुण** वि० ( अ अभावार्थी व **करुणा** स्त्री० ) ज्याला दया नाहीं असा, निर्दय.

**अकिंचन** वि० ( अ अभावार्थी व **किंचन** न० कांहीं ) ज्या जवळ कांहीं नाहीं असा, दरिद्री.

**अक्ष** पु० सोंगटी वगैरे खेळण्याचा फांसा.

**अक्षज्ञ** वि० फांसे ( खेळण्याची विद्या ) जाणणारा.

**अक्षत्रिय** वि० निःक्षत्रिय, क्षत्रिय-रहित.

**अक्षनैपुण** वि० फांसे खेळण्याच्या कामांत निपुण.

**अक्षम** वि० असमर्थ.

**अक्षमाला** स्त्री० (**अक्ष** पु० एक वेली अ० तिचें बीज आणि **माला** स्त्री० माळ ) रुद्राक्षांची माळ अ० स्मरणी.

**अक्षरशः** क्रि० वि० अ० प्रत्येक अक्षरार्थास अनुसरून, पूर्णपणें.

**अक्षहृदय** न० फांसे धरण्याची अ० टाकण्याची युक्ति.

**अक्षि** न० डोळा.

**अक्षोभ्य** वि० न खवळणारा, न भिणारा, न डगमगणारा.

**अगद** वि० रोगरहित, शरीरसंपत्तीनें युक्त.

**अगस्त्य** पु० एका ऋषीचें नांव.

**अगार** न० घर.

**अग्नितप्त** वि० (**अग्नि** व **तप्त** तापविलेलें ) विस्तवानें तापविलेलें.

**अग्निरथ** पु० आगगाडी.

**अग्निष्टोम** पु० यज्ञविशेष.

**अग्निहोत्र** न० अग्निप्रीत्यर्थ बलि.

**अङ्क** पु० मांडी.

**अङ्कित** वि० दूषित, दोषी.

**अङ्ग** न० अवयव.

**अङ्गन** न० अंगण, जागा.

**अङ्गार** पु० न० निखारा.

**अचिन्त्य** वि० दुर्बोध, अतर्क्य.

**अज** पु० रघूच्या मुलाचें नांव; वि० जन्मरहित.

**अजस्र** वि० नेहमींचें, सततचें.

**अजा** स्त्री० शेळी.

**अजीगर्त** पु० एका ब्राह्मणाचें नांव.

**अञ्ज्** स० ग० प० प० लेपन करणें; वि+अञ्ज् उघड करणें.

**अञ्जन** न० काजळ.

**अञ्जलि** पु० ओंजळ.

**अण्** च० ग० आ० प० श्वासोच्छ्वास टाकणें, जगणें.

**अणु** वि० अल्प; पु० परमाणु, बारीक कण.

**अतिघोर** वि० ( **अति** फार ) अति भयंकर, अति दुष्ट.

**अतिनिष्करुण** वि० ( **अति** अत्यंत ) फार निर्दय, अति दुष्ट.

**अतिनिष्फल** वि० अगदीं व्यर्थ.

**अतिप्रमाद्** पु० मोठी चूक, फार अव्यवस्थितपणा.

**अतुल** वि० अनुपम.

**अत्यर्थम्** क्रि० वि० फार, अति.

**अत्यराति** पु० एका क्षत्रियाचें नांव.

**अत्यायत** क्रि० वि० अथवा वि० फार लांब.

**अद्भुत** वि० आश्चर्यकारक.

**अद्यतन** वि० आजचें.

**अद्यप्रभृति** क्रि० वि० ( **अद्य** आज आणि **प्रभृति** पासून ) आजपासून.

**अधम** वि० नीच.

**अधर** वि० सर्व० खालचा, नीच.

**अधर्म** पु० दुष्कृत्य.

**अधस्** अ० खालीं.

**अधिकार** पु० हुकमत, एखादा संस्कार करण्याची योग्यता.

**अधिज्यधन्वन्** पु० ज्याचें धनुष्य सज्ज आहे असा.

**अधिष्ठान** न० जागा.

**अधीर** वि० उतावळा, कोत्या विचाराचा.

**अध्वन्** पु० रस्ता, मार्ग.

**अध्वर्यु** पु० ऋत्विजांपैकीं एक. त्याचें काम बलि तयार करून अग्नींत टाकणें हें होय.

**अन्** द्वि० ग० प० प० श्वासोच्छ्वास करणें; **प्र+अन्** श्वासोच्छ्वास करणें, जिवंत असणें.

**अनडुह्** पु० बैल.

**अननुष्ठान** न० ( **अनुष्ठान** न० करणें ) न करणें.

**अनपत्यता** स्त्री० ( **अपत्य** न० मूल ) मूल नसणें, वांझपणा.

**अनपराधिन्** वि० निरपराधी.

**अनय** पु० शहाणपणाचा अभाव.

**अनर्ह** वि० अयोग्य.

**अनल** पु० विस्तव.

**अनवेक्षण** न० दुर्लक्ष.

**अनागस्** वि० निरपराधी.

**अनाथ** वि० आश्रयहीन, दुबळा.

**अनाद्यनन्त** वि० ( **अनादि** प्रारंभरहित आणि **अनन्त** अन्तरहित ) ज्याला आदि व अन्त नाहीं असा.

**अनारम्भ** पु० आरंभ न करणें.

**अनार्जवोपेत** वि० ( **अन्** अभाव, **आर्जव** न० सरळपणा, **उपेत** भू० धा० क० **उप+इ** धातूचें, युक्त ) ज्याचे अंगीं सरळपणा नाहीं असा.

**अनिग्रह** पु० ( **निग्रह** पु० नियमन ) अनियमन, न आकळणें.

**अनिल** पु० वारा.

**अनिशम्** क्रि० वि० नेहमीं, एकसारखें.

**अनिषण्ण** वि० न बसलेला.

**अनीक** न० सैन्य.

**अनीकस्थ** वि० ( **अनीक** न०, **स्था** उभें रहाणें ) सैन्यांतील शिपाई.

**अनुकम्पिन्** वि० दयाळू.
**अनुचर** पु० चाकर.
**अनुत्सेक** पु० नम्रता, लीनता.
**अनुपहत** वि० निष्प्रतिबन्ध.
**अनुबन्ध** पु० एकसारखें चालविणें.
**अनुमरण** न० मागून मरणें, सती जाणें म्ह० नवरा मेला असतां त्याचे चितेवर शेजारीं निजून जळून मरणें.
**अनुराग** पु० प्रीति, सद्बुद्धि.
**अनुरूप** वि० योग्य, प्रमाणें.
**अनुलेपन** न० उटणें, अर्गजा वगैरे आंगाला लावण्याचे सुगन्धि पदार्थ.
**अनुविधेय** वि० अनुसरावयाचें.
**अनुषक्त** (अनु आणि **सक्त** भू० धा० क० **सञ्ज्** धातूचें ) अनुसरलेला.
**अनुष्ठान** न० करणें.
**अनुष्ठेय** विध्यर्थी धा० सा० **अनु+स्था** धातूचें, करावयाचें.
**अनूच्य** विध्यर्थी धा० सा० **अनु+वच्** धातूचें, म्हणावयाचें, पठण करावयाचें.
**अन्त** पु० शेवट, नाश.
**अन्तःपुरिका** स्त्री० जनानखान्यांत असणारी स्त्री.
**अन्तक** पु० यम.
**अन्तगमन** न० शेवटास जाणें.
**अन्ततः** क्रि० वि० अ० शेवटीं.
**अन्तर** न० फरक, भेद.
**अन्तरित** वि० निराळें केलेलें.
**अन्य** वि० सर्व० दुसरा.
**अन्यथा** अ० अन्य प्रकारानें, नाहीं तर.
**अन्येद्युः** क्रि० वि० अ० दुसरे दिवशीं.
**अन्वाह** ( अनु+आह ) तो म्हणतो.
**अन्वित** भू० धा० क० **अनु+इ** धातूचें, युक्त, अनुसरला गेलेला.
**अन्विष्यत्** ( व० का० धा० **अनु+इष्** धातूचें, च० ग० प० प० ) शोध करणारा.
**अप्** स्त्री० ( बहुवचनान्त ) पाणी.
**अपचिति** स्त्री० पूजा.
**अपथ्य** न० दुष्ट पदार्थ, दुष्कृत्य.
**अपयशस्** न० अपकीर्ति.
**अपर** वि० सर्व० दुसरा.
**अपराधसहस्र** न० ( **सहस्र** न० हजार ) हजार अपराध.
**अपराम्बुनिधि** पु० ( **अपर** दुसरा म्ह० पश्चिमेकडील, आणि **अम्बुनिधि** समुद्र ) पश्चिमेकडील समुद्र.
**अपवित्र** वि० अपवित्र, पापी.
**अपेक्षित** न० ( भू० धा० क० **अप+ईक्ष्** धातूचें ) इच्छिलेलें.
**अप्रणय** पु० प्रेमाभाव, विनयाभाव.
**अप्रतिविधेय** वि० अनावर, उपायरहित.
**अप्रतिहत** वि० प्रतिबन्धरहित.
**अप्रमत्त** वि० ( अ आणि **प्रमत्त** अव्यवस्थित ) सावध, व्यवस्थित.
**अप्रवक्तृ** पु० न बोलणारा, न शिकविणारा.
**अब्ज** न० कमळ.
**अब्द** पु० वर्ष.
**अभाजन** न० अपात्र, नालायक.

**अभिगीत** भू० धा० क० अभि+गै प्र० ग० प० प० धातूचें गाइलेला.
**अभिचैद्यम्** क्रि० वि० ( **चैद्य** पु० चेदिदेशाचा राजा व कृष्णाचा शत्रु ) चैद्याकडे.
**अभिताप** पु० अति उष्णता.
**अभिनव** वि० नवीन, कोमल.
**अभिमन्यु** पु० अर्जुनाचा मुलगा.
**अभिमुख** वि० तोंडासमोरचें.
**अभियुक्त** वि० गुणी, योग्य.
**अभिषेचनीय** पु० राजसूययज्ञांतील एक विशेष विधि अ० ज्या दिवशीं तो विधि करितात तो दिवस.
**अभिसंधा** स्त्री० प्रतिज्ञा, निश्चय.
**अभिहित** भू० धा० क० अभि+धा धातूचें, बोललेला.
**अभ्यागत** भू० धा० अभि+आ+गम् धातूचें, आलेला; पु० अतिथि, पाहुणा.
**अम्** प्र० ग० प० प० जाणें.
**अमावास्या** स्त्री० महिन्याचा तिसावा दिवस, अवस.
**अमित्र** पु० शत्रु.
**अमुत्र** क्रि० वि० अ० परलोकीं.
**अमृत** न० अमृत.
**अमोघ** वि० सफळ, खरें.
**अम्भस्** न० पाणी.
**अम्भोजिनी** स्त्री० कमलाची वेली.
**अय्** प्र० ग० आ० प० उप० उद्, उदय पावणें.
**अयस्** न० लोखंड.
**अरण्यवास** पु० ( **अरण्य** न० वन आणि **वास** पु० राहणें ) वनांत राहणें.
**अरिस्त्री** स्त्री० शत्रूची बायको.
**अरुण** पु० सूर्याचा सारथि.
**अरुस्** पु० न० जखम.
**अर्घ्यसत्कार** पु० ( **अर्घ्य** न० पूजेचे किंवा अतिथीला सन्मान देण्याचे पदार्थ, **सत्कार** पु० सन्मान ) पूजेच्या पदार्थांनीं केलेला सन्मान.
**अर्ज्** प्र० ग० प० प० व द० ग० मिळविणें.
**अर्थ्** द० ग० आ० प० याचना करणें; **प्र+अर्थ्** प्रार्थना करणें.
**अर्थ** पु० अर्थ, इच्छिलेला पदार्थ, खरा अर्थ.
**अर्थसंशय** पु० ( **संशय** पु० संदेह, भय ) द्रव्याला भय, द्रव्यसंशय.
**अर्थापय** नाम धातु उ० प० उघड करून सांगणें.
**अर्थिन्** पु० याचक, भिकारी; वि०.
**अर्द्** प्र० व द० ग० उ० प० पीडा देणें.
**अर्धकोटी** स्त्री० ( **अर्ध** न० अर्धा भाग, **कोटी** स्त्री० शंभर लक्ष ) पन्नास लक्ष, अर्ध कोट.
**अर्यमन्** पु० एक देवता, पूर्वजांपैकीं एक.
**अर्वन्** पु० घोडा.
**अर्ह्** प्र० ग० प० प० व द० ग० योग्य असणें.
**अलक्ष्मी** स्त्री० दुर्दैव, गरिबी.
**अलस** वि० आळशी, मंद.
**अलाभ** पु० नुकसान.
**अलोभ** पु० तृप्ति, समाधान.

**अल्प** वि० थोडें, लहान; **अनल्प** वि० पुष्कळ.

**अल्पविषया** स्त्री० जिला पोंच कमी अशी.

**अवज्ञात** भू० धा० क० **अव+ज्ञा** धातूचें, धिक्कारलेला, अवज्ञा केलेला.

**अवदात** वि० सुन्दर, स्वच्छ, शुद्ध, योग्य.

**अवर** वि० सर्व० मागचा, पुढचा, हलका.

**अवलम्बमान** वि० लोंबणारें.

**अवलेप** पु० गर्व.

**अवश** वि० पराधीन, दीन.

**अवश्यम्** क्रि० वि० अवश्य, निश्चयपूर्वक.

**अवस्थान** न० राहणें.

**अवहित** ( भू० धा० **अव+धा** धातूचें ) लक्ष दिलेला, सावध.

**अवाच्** वि० दक्षिणेकडील.

**अविघ्न** वि० निर्विघ्न.

**अविनाशिन्** वि० अनश्वर, अविकारी.

**अविलम्बितम्** क्रि० वि० सत्वर, लौकर.

**अव्यय** वि० निर्विकार.

**अश्** पं० ग० आ० प० मिळविणें, उपभोगणें, व्यापणें; **वि+अश्** व्यापणें.

**अश्** न० ग० प० प० खाणें.

**अशक्त** वि० निर्बल, असमर्थ.

**अशन** न० खाणें.

**अशना** स्त्री० क्षुधा.

**अशोक** पु० एका जातीच्या झाडाचें नांव.

**अश्वतर** पु० खेंचर.

**अश्वमेध** पु० अश्वयज्ञ.

**अश्वहृदय** न० अश्वविद्या.

**अश्विन्** पु० (हा शब्द द्विवचनांत योजितात) देवांचे आवळेजावळे वैद्य, अश्विनीकुमार.

**अष्टावक्र** पु० एका पुरुषाचें नांव.

**अस्** च० ग० प० प० उप० **निर्**, बंद करणें, रद्द करणें.

**अस्** द्वि० ग० प० प० असणें.

**असंशयम्** क्रि० वि० निस्संशय.

**असत्पुरुषसेवा** स्त्री० ( **सत्** वि० चांगलें, **सेवा** स्त्री० चाकरी ) दुर्जनसेवा.

**असन्** न० रक्त, रुधिर.

**असह्य** वि० विध्यर्थी धा० सा० **अ+सह्** धातूचें, सहन करण्यास कठीण.

**असार** वि० ( **सार** पु० मुख्यांश ) निस्सार, निरुपयोगी.

**असिधारा** स्त्री० ( **धारा** स्त्री० धार, कड, ) तरवारीची धार.

**असिधाराव्रत** न० तरवारीच्या धारेवर निजण्याप्रमाणें कठीण व्रत.

**असु** पु० प्राण ( ह्या अर्थी हा शब्द बहुवचनांत योजितात, कारण प्राणाचे प्रकार पांच आहेत. )

**असुभङ्ग** पु० प्राणनाश, मृत्यु.

**असूयय** नामसाधित धातु, मत्सर करणें.

**असृज्** न० रक्त.

**अस्त** पु० मावळणें.

**अस्तगिरि** पु० पश्चिमेकडील पर्वत. त्यावर सूर्य, चन्द्र व तारे मावळतात असें म्हणतात.

**अस्थि** न० हाड.

**अहन्** न० दिवस.

**अहरहः** अ० प्रतिदिवशीं.

**अहर्निशम्** क्रि० वि० रात्रंदिवस; न० ( समाहारद्वंद्व ) रात्रंदिवस.

**अहि** पु० साप.

**अहोरात्र** पु० दिवस आणि रात्र.

**अह्नाय** क्रि० वि० अ० सत्वर, लौकर, लागलेंच.

आ.

**आ** अ० मर्यादार्थी.

**आकार** पु० आकृति.

**आकाशवायु** पु० आकाशांतील वारा.

**आक्षेप** पु० निंदा, आळ.

**आख्या** स्त्री० नांव.

**आगामिन्** वि० येणारा.

**आङ्गिरस** पु० अङ्गिरसाचा वंशज.

**आचरित** वि० आचरलेलें, केलेलें; न० आचरण.

**आचार्य** पु० मुंज लावणारा व वेद शिकविणारा गुरु.

**आजि** पु० स्त्री० युद्ध.

**आज्ञप्त** भू० धा० क० आज्ञापिलेला.

**आत्त** वि० ( आ आणि दत्त भू० धा० क० दा देणें ह्या धातूचें ) घेतलेलें.

**आत्मघातक** पु० न० ( आत्मन् आपण आणि घातक नाशक ) आपला नाश करणारा.

**आत्मघातिन्** वि० आत्महत्या करणारा.

**आत्मदमन** न० आत्मसंयमन.

**आत्मभाज्** पु० ज्यास आत्मा आहे असा, मनुष्य.

**आत्मरुचित** वि० आपल्याला आवडलेलें.

**आत्महित** न० ( आत्मन् आपण, हित कल्याण ) आपलें हित.

**आत्मीय** वि० जवळचा, स्वतांचा.

**आदर** पु० लक्ष, मान.

**आदिहेतु** पु० मूलकारण.

**आनन** न० तोंड.

**आनीत** भू० धा० क० आ+नी धातूचें, आणलेला.

**आन्तर** वि० आंतील.

**आप्** पं० ग० प० प० मिळविणें; अव+आप् संपादन करणें.

**आपराह्णिक** वि० दिवसाच्या उत्तरभागासंबंधी.

**आपाण्डुर** वि० पांढरसर.

**आप्त** पु० स्नेही, बरें इच्छिणारा.

**आप्रीत** वि० आप्री ह्या नांवाच्या ऋचा म्हणून ज्यास अभिषेक केला असा.

**आमिष** पु० न० मांस, लालुच.

**आमोद** पु० सुगन्ध.

**आयत्त** वि० आधीन.

**आयास्य** पु० एका ऋषीचें नांव.

**आयुष्काम** पु० दीर्घायुष्य इच्छिणारा.

**आयुस्** न० आयुष्य.

**आराधना** स्त्री० पूजा.

**आराधित** वि० सेविलेला, संतुष्ट केलेला.

**आरूढ** भू० धा० **आ+रुह्** ह्या धातूचें, वर चढलेला.

**आर्त** वि० पीडित, दुःखित.

**आर्द्र** वि० ओलें.

**आर्द्रा** स्त्री० सहावें नक्षत्र.

**आलवाल** न० आळें, वृक्षाभोंवतीं पाण्याकरितां करितात तें.

**आलाप** पु० भाषण.

**आली** स्त्री० ओळ, पंक्ति.

**आविक्षित** पुं० अविक्षिताचा मुलगा.

**आवृत** भू० धा० क० **आ+वृ** धातूचें, आच्छादिलेला, भरलेला.

**आशा** स्त्री० आशा.

**आशिस्** स्त्री० आशीर्वाद.

**आशीविष** पु० साप.

**आस्** द्वि० ग० आ० प० बसणें; **अधि+आस्** बसणें; **उप+आस्** उपासना करणें; **सत्रं+आस्** यज्ञ करणें, अनेक यज्ञ एकामागून एक करणें.

**आसन्** न० तोंड.

**आसन्नमरण** वि० ( **आसन्न** वि० जवळ आलेलें आणि **मरण** न० मृत्यु ) ज्याचा मृत्यु जवळ आला आहे असा.

**आसाद्य** वि० मिळविण्याजोगें.

**आसीन** वि० बसणारा, वर्त० धा० **आस्** धातूचें.

**आस्थान** न० सभास्थान.

**आस्य** न० तोंड.

**आस्वाद** पु० रुचि.

**आहव** पु० युद्ध.

**आहुति** स्त्री० यज्ञसंबंधी बली.

**इ.**

**इ** द्वि० ग० प० प० जाणें; **अभि+इ** जवळ जाणें; **अव+इ** जाणणें; **आ+इ** येणें; **उद्+इ** उदय पावणें, भरभराट होणें; **निर्+इ** बाहेर जाणें; **परि+इ** रूपांतर करणें, प्रदक्षिणा करणें; **व्यति+इ** जाणें; **वि+अप+इ** निराळें होणें; **शरणम्+उप+इ** शरण जाणें; **सम्+इ** एकत्र जमणें.

**इ** प्र० ग० प० प० उप० **उद्**, उदय पावणें.

**इ** द्वि० ग० आ० प० उप० **अधि**, अभ्यास करणें.

**इक्ष्वाकु** पु० सूर्यवंशांतील राजांचा मूळ पुरुष.

**इच्छु** वि० इच्छिणारा.

**इतस्ततः** क्रि० वि० अ० इकडे तिकडे.

**इतिकर्तव्यता** स्त्री० कोणतेंही कृत्य करण्याची रीत.

**इन्द्रादि** ( **इन्द्र** आणि **आदि** प्रथम ) इन्दुप्रमुख, इन्द्र आणि इतर.

**इन्द्रिय** न० सामर्थ्य ( अवयवांचें ).

**इन्द्रियसौष्ठव** न० ( **इन्द्रिय** न० अवयव अ० इन्द्रिय आणि **सौष्ठव** न० सौंदर्य, चांगुलपणा ) इन्द्रियांची यथायोग्य स्थिति.

**इन्द्रियार्थोपसेवन** न० ( **इन्द्रिय** न०; **अर्थ** पु० पदार्थ, **उपसेवन** न० उपभोग ) इन्द्रियांनीं उपभोग्य पदार्थांचा उपभोग.

**इन्दुमती** स्त्री० एका स्त्रीचें नांव.
**इन्ध्** स० ग० आ० प० पेटविणें.
**इष्टद** वि० इच्छित देणारा.
**इष्टदेवता** स्त्री० आराध्य देवता.

## ई.

**ई** च० ग० आ० प० उप० **उद्**, उदय पावणें.
**ईक्ष्** उप० **प्रति**, पाहणें, लक्ष देणें.
**ईड्** द्वि० ग० आ० प० आणि द० ग० स्तुति करणें.
**ईदृश** वि० असें.
**ईर्** प्र० ग० प० प० आणि द० ग० उप० **उद्**, उच्चारणें, बोलणें.
**ईश्** द्वि० ग० आ० प० धनी असणें, अंमल चालविणें.
**ईश्वर** पु० नियमन करणारा.
**ईह्** प्र० ग० आ० प० प्रयत्न करणें.

## उ.

**उ** अव्यय.
**उख्** प्र० ग० प० प० जाणें.
**उग्र** वि० घोर, कडक.
**उग्रम्** क्रि० वि० भयंकरपणें, जोरानें.
**उच्चैः** क्रि० वि० अ० मोठ्यानें.
**उज्झ्** प्र० ग० प० प० फेंकणें, टाकणें.
**उडुप** पु० न० होडी.
**उत्तम** वि० शेवटचा.
**उत्तमफलक** वि० ( **उत्तम** वि० चांगलें, **फल** न० फळ आणि **क** प्रत्यय ) ज्याचें फळ अ० परिणाम चांगलें असें.
**उत्तर** वि० सर्व० वरचें, नंतरचें.
**उत्तरकुरवः** पु० ( बहुवचनान्त ) हिमालयाच्या पलिकडचा प्रदेश ( बहुतकरून आर्य लोकांचें मूलस्थान ).
**उत्तरा** स्त्री० विराट राजाची मुलगी.
**उत्तरीय** न० पांघरावयाचें वस्त्र.
**उत्तान** वि० उताणा.
**उत्पथास्थित** वि० ( **उत्पथ** पु० दुर्मार्ग, **आस्थित** भू० धा० **आ+स्था** धातूचें ) ज्यानें दुर्मार्ग धरिला असा.
**उत्पन्न** वि० उद्भवलेला.
**उत्पल** न० कमल.
**उत्सङ्ग** पु० मांडी.
**उत्सृष्ट** भू० धा० क० **उद्+सृज्** धातूचें, सोडलेला, टाकलेला.
**उदच्** वि० उत्तरेकडील.
**उदन्** न० पाणी.
**उदर** न० पोट, उदर ह्या नांवाचा रोग.
**उदरंभरि** वि० ( **उदर** न० पोट आणि **भृ** भरणें ) उदरभरण करणारा, आपले पोटाकडे ज्याचें लक्ष्य असा.
**उदार** वि० कुलीन, दाता.
**उदुम्बर** पु० उंबराचें झाड, न० त्याचें फळ.
**उद्गम** पु० उगम, वर जाणें.
**उद्गातृ** पु० सामें म्हणणारा ऋत्विज.
**उद्दामवृत्ति** वि० उच्छृंखल स्वभावाचा, अमर्याद, अतिशय.
**उद्दालक** पु० एका पुरुषाचें नांव.
**उद्धत** वि० गर्विष्ठ, मगरूर.

**उद्धतम्** भू० धा० **उद्+हन्** धातूचें, ( क्रियाविशेषणाप्रमाणें योजिलेलें ) गैरसावधपणानें.

**उद्भूतविस्मय** वि० ( **उद्भूत** भू० धा० **उद्+भू** 'उद्भवणें' ह्या धातूचें, उद्भवलेला ) ज्याचे मनांत आश्चर्य उद्भवलेला असा.

**उद्यमभृत्** वि० उद्योग करणारा.

**उन्नति** स्त्री० उच्चपणा, मोठेपणा.

**उन्माद** पु० आनन्द, विकास.

**उपकण्ठ** न० शहराच्या अ० खेड्याच्या जवळची जागा अ० त्याची सीमा.

**उपकार** पु० उपकृति, दुसऱ्याचें बरें करणें.

**उपकारिन्** वि० उपकार करणारा.

**उपकृति** स्त्री० उपकार.

**उपचय** पु० सांठा, संचय.

**उपचित** भू० धा० क० **उप+ चि** धातूचें, जमविलेलें.

**उपजनित** भू० धा० क० प्रयोजक **उप+जन्** धातूचें, उत्पन्न केलेलें.

**उपनयन** } न० मुंज,
**उपनायन** } मौंजीबंधन.

**उपभोग** पु० उपभोग.

**उपयुक्त** वि० उपयोग केलेलें.

**उपरत** वि० मृत.

**उपरि** क्रि० वि० अ० वर. .

**उपरितन** वि० वरचा.

**उपशम** पु० शांति, तृप्ति.

**उपाकृत** वि० आणिलेला.

**उपायन** न० नजराणा, देणगी.

**उपालभ्य** वि० निंद्य.

**उपेत** भू० का० धा० **उप+इ** धातूचें, युक्त, संगत केलेला.

**उभ** वि० सर्व० दोघे.

**उभय** वि० सर्व० दोन्ही बाजूंचे.

**उर्वी** स्त्री० पृथ्वी.

**उलूपी** स्त्री० एका तरुण नागकन्येचें नांव; ही अर्जुनाची बायको झाली होती.

**उशनस्** पु० असुरांच्या उपाध्यायाचें नांव.

**उष्** प्र० ग० प० प० जाळणें.

**उषस्** स्त्री० पहांट, सकाळ, पहांटेची देवता.

**उष्णम्** क्रि० वि० कढत, ऊन.

**उष्णरुचि** पु० सूर्य.

**उष्मन्** पु० उष्णता.

## ऊ.

**ऊर्जित** वि० उत्तम, पुष्ट, बळकट.

**ऊर्ध्व** वि० वरचा, उभा.

## ऋ.

**ऋ** प्र० ग० प० प० जाणें.

**ऋज्** प्र० ग० आ० प० मिळविणें.

**ऋजु** वि० सरळ, उघड.

**ऋण** न० कर्ज.

**ऋत्विज्** पु० यजमान यज्ञांत होमादि क्रिया करण्याकरितां जे ब्राह्मण नेमितो, त्यांपैकीं प्रत्येक.

**ऋभुक्षिन्** पु० इंद्र.

## ए.

**एकदा** क्रि० वि० अ० एकेवेळीं.

**एकमनस्** वि० एका विचाराचे, एकचित्त.

**एकरात्र** न० एक रात्र.
**एकाकिन्** वि० एकटा.
**एकान्त** वि० निश्चित, एकसारखें.
**एकान्तगुण** वि० निश्चित गुणाचा.
**एकान्ततः** क्रि० वि० अ० एकसारखें.
**एकैक** सर्व० वि० एकामागून एक, एकेक, प्रत्येक.
**एतादृश** वि० असा.
**एनस्** न० पाप.

**ऐ.**

**ऐक्ष्वाक** पु० इक्ष्वाकुवंशांतील पुरुष.
**ऐन्द्र** इन्द्रसंबंधी.
**ऐलूष** पु० इलूषाचा पुत्र.

**औ.**

**औषध** न० औषध.

**क.**

**कक्षा** स्त्री० खोली, जागा.
**कङ्कण** न० कांकण.
**कच** पु० केंस.
**कट** पु० चटई.
**कण्व** पु० एका ऋषीचें नांव.
**कतिचित्** सर्व० कित्येक.
**कनक** न० सोनें.
**कन्यका** स्त्री० मुलगी.
**कपाल** पु० न० डोकें, कवटी.
**कपिल** वि० पिंगट.
**कम्** द० ग० आ० प० इच्छिणें, प्रीति करणें.
**करणीय** वि० ( विध्यर्थी ) कर्तव्य, करावयाचें कृत्य.
**करिन्** पु० हत्ती.
**करुण** वि० दुःखकारक, शोककारक.
**करुणापर** वि० दयाळू.
**कर्कोटक** पु० एका सापाचें नांव.
**कर्ण** पु० सूर्याच्या एका मुलाचें नांव.
**कर्मपथ** पु० ( **कर्मन्** न० कृत्य, **पथिन्** पु० मार्ग ) कर्ममार्ग, मोक्षसाधक धर्मसंबंधी कृत्य करण्याचा मार्ग.
**कलत्र** न० भार्या, पत्नी.
**कलह** पु० कज्जा.
**कलहंसक** पु० हंस, एका जातीचें बदक.
**कला** स्त्री० हुन्नर, शिल्प.
**कलाप** पु० समुदाय, गाठोडें.
**कलि** पु० कलियुग, चार युगांपैकीं शेवटचें व पापी असें सांप्रतचें युग; कलिपुरुष.
**कलिङ्ग** पु० ( बहुवचनान्त ) एका देशाचें नांव.
**कल्पान्त** पु० ( **कल्प** पु० जगत्स्थिति, **अन्त** पु० शेवट ) जगत्स्थितीचा शेवट, प्रलय.
**कल्पित** भू० धा० क० **क्लृप्** धातूचें प्रयोजक, कल्पिलेलें, शोधून काढिलेलें.
**कवष** पु० एका पुरुषाचें नांव.
**कविता** स्त्री० कविता.
**कष्ट** वि० दुःखित.
**कष्टं कष्टम्** क्रि० वि० हाय हाय !
**कस्** प्र० ग० प० प० उप० **वि**, विकसणें, उमलणें, जसें—फूल उमलणें.
**काकुत्स्थ** पु० ककुत्स्थवंशांतील पुरुष, राम.

**कात्यायन** पु० एका मोठ्या वैयाकरणाचें नांव.

**कादम्बरी** स्त्री० एका तरुण स्त्रीचें नांव.

**कानन** न० वन, राई.

**काम** पु० इच्छा.

**कामदुह्** वि० इच्छा पूर्ण करणारा.

**कामप्रि** पु० ज्याच्या इच्छा पूर्ण झाल्या आहेत असा.

**काय** पु० शरीर.

**कारय कृ** धातूचें प्रयोजक रूप, करविणें.

**कार्तिक्येकादशी** स्त्री० ( **कार्तिकी** स्त्री० कार्तिकमाससंबंधी, **एकादशी** स्त्री० अकरावी ) कार्तिकाचा अकरावा दिवस.

**कार्पण्य** न० नीचपणा.

**कार्मुक** न० धनुष्य; **अधिज्यकार्मुक** वि० ज्यानें आपले धनुष्यावर दोरी चढविली आहे असा.

**कार्य** वि० केलें जाण्यास योग्य; न० कृत्य.

**कार्यकर** वि० कार्य करणारा ( दुसऱ्याचें ).

**कार्यद्वयाकुल** वि० एके वेळीं दोन कृत्यें करावयाचीं असल्यामुळें गोंधळलेला.

**कालेय** पु० कांहीं दैत्यांचें नांव.

**काव्य** न० कविता, कवन.

**काश** पु० न० एका प्रकारचें पांढरें फूल.

**काष्ठलोष्टसम** वि० ( **काष्ठ** न० लांकूड, **लोष्ट** पु० न० ढेंकूळ, **सम** वि० सारिखा ) लांकूड व ढेंकूळ त्यांसारिखा.

**काहल** पु० ध्वनि.

**किन्नर** पु० देवयोनिविशेष.

**किंस्वित्** काय, कोणती वस्तु.

**कितव** पु० लबाड, धूर्त.

**कियत्** वि० किती.

**किरण** पु० किरण.

**किर्मीर** पु० एका राक्षसाचें नांव.

**किशोरक** पु० पेटा ( सिंहाचा ).

**कीर्ति** स्त्री० लौकिक.

**कीर्तित** उप० **परि** ( **कृत्** द० ग० सांगणें ) वर्णिलेला, सांगितलेला.

**कु** ( नामामागें जोडिलें असतां ) वाईट, दोषयुक्त.

**कुक्कुर** पु० कुत्रा.

**कुटुम्बक** न० पुत्र, कलत्र इत्यादि संबंधीं मनुष्यें.

**कुट्टिम** पु० न० फरसबंदी; **मणिकुट्टिम** स्फटिकांची फरसबंदी.

**कुडव** पु० धान्य मोजण्याचें एक माप.

**कुण्डल** न० कानांतील अलंकार, कुण्डल.

**कुण्डिनपुर** न० एका शहराचें नांव, विदर्भ देशाची अ० वऱ्हाडाची राजधानी.

**कुतूहल** न० आश्चर्य.

**कुमारक** पु० लहान मुलगा.

**कुमुद** न० रात्रीं विकसणारें कमळ.

**कुम्भ** पु० गण्डस्थळ ( हत्तीचें ).

**कुम्भकर्ण** पु० रावणाच्या एका भावाचें नांव.

**कुरुक्षेत्र** न० कौरवांच्या लढाईच्या जागेचें नांव.

**कुल** न० वंश.

**कुलज** वि० ( **कुल** न० वंश, **जन्** धातूचें रूप **ज** उत्पन्न झालेला ) वंशज.

**कुश** पु० व **लव** पु० रामाचे मुलगे.

**कुसुमपुर** न० एका शहराचें नांव.

**कूल** न० तीर, कांठ.

**कृ** अ० ग० उ० प० करणें.

**अङ्गी+कृ** स्वीकारणें;

**अधि+कृ** उद्देश धरणें;

**अधिकृत्य** उद्देशून;

**अप+आ+कृ** दूर करणें;

**अलम्+कृ** भूषित करणें;

**आविस्+कृ** उघड करणें;

**उप+कृ** उपकार करणें;

**तिरस्+कृ** धिक्कारणें,

**नमस्+कृ** नमस्कार करणें;

**नि+कृ** पीडा देणें;

**निस्+आ+कृ** दूर करणें, सोडून देणें.

**प्रति+कृ** सूड उगविणें, अडथळा करणें;

**वशी+कृ** जिंकणें.

**कृ** पं० ग० उ० प० ठार मारणें.

**कृच्छ्रत्रय** न० ( **कृच्छ्र** न० प्रायश्चित्त, **त्रय** तीन ) तीन प्रायश्चित्तें.

**कृत्** ष० ग० प० प० कापणें, तोडणें.

**कृत** } प्रथम व उत्तम असा जगताचा काल.
**कृतयुग** }

**कृतिका** स्त्री० मानिलेली ( मुलगी ).

**कृतिन्** वि० कृतकृत्य, चांगला, गुणवान.

**कृते** अ० करितां, मुळें, सांठीं.

**कृत्स्न** वि० सर्व.

**कृपण** वि० हलकट, अदत्त, हलक्या मनाचा.

**कृपानिधि** पु० ( **कृपा** स्त्री० दया, **निधि** पु० ठेवा ) दयेचा ठेवा, फार दयाळू.

**कृपालु** वि० दयाळू.

**कृश** वि० अशक्त, रोड.

**कृष्** प्र० ग० प० प० ओढणें; **वि+प्र+कृष्** निकृष्ट स्थितीला नेणें.

**कृषि** स्त्री० शेतकी.

**कृष्ण** पु० विष्णूचा आठवा अवतार.

**कृष्णपक्ष** पु० वद्य पक्ष.

**कृष्णवर्मन्** पु० एका पुरुषाचें नांव.

**कृष्णसार** पु० हरिण, काळवीट.

**कृष्णसाहाय्य** न० कृष्णाची मदत.

**कॄ** ष० ग० प० प० पसरणें; **वि+कॄ** विखरणें, पसरणें.

**कॄ** न० ग० उ० प० ठार मारणें, नाश करणें.

**कॄत्** द० ग० प्रसिद्ध करणें, स्तुति करणें, गौरव करणें.

**केयूर** पु० बाहुभूषण.

**केश** पु० केंस.

**केसरिन्** पु० सिंह.

**कैतव** न० कपट.

**कोटि-टी** स्त्री० कोटिसंख्या.

**कोप** पु० राग.

**कोशागर** न० जामदारखाना.

**कौमारक** न० कुमारपणा, बाळपण.

**कौरव** पु० कुरुवंशज.

**क्रन्दित** भू० धा० ( नामासारखें योजिलेलें ) ओरडणें.

**क्रम्** प्र० ग० प० प० आणि च० ग० प० प० चालणें, पाऊल टाकणें; आ० प० लागू होणें; **अति+क्रम्** ओलांडणें, उल्लंघणें; **आ+क्रम्** जवळ जाणें, पादाक्रांत करणें, वर जाणें.

**क्री** न० ग० उ० प० विकत घेणें, सोडविणें, खंडणी देऊन सोडविणें; **वि+क्री** आ० प० विकणें.

**क्रीडाशैल** पु० ( **क्रीडा** स्त्री० करमणूक, **शैल** पु० पर्वत ) क्रीडेकरितां जो पर्वत तो, उच्चस्थल.

**क्रुध्** च० ग० प० प० रागावणें; **अभि+सम्+क्रुध्** रागावणें.

**क्रुश्** प्र० ग० प० प० उप० **वि** आणि **आ**, मोठ्यानें रडणें, शोक करणें.

**क्लम्** प्र० ग० व च० ग० प० प० थकणें, खिन्न होणें.

**क्लान्त** भू० धा० **क्लम्** धातूचें, थकलेला, ग्लान झालेला.

**क्लिद्** च० ग० प० प० ओलें होणें.

**क्लिन्द्** प्र० ग० प० प० शोक करणें.

**क्लिश्** न० ग० प० प० पीडा देणें.

**क्लीब** पु० न० नपुंसक, षंढ.

**क्वथ्** प्र० ग० प० प० उप० **उद्**, कढणें.

**क्षण्, क्षिण्** अ० ग० प० प० जखमी करणें.

**क्षणध्वंसिन्** वि० ( **क्षण** पु० क्षण; **ध्वंसिन्** वि० नाश पावणारा ) क्षणांत नाश पावणारा.

**क्षणिकत्व** न० क्षणिकपणा.

**क्षत** भू० धा० क० **क्षण्** धातूचें, जखमी केलेला.

**क्षम्** च० ग० प० प० क्षमा करणें.

**क्षमिन्** वि० क्षमा करणारा, सहनशील.

**क्षय** पु० नाश, ऱ्हास.

**क्षिति** स्त्री० पृथ्वी, जमीन.

**क्षितीश** पु० ( **क्षिति** स्त्री० पृथिवी ) भूपति, राजा.

**क्षीर** न० दूध.

**क्षुद्** स० ग० उ० प० कुटणें, पीठ करणें.

**क्षुद्र** वि० अल्प, हलकट.

**क्षुभ्** न० ग० प० प० क्षोभणें, खवळणें.

**क्षेत्रदेवता** स्त्री० ( **क्षेत्र** न० शेत, **देवता** स्त्री० ) शेताची देवता.

**क्षै** प्र० ग० प० प० क्षय पावणें.

## ख.

**ख** न० शरीरद्वारें, नाक, तोंड, इ०.

**खड्गकृष्ट** वि० ( **खड्ग** पु० तरवार ) ज्यानें तरवार उपसली आहे असा.

**खलभुजङ्ग** पु० ( **खल** पु० दुष्ट, **भुजङ्ग** पु० साप ) दुष्टरूपी साप.

**खलु** अ० निश्चयार्थी.

**खादिर** वि० खैराच्या झाडाचा.

**खिद्** स० ग० आ० प०, च० ग० आ० प० आणि ष० ग० प० प० दुःखी होणें, खेद पावणें.

**ख्या** द्वि० ग० प० प० सांगणें.

## ग.

**गगनमध्य** पु० न० ( **गगन** न० आकाश, **मध्य** पु० न० मधील भाग ) आकाशाचा मध्य.

**गजघटाशत** न० ( **घटा** स्त्री० समूह, **शत** न शंभर ) गजांचे शंभर समूह.

**गजपुंगव** पु० गजश्रेष्ठ.

**गण्डकी** स्त्री० एका नदीचें नांव, **गण्डकीतीर** न० गण्डकी ह्या नांवाच्या नदीचें तीर.

**गण्डस्थल** न० गंडस्थळ ( हत्तीचें ).

**गतजीवित** वि० मृत.

**गति** स्त्री० चालणें, चालण्याची ढब; आश्रय.

**गद्** प्र० ग० प० प० बोलणें.

**गदा** स्त्री० ह्या नांवाचें आयुध.

**गन्तुकाम** वि० जाण्यास इच्छिणारा.

**गन्धर्वकन्या** स्त्री० गन्धर्वाची मुलगी.

**गभीर** वि० खोल, गंभीर.

**गम्** उप० अभि, हल्ला करणें, **प्रति+उद्+गम्** पुढें-सामोरें जाणें.

**गरुड** पु० गरुडपक्षी; ह्या जातीपैकीं एक विष्णूनें आपलें वाहन केला होता तो.

**गरुडाज्ञा** स्त्री० गरुडाचा ( सर्पवंशाच्या शत्रूचा ) हुकूम.

**गर्भ** पु० गर्भ, गाभ.

**गर्भाष्टम** वि० ( **गर्भ** पु० गाभ, **अष्टम** आठवें ) गर्भधारणेपासून आठवें.

**गर्ह्** प्र० ग० प० प० व द० ग० निन्दा करणें, धिक्कार करणें.

**गल** पु० गळा.

**गलित** भू० धा० **गल्** धातूचें, गळलेलें.

**गहन** वि० प्रवेश होण्यास कठीण; न० अरण्य, झाडी.

**गाण्डीव** न० अर्जुनाच्या धनुष्याचें नांव.

**गात्र** न० शरीर, अवयव.

**गाधोदक** न० ( **गाध** वि० उथळ, **उदक** न० पाणी ) उथळ पाणी.

**गान्धर्व** पु० विवाहाचा एक प्रकार, ह्यांत वर व वधू ह्यांची अनुमति मुख्य असते.

**गार्हपत्य** पु० अग्निहोत्र्यानें सतत ठेवलेला एक पवित्र अग्नि; गृहकृत्यें.

**गिर्** स्त्री० वाणी, वाचा.

**गुण** पु० गुण, फायदा.

**गुप्** प्र० ग० प० प० रक्षण करणें.

**गुप्ति** स्त्री० रक्षण, गुप्तपणा.

**गुरुता** स्त्री० मोठेपणा, प्रताप, शोभा.

**गुर्वी** ( **गुरु** ह्याचें स्त्रीलिंगी रूप ) मोठी, जड.

**गुल्मपाल** पु० ( **गुल्म** पु० किल्ला ) किल्ल्याचा रक्षक.

**गुह्** प्र० ग० उ० प० झांकणें, गुप्त ठेवणें.

**गृध्** च० ग० प० प० हावरेपणा करणें.

**गृह्** प्र० ग० आ० प० निन्दा करणें, धिक्कार करणें.

**गृहदेवता** स्त्री० कुलदेवता.

**गृहमेधिन्** पु० गृहस्थ धर्मानें वागणारा.

**गॄ** ष० ग० प० प० गिळणें; **सम्+गॄ** आ० प० वचन देणें.

**गॄ** न० ग० प० प० उप० **सम्**, बोलणें, उच्चारणें.

**गो** पु० बैल; स्त्री० गाय, वाचा, पृथ्वी.

**गोचर** पु० इन्द्रियविषय, अटोका, ताबा.

**गोमती** स्त्री० एका नदीचें नांव.

**गोरोचना** स्त्री० गोरोचन.

**ग्रन्थ्** न० ग० प० प० एकत्र करणें, रचना करणें.

**ग्रन्थि** स्त्री० गांठ.

**ग्रह्** ( **गृह्** ) न० ग० उ० प० घेणें; **अनु+ग्रह्** आदर–आतिथ्य करणें, कृपा करणें; **नि+ग्रह्** दाबणें, आवरणें; **वि+ग्रह्** युद्ध करणें; **सम्+ग्रह्** सांठा करणें.

**ग्रामणी** पु० गांवांतील पुढारी, पाटील इ०.

**ग्रावन्** पु० दगड.

**ग्लै** प्र० ग० प० प० थकणें, ग्लान होणें.

**ग्लौ** पु० चन्द्र.

## घ

**घण्टिका** स्त्री० लहान घांट.

**घर्म** पु० घाम, उष्णता.

**घर्मज** वि० ( **घर्म** पु० उष्णता ) उष्णतेनें उत्पन्न झालेला.

**घस्** प्र० ग० प० प० खाणें.

**घोर** वि० भयंकर.

**घ्रा** प्र० ग० उप० **उप्**, वास घेणें.

## च.

**चकास्** द्वि० ग० प० प० प्रकाशणें.

**चक्रवद्गति** वि० ( **चक्रवत्** चाकाप्रमाणें ) चाकाप्रमाणें ज्याची गति असें, नेहमीं फिरणारें.

**चक्ष्** द्वि० ग० आ० प० बोलणें; **आ+चक्ष्** सांगणें; **वि+आ+चक्ष्** स्पष्ट करून सांगणें.

**चङ्क्रमण** न० फिरणें.

**चण्डकौशिक** पु० एका ऋषीचें नांव.

**चत्वारः** ( पु० संख्याबोधक प्रथमाबहुवचनांत ) चार.

**चन्दन** पु० न० चन्दनाचें लांकूड.

**चन्दनमञ्जरी** स्त्री० ( **चन्दन** चन्दनाचें झाड, **मञ्जरी** स्त्री० मोहोर ) चन्दनाची मंजरी इ०.

**चन्द्रगुप्त** पु० एका राजाचें नांव.

**चन्द्रापीड** पु० एका राजपुत्राचें नांव.

**चम्** प्र० ग० प० प० पिणें, चाटणें; **आ+चम्** आचमन करणें.

**चम्पकपुष्परेणु** पु० ( **चम्पक** पु० चांफ्याचें झाड, **रेणु** पु० पराग ) चांफ्याच्या फुलांतील पराग.

**चम्पकवन** न० चांफ्याच्या झाडांचा समूह.

**चर्** प्र० ग० प० प० जाणें, फिरणें ( गुप्तपणें ).

**चरणराग** पु० पाय रंगविणें, पायाचा रंग.

**चरम** वि० शेवटचा.

**चरित** भू॰ का॰ धा॰ क॰ **चर्** धातूचें, केलेलें, आचरलेलें.

**चर्चित** भू॰ धा॰ क॰ **चर्च्** धातूचें, लेपलेलें.

**चर्मचक्षुस्** न॰ ( **चर्मन्** न॰ कातडें **चक्षुस्** न॰ डोळा ) कातड्याचा डोळा.

**चल्** उप॰ **प्र** आणि **वि**, दूर करणें, एकीकडे करणें.

**चाटु** पु॰ न॰ संतोषाचें भाषण.

**चाणक्य** पु॰ एका पुरुषाचें नांव.

**चाण्डाल** पु॰ नीच जातीचा मनुष्य.

**चारणस्तुत** वि॰ ( **चारण** पु॰ भाट ) भाटानें स्तविलेला.

**चारुदत्त** पु॰ एका पुरुषाचें नांव.

**चारुसर्वाङ्गी** स्त्री॰ ( **चारु** सुंदर, **सर्वाङ्ग** सर्व अवयव ) सर्व अवयवांनीं सुंदर.

**चार्वङ्गी** स्त्री॰ सुंदर स्त्री.

**चि** पं॰ ग॰ उ॰ प॰ एकत्र करणें, गोळा करणें; **उप+चि** जाड होणें; **निस्+चि** निश्चय करणें; **वि+चि** शोध करणें; **सम्+चि** संचय करणें.

**चित्** द॰ ग॰ आ॰ प॰ जीव असणें, सचेतन असणें.

**चित्रवन** न॰ एका अरण्याचें नांव.

**चित्रालाप** पु॰ ( **चित्र** नानाविध आणि **आलाप** पु॰ संभाषण ) नानाविध विषयांवरील संभाषण.

**चित्रित** वि॰ सुशोभित, चित्रविचित्र केलेलें.

**चिरप्रवृत्त** वि॰ फार दिवसांपासून चालत आलेला.

**चिराद्** क्रि॰ वि॰ अ॰ फार दिवसांनीं, फार वर्षांनीं.

**चूत** पु॰ आम्रवृक्ष; न॰ आम्रवृक्षाचें फळ.

**चूर्ण** पु॰ न॰ पीठ; **चूर्णवत्** पिठाप्रमाणें.

**चेत्** अ॰ जर.

**चेतस्** न॰ मन, अंतःकरण.

**चैत्र** पु॰ हिंदूंच्या वर्षाचा पहिला महिना.

**चैत्ररथ** पु॰ कुबेराची बाग.

## छ.

**छद्** द॰ ग॰ उप॰ **प्र**, आच्छादणें.

**छन्दस्** न॰ वृत्त, छन्द.

**छल** न॰ लबाडी, मिष.

**छादन** न॰ झांकण.

**छिद्** द॰ ग॰ व स॰ ग॰ उ॰ प॰ कापणें, विभागणें, निराळें करणें.

## ज.

**जक्ष्** द्वि॰ ग॰ प॰ प॰ खाणें.

**जगदात्मन्** पु॰ ( **जगत्** न॰ जग, **आत्मन्** पु॰ आत्मा ) जगाचा आत्मा.

**जगन्नाथ** पु॰ ( **जगत्** न॰ त्रैलोक्य, **नाथ** पु॰ धनी ) जगाचा धनी, जगत्पति.

**जगन्नायक** पु॰ ( **जगत्** न॰ जग, **नायक** पु॰ धनी ) जगाचा धनी, जगत्पति.

**जघनार्ध** न॰ ( **जघन** न॰ बांदन, ओटी, **अर्ध** अर्धा भाग ) ओटीचा अर्धा भाग,

**जङ्घा** स्त्री० मांडी.

**जटा** स्त्री० जटा, केशभार.

**जटिल** वि० लेपलेला, मिश्र केलेला.

**जड** वि० अचेतन, निर्जीव.

**जन्** उप० **सम्**, उत्पन्न होणें, भरभराटींत असणें.

**जनमेजय** पु० परिक्षिताचा मुलगा, अर्जुनाचा पणतू.

**जनय** ( **जन्** धातूचें प्रयोजक रूप ) उत्पन्न करणें; **जनयितुम्** अ० उत्पन्न करण्यास.

**जनार्दन** पु० कृष्ण.

**जन्तु** पु० प्राणी.

**जन्मभाज्** वि० जन्मलेला; पु० पुरुष.

**जन्मान्तर** न० ( **अन्यज्जन्म जन्मान्तरम्** ) दुसरा जन्म.

**जप्** प्र० ग० प० प० जप करणें, हळूच उच्चारणें ( जशी ईश्वरप्रार्थना ).

**जम्बुमालिन्** पु० एका राक्षसाचें नांव.

**जय** पु० जय, सिद्धि.

**जयावह** वि० जय करणारा.

**जागृ** द्वि० ग० प० प० जागें असणें.

**जाड्य** न० जडपणा.

**जात** न० समुदाय.

**जातकर्मन्** न० उत्पत्तिकाळीं संस्कार करितात तो.

**जातवेदस्** पु० अग्नि.

**जानंतपि** पु० जनंतपाचा मुलगा.

**जानु** पु० गुडघा.

**जाया** स्त्री० भार्या, पत्नी.

**जाह्नवी** स्त्री० भागीरथी.

**जीवन** न० उपजीविका.

**जीवनाशा** स्त्री० ( **जीवन** न० जगणें, **आशा** स्त्री० इच्छा, आशा ) जगण्याची इच्छा.

**जीवलोक** पु० प्राण्यांचा लोक, मृत्युलोक.

**जीवित** न० जीव.

**जीवितलघूकृत** वि० जगण्यानें जिचा बदलौकिक केला अशी.

**जृम्भ्** प्र० ग० आ० प० उप० **सम्** व **उद्**, यत्न करणें, शेवटास नेणें.

**जॄ** प्र० ग०, च० ग० आणि न० ग० प० प० व द० ग० वृद्ध होणें, जीर्ण होणें, झिजणें.

**जैन** पु० जिनमतानुयायी, जैन लोकांतील.

**ज्ञा** ( **जा** ) न० ग० उ० प० जाणणें; **अनु+ज्ञा** परवानगी देणें; **अभि+ज्ञा** ओळखणें.

**ज्ञानमार्ग** पु० ( **ज्ञान** न० ज्ञान, **मार्ग** पु० रस्ता ) ईश्वरज्ञानानें मोक्ष मिळविण्याचा मार्ग.

**ज्वल्** प्र० ग० प० प० पेटणें, जळणें, दीप्तिमान् होणें.

## त.

**तक्ष्** प्र० ग० प० प० तासणें; **सम्+तक्ष्** कापून तुकडे करणें, जखमी करणें, निर्भर्त्सना करणें.

**तट** ( तिन्ही लिंगी नाम ) तीर, कांठ.

**तत** पु० एखाद्या नातलगाचें लाडकें नांव. ( मूल अ० बाप ).

**तत्त्ववेदिन्** वि० तत्त्व अ० खरें जाणणारा.

**तदीय** वि० तत्संबंधी.
**तद्वत्** क्रि० वि० अ० त्याप्रमाणें.
**तद्विषयक** वि० त्याविषयींचें.
**तन्** अ० ग० उ० प० पसरणें, यज्ञ करणें; **प्र+तन्** पसरणें.
**तनय** पु० पुत्र.
**तनु, तनू** स्त्री० शरीर.
**तन्तु** पु० दोरा.
**तन्त्री** स्त्री० वीणा.
**तन्द्रय** ( साधित **तन्द्रा** स्त्री० सुस्ती ह्यापासून ) सुस्त होणें.
**तन्मध्ये** ( **तद्+मध्ये** ) त्याच्यामध्यें.
**तप्** प्र० ग० प० प० तप करणें.
**तप्** च० ग० आ० प० उप० **सम्**, दुःखी होणें.
**तपन** पु० जुलमी.
**तपोधन** पु० तप हीच ज्याची संपत्ति असा ऋषी.
**तम्** च० ग० प० प० दुःखी होणें, ग्लान होणें.
**तरी** स्त्री० नाव.
**तर्ज्** प्र० ग० प० प० व द० ग० आ० प० निर्भर्त्सना करणें, धाक दाखविणें.
**तादृश्** वि० त्यासारिखा.
**ताप** पु० उष्णता.
**ताय्** प्र० ग० आ० प० पसरणें.
**तार** न० उंच स्वर; वि० कर्कश.
**तावत्कालम्** क्रि० वि० तोंपर्यंत.
**तावद्** क्रि० वि० तोंपर्यंत, तितक्यांत.
**तिग्म** वि० तीक्ष्ण.
**तिथि** स्त्री० महिन्यापैकीं एक दिवस.
**तिमिर** पु० न० अन्धकार.
**तिर्यच्** पु० हलक्या योनींतील प्राणी; वि० आडवें.
**तीर्थोदक** न० ( **तीर्थ** न० पवित्र पदार्थ, जसा नदी, **उदक** न० पाणी ) पवित्र उदक.
**तुमुल** वि० निकराचें, भयंकर.
**तुरग** पु० घोडा.
**तुरासाह्** पु० इन्द्राचें नांव.
**तूर्णम्** क्रि० वि० सत्वर.
**तृणराजफल** न० ( **तृणराज** पु० तालवृक्ष ) ताल वृक्षाचें फळ.
**तृप्** च० ग० प० प० संतुष्ट होणें.
**तृष्** च० ग० प० प० तान्हेलें होणें.
**तृष्णा** स्त्री० तहान, लोभीपणा.
**तृह्** स० ग० प० प० ठार मारणें, नाश करणें.
**तेजस्विन्** वि० प्रकाशमान, आपल्या कलानें वागणारा.
**तोय** न० पाणी.
**त्याग** पु० दान.
**त्रय** न० तिहींचा समुदाय.
**त्रस्** प्र० ग० व च० ग० प० प० भिणें, भयानें कांपणें; **सम्+त्रस्** भिणें.
**त्राण** न० रक्षण.
**त्रिः** क्रि० वि० अ० तीनदां.
**त्रिवर्ग** पु० तीन वस्तूंचा समूह म्ह० **धर्म** पु० वेदादिकांत सांगितलेलें कृत्य, **अर्थ** पु० संपत्ति, **काम** पु० इच्छा, ह्या तीन पुरुषार्थांचा समूह.

**त्रिविष्टपास्थान** न० ( **त्रिविष्टप** न० स्वर्ग, **आस्थान** न० सभा ) स्वर्गांतील सभा, देवांची सभा.

**त्रुद्** च० ग० व ष० ग० प० प० कट्कन् मोडणें, तुटणें.

**त्रेता** स्त्री० त्रेतायुग.

**त्रैलोक्य** न० तीन लोक.

**त्र्यम्बक** पु० शिव.

**त्विष्** स्त्री० उजेड, तेज.

## द.

**दंश्** प्र० ग० प० प० व द० ग० आ० प० डसणें, नांगी मारणें.

**दंष्ट्रा** स्त्री० दाढ.

**दंष्ट्रिन्** पु० तीक्ष्ण दाढेचा प्राणी, साप.

**दक्षिण** वि० सर्व० दक्षिणेकडील.

**दक्षिणीय** वि० दक्षिणा घेण्यास योग्य.

**दत्** पु० दांत.

**दत्त्वा** ( भू० धा० अ० **दा** देणें ह्या धातूचें ) देऊन.

**दद्** प्र० ग० आ० प० देणें.

**ददत्** वर्त० धा० **दा** देणें ह्या धातूचें.

**दधि** न० दहीं.

**दन्त** पु० दांत.

**दन्दशूक** पु० साप.

**दमयन्ती** स्त्री० एका स्त्रीचें नांव, नळाची बायको.

**दम्पती** पु० ( द्विवचनान्त ) नवरा-बायको, जोडपें.

**दम्भ** पु० ढोंग.

**दय्** प्र० ग० आ० प० दया करणें.

**दयालुत्व** न० दयाळूपणा.



**दरिद्र** वि० गरीब, दरिद्री.

**दरिद्रा** द्वि० ग० प० प० गरीब होणें.

**दर्प** पु० गर्व.

**दल्** प्र० ग० प० प० फोडणें, फाडणें.

**दशन** पु० दांत.

**दशम** वि० दहावा.

**दशा** स्त्री० स्थिति.

**दह्** प्र० ग० प० प० जाळणें.

**दा** तृ० ग० उ० प० देणें.

**दा** द्वि० ग० प० प० कापणें.

**दानव** पु० असुर.

**दारक** पु० मुलगा.

**दाव** पु० दावानल, वणवा, अरण्य.

**दाशरथि** पु० दशरथाचा पुत्र.

**दिगन्त** पु० दिशांचा शेवट, चोहों-कडचे देश.

**दिग्विजय** पु० ( **दिश्** स्त्री० दिशा, **विजय** पु० जिंकणें ) सर्व दिशा अ० देश जिंकणें.

**दिदृक्षु** वि० पाहण्यास इच्छिणारा.

**दिनेदिने** क्रि० वि० प्रतिदिवशीं.

**दिव्** स्त्री० दिवस, स्वर्ग.

**दिवा** क्रि० वि० अ० दिवसास.

**दिव्य** वि० स्वर्गसंबंधी, सुंदर.

**दिव्याश्रमपद** न० ( **दिव्य** सुंदर, **आश्रमपद** न० मठ ) सुंदर मठ.

**दिश्** स्त्री० दिशा.

**दिह्** द्वि० ग० उ० प० लेपणें, सारविणें.

**दीक्ष्** प्र० ग० आ० प० दीक्षा घेऊन यज्ञ करण्यास योग्य होणें.

**दीन** वि० गरीब, दुःखी, गरजू.

**दीनबन्धु** पु० ( **दीन** पु० गरीब, अनाथ; **बन्धु** पु० भाऊ ) गरि-बांचा बंधु.

**दीनार** पु० एक विशेष नाणें (रोमन).
**दीप्** च० ग० आ० प० प्रकाशणें.
**दीपक** वि० प्रकाशणारें.
**दीप्ति** स्त्री० प्रभा, कान्ति.
**दीर्घम्** क्रि० वि० फार वेळ, मोठ्यानें.
**दु** पं० ग० प० प० पीडा देणें, त्रास देणें, दुःख देणें.
**दुःखपीडित** वि० दुःखानें गांजलेली.
**दुःखभाज्** वि० दुःख भोगणारा.
**दुःखसंताप** पु० ( **दुःख, संताप** पु० दाह ) दुःखापासून होणारा दाह, मनोव्यथा.
**दुःखित** वि० दुःखी, पीडित.
**दुग्ध** न० दूध.
**दुरन्त** वि० ज्याचा अंत लागणें कठीण असा, अमर्याद.
**दुराप** वि० मिळविण्यास कठीण.
**दुरुक्त** न० दुर्भाषण, नीट न उच्चारलेले शब्द.
**दुर्ग** न० जाण्यास कठीण असें स्थान.
**दुर्गत** वि० दुःखी, विपद्ग्रस्त.
**दुर्दम** वि० आकळण्यास अ० पराजय करण्यास कठीण.
**दुर्धर्ष** वि० अप्राप्य, अगम्य.
**दुर्नीत** न० दुराचरण.
**दुर्बुद्ध** वि० समजण्यास कठीण, दुर्बोध.
**दुर्मुख** वि० ज्याचें तोंड वाईट असा, दुर्भाषण करणारा.
**दुर्योधनभीमसेनौ** पु० (द्विवचनान्त) दुर्योधन व भीम.
**दुर्विदग्ध** वि० व्यर्थ विद्वत्तेचा गर्व करणारा.
**दुर्विनीत** वि० वाईट चालीचा.
**दुष्कृत** न० दुष्कृत्य, दुष्टपणा, पाप.
**दुष्ट** वि० दुर्जन.
**दुस्तर** वि० उल्लंघण्यास कठीण, दुर्लंघ्य.
**दुह्** द्वि० ग० उ० प० दूध काढणें.
**दू** च० ग० आ० प० दुःखित होणें.
**दृ** ष० ग० आ० प० उप० **आ,** आदर करणें, लक्ष्य देणें.
**दृढ** वि० मजबूत.
**दृप्** च० ग० प० प० गर्विष्ठ होणें.
**दृश्** स्त्री० दृष्टि, डोळा.
**दॄ** न० ग० प० फाडणें, विदारण करणें.
**देव** वि० प्रकाशणारा.
**देवकी** स्त्री० कृष्णाची आई.
**देवक्षेत्र** न० देवभूमी.
**देवता** स्त्री० देवता.
**देवशुनी** स्त्री० देवांची कुत्री.
**देवेज्** वि० देवपूजक.
**देश** पु० देश.
**देहिन्** वि० शरीरी; पु० मनुष्य.
**दै** प्र० ग० प० प० उप० **अव,** स्वच्छ करणें.
**दो** च० ग० प० प० उप० **अव,** कापणें, तोडणें.
**दोष** पु० दोष, आळ.
**दोषन्** पु० न० बाहु.
**दोहनकाल** पु० ( **दोहन** न० दोहणें, **काल** पु० वेळ ) दूध काढण्याची वेळ
**दौर्बल्य** न० दुर्बळपणा.
**दौर्मन्त्र्य** न० दुष्ट मसलत.

**द्युति** स्त्री० कान्ति, वर्ण.
**द्युम्न** न० द्रव्य.
**द्यो** स्त्री० स्वर्ग.
**द्रविण** न० संपत्ति, पैका.
**द्रव्य** न० पदार्थ, वस्तु.
**द्रु** प्र० ग० प० प० धांवणें.
**द्रोण** पु० एका व्यक्तीचें नांव.
**द्वय** न० दोन वस्तूंचा समुदाय.
**द्वयी** स्त्री० दोन प्रकारची.
**द्वाःस्थ** वि० द्वारपाळ.
**द्वापर** पु० द्वापारयुग.
**द्वार** न० दार, दरवाजा.
**द्वारपाल** पु० द्वारपाळ.
**द्विगुण** वि० दुप्पट.
**द्विजन्मन्** पु० ( **द्वि** दोन, **जन्मन्** न० उत्पत्ति ) दोन जन्म ज्यास आहेत असा; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य.
**द्विजिह्व** पु० ( **जिह्वा** स्त्री० जीभ ) ज्याला दोन जिभा आहेत असा; साप.
**द्विजोत्तम** पु० ब्राह्मणश्रेष्ठ.
**द्विष्** द्वि० ग० उ० प० द्वेष करणें.
**द्विष्** पु० शत्रु.

**ध.**

**धनाशा** स्त्री० द्रव्याची इच्छा.
**धनुर्ज्या** स्त्री० ( **ज्या** स्त्री० दोरी धनुष्याची ) धनुष्याची दोरी.
**धमनी** स्त्री० नळी, फुंकणी.
**धराधिप** पु० ( **धरा** स्त्री० पृथ्वी, **अधिप** पु० धनी ) पृथ्वीचा धनी, राजा.
**धरित्री** स्त्री० पृथ्वी.
**धर्मदूषण** वि० योग्य रीत सोडून वागणारा.
**धर्मषष्ठांशभाग** पु० पुण्याचा सहावा वांटा.
**धर्मसूत्रकार** पु० ( **धर्म** पु० श्रुति, स्मृति इत्यादिकांत सांगितलेलें कृत्य; **सूत्र** न० नियम ) धर्मसंबंधी नियम बांधणारा.
**धा** तृ० ग० उ० प० धरणें, ठेवणें; **अन्तर्+धा** गुप्त होणें; **अपि** अ० **पि+धा** बंद करणें; **अव+धा** लक्ष्य देणें; **उप+सम्+धा** जोडणें, मिळविणें; **नि+धा** ठेवणें; **परि+धा** पांघरणें, घालणें ( अलंकार ); **पुरस्+धा** कुलोपाध्याय करणें; **वि+धा** करणें, हुकूम करणें ( धर्मसंबंधी पुस्तकांतील एखादें कृत्य करण्याविषयीं ); **सम्+धा** तह करणें, ठेवणें, बळकट बसविणें.
**धात्री** स्त्री० दाई.
**धामन्** न० तेज, प्रभाव.
**धारा** स्त्री० धार पाण्याची, कड.
**धि** ष० ग० प० प० उप० **सम्**, तह करणें.
**धिक्** अ० धिक्कारार्थी.
**धी** स्त्री० बुद्धि.
**धीवर** पु० मासे धरणारा.
**धु** अ० **धू** पं० ग० उ० प० हालविणें.
**धुर्** स्त्री० धुर, जोकड.
**धू** प्र० व न० ग० उ० प० आणि ष० ग० प० प० हालविणें.
**धू** ( **धून्** ) द० ग० उप० **वि**, हालविणें.

**धूप्** प्र० ग० प० प० तापविणें.

**धूप** पु० धूप.

**धूर्त** पु० लबाड मनुष्य.

**धूसर** वि० धुरकट.

**धृ** द० ग० अथवा प्रयोजक उप० **अव**, निश्चित जाणणें, निश्चय करणें

**धृ** उप० **उद्**, उद्धार करणें, वर काढणें, तारणें.

**धृष्** पं० ग० प० प० धजणें, धिक्कार करणें.

**धे** प्र० ग० प० प० स्तनपान करणें, पिणें.

**धैर्यधन** वि० धैर्य हेंच ज्याचें धन असा.

**ध्मा** प्र० ग० प० प० फुंकणें, वाजविणें.

**ध्यै** प्र० ग० प० प० विचार करणें; **अनु+ध्यै** चिन्तन करणें.

**ध्रुवम्** क्रि० वि० निश्चयानें.

**ध्वन्** प्र० ग० प० प० ध्वनि करणें.

न.

**नक्र** पु० मगर.

**नगेन्द्र** पु० पर्वतश्रेष्ठ, हिमालय.

**नद्** प्र० ग० प० प० ध्वनि करणें, गर्जना करणें.

**नन्द्** उप० **अभि**, अभिनंदन करणें.

**नन्द** पु० एका राजवंशाचें नांव, त्यांतील एक व्यक्ति.

**नम्र** वि० लीन, गरीब.

**नरक** पु० नरक, निरय.

**नरेन्द्र** पु० राजा.

**नर्मदा** स्त्री० एका नदीचें नांव.

**नलतुल्याकृति** वि० (**नल** पु०, **तुल्य** वि० सारखी, **आकृति** स्त्री० आकार) नलासारखी ज्याची आकृति असा.

**नलरूपधारिन्** वि० (**नल**, **रूप** न० आकार आणि **धारिन्** वि० धरणारा, घेणारा) ज्यानें नलाचें रूप घेतलें आहे असा.

**नलिनी** स्त्री० कमलाची वेल.

**नवमी** स्त्री० पंधरवड्यांतील नववी तिथी.

**नवीन** वि० नवें.

**नश्** उप० **वि**, नाश पावणें.

**नश्वर** वि० नाहींसें होणारें.

**नस्** स्त्री० नाक.

**नह्** च० ग० उ० प० उप० **सम्**, तयार होणें, सिद्ध होणें.

**नाना** अ० भिन्न, अनेक.

**नारद** पु० एका ऋषीचें नांव.

**नारायण** पु० विष्णु.

**निःशान** वर्त० धा० **शो** (द्वि० ग० आ० प० वैदिक) धातूचें, उप० **निस्**, धार लावीत.

**निःशुक्र** वि० शक्तिहीन.

**निश्रेयस** न० मोक्ष.

**निज्** तृ० ग० उ० प० शुद्ध करणें; **अव+निज्** धुणें.

**निज** वि० स्वकीय.

**निञ्** द्वि० ग० आ० प० उप० **प्र**, धुणें.

**नितराम्** क्रि० वि० अ० अत्यंत.

**नित्य** वि० निरंतरचें.

**नित्यकर्मन्** न० धर्मसंबंधी नित्यकर्म.
**निदाघ** पु० ग्रीष्म ऋतु, उन्हाळा.
**निधन** न० मरण, नाश.
**निनाद** पु० ध्वनि, गोंगाट.
**निन्दित** भू० धा० क० **निन्द्** धातूचें, दूषित, दोषार्ह.
**निपद्यमान** वर्त० धा० **नि+पद्** धातूचें; पडून राहणारा.
**निबिड** वि० दाट, घन.
**नियतम्** क्रि० वि० निश्चयानें.
**नियति** स्त्री० दैव.
**नियोक्तृ** पु० बांधणारा.
**नियोगिन्** पु० कामदार, प्रधान.
**निरर्थक** वि० व्यर्थ, निष्फल.
**निरन्तरम्** क्रि० वि० एकसारखें.
**निरभिभवसार** वि० अपमानाचा शब्द जींत नाहीं अशी, सन्मानाची ( गोष्ट ).
**निरय** पु० नरक.
**निरस्त** भू० धा० क० **निर्+अस्** 'फेंकणें' ह्या धातूचें, पसरलेला, दूर केलेला.
**निराहार** वि० उपवासी.
**निर्घृणता** स्त्री० निर्दयपणा.
**निर्जन** वि० ओसाड, जनरहित.
**निर्जर** पु० देव.
**निर्दय** वि० दयाहीन, दुष्ट.
**निर्दश** वि० ज्यास जन्मून दहा दिवस झाले आहेत असें ( मूल ).
**निर्धन** वि० द्रव्यहीन, गरीब.
**निर्भर** वि० भरलेला, पूर्ण.
**निर्व्याजता** स्त्री० खरेपणा.
**निवर्तन** न० परतणें.
**निशा** स्त्री० रात्र.
**निषधेश्वर** पु० निषध देशाचा राजा.
**निष्ठाशून्य** वि० ( **निष्ठा** स्त्री० स्थिरता, **शून्य** वि० रहित ) स्थिरतारहित, चंचल.
**निष्फलता** स्त्री० व्यर्थता.
**निसर्ग** पु० स्वभाव.
**नी** उप० **उप**, उपनयन करणें, मुंज करणें.
**नीच** वि० अधम, खालचा.
**नीचग** वि० नीच मनुष्याकडे जाणारी, उतरत्या स्थळाकडे वाहणारी.
**नीचैः** क्रि० वि० अ० खालीं.
**नीतिनिपुण** वि० ( **नीति** स्त्री० राजनीति अ० शहाणपण, निपुण वि० निष्णात) राजनीतींत निष्णात, उत्तम शहाणा.
**नु** द्वि० ग० प० प० स्तुति करणें.
**नु** अ० संशयार्थी, अनुमानार्थी.
**नूनम्** अ० निश्चयानें.
**नूपुर** पु० तोरड्या, पैंजण.
**नृषद्वर** वि० मनुष्यांत राहणारा, एका जागीं स्थिर केलेला.
**नेमि** स्त्री० चाकाची धांव, चाकाचा घेर.
**नैपुण्य** न० युक्ति, कौशल्य.
**नैषध** पु० निषध देशाचा राजा, नल.
**न्यायप्रवृत्त** वि० ( **न्याय** पु० नीति, **प्रवृत्त** भू० धा० **प्र+वृत्** धातूचें ) नीतीनें वागणारा, न्यायी.
**न्यायवादिन्** वि० ( **न्याय** पु० नीति ) योग्य असेल तें बोलणारा.

**न्याय्य** वि० योग्य.

**प.**

**पङ्क्ति** स्त्री० ओळ.

**पञ्च** ( प्रथमेचें व द्वितीयेचें बहुवचन) पांच.

**पठ्** प्र० ग० प० प० म्हणणें, वाचणें.

**पठ्यमान** ( वर्त० धा० क० **पठ्** म्हणणें अ० वाचणें ह्या धातूचें ) पठण केलें जात आहे असें.

**पण्** प्र० ग० स्तुति करणें; पणाला लावणें, क्रयविक्रय करणें.

**पत्** उप० **अभि**, उडी मारून जवळ जाणें; **प्र+उद्+पत्** उडणें.

**पतङ्गवत्** क्रि० वि० अ० पतंग-पक्ष्याप्रमाणें.

**पतञ्जलि** पु० महाभाष्य ह्या नांवाचा व्याकरणसंबंधीं मोठा ग्रंथ करणारा.

**पतन** न० पडणें, भ्रष्टता, नाश.

**पति** पु० धनी, नवरा.

**पतित** वि० पापी, धर्मभ्रष्ट.

**पथः** ( **पथिन्** पु० ह्याचें पंचमीचें एकवचन ) मार्गापासून.

**पथिन्** पु० मार्ग.

**पथ्य** न० हितकारक.

**पद्** च० ग० आ० प० गळणें, पडणें; **प्रति+पद्** जाणणें, स्वीकारणें, करणें, संपादन करणें, अभ्यास करणें; **सम्+पद्** एकंदर–मिळून होणें; **प्रति+पद्** ( प्रयोजक ) विचार करणें, पुढें करणें, सिद्ध करणें, देणें; **सम्+पद्** (प्रयोजक) ठरविणें.

**पद्** पु० पाऊल.

**पद्** न० पाउलाचा उठलेला ठसा.

**पद्वी** स्त्री० रस्ता, मार्ग.

**पदार्थ** पु० वस्तु.

**पद्धति** स्त्री० रस्ता.

**पद्म** न० दिवसास फुलणारें कमळ.

**पन्** प्र० ग० स्तुति करणें.

**पपी** पु० सूर्य, रक्षक.

**पर** वि० सर्व० दुसरा, इतर, अन्य पंथाचा.

**परंपरा** स्त्री० ओळ, परंपरा.

**परम्** अ० परंतु.

**परमेश्वर** पु० जगन्नियंता, देव.

**परमेष्ठिन्** पु० ब्रह्मदेव.

**परायण** न० आसक्ति.

**परार्थघटक** वि० दुसऱ्याचें कार्य जमवून आणणारा.

**परासु** वि० मृत.

**परिक्षित्** पु० अभिमन्यूचा मुलगा आणि अर्जुनाचा नातू.

**परिचर्या** स्त्री० सेवा, आराधना.

**परिचारक** पु० सेवक.

**परिजन** पु० चाकर.

**परिणत** वि० जुना, परिणामाला आलेला.

**परित्यक्त** भू० धा० क० **त्यज्** धातूचें उप० **परि**, टाकलेला, सोडलेला.

**परित्याज्य** विध्यर्थी वि० **परि+त्यज्** धातूचें, टाकण्यास योग्य.

**परिपन्थिन्** वि० आडवा येणारा; **तत्परिपन्थिनी** स्त्री० तिला आडवी येणारी.

**परिपाक** पु० पक्वदशा, पक्व होणें.

**परिप्लुष्ट** भू० धा० **परि+प्लुष्** धातूचें, जळलेला, भाजलेला.

**परिभ्रष्ट** भू० धा० **परिभ्रंश्** धातूचें, मुकलेला, भ्रष्ट झालेला.

**परिवर्तन** न० बदल.

**परिवर्तिन्** वि० बदलणारा.

**परिवार** पु० लवाजिमा.

**परिवृढ** पु० स्वामी, धनी.

**परिवेष्टृ** पु० अन्न वाढणारा.

**परिव्राज्** पु० संन्यासी.

**परिष्वङ्ग** पु० आलिंगन.

**परिसमाप्ति** स्त्री० शेवट, पूर्णता.

**परिताप** पु० दुःख, पीडा.

**परोपकार** पु० दुसऱ्याचें बरें करणें.

**पर्जन्य** पु० पाऊस.

**पर्यग्निकृत** वि० ज्याच्या सभोंवतीं अग्नि फिरविला असा. यज्ञांत पशु मारण्यापूर्वी त्या भोंवतीं अग्नि फिरवितात.

**पर्याप्तम्** क्रि० वि० पुरेसें, पाहिजे तितकें.

**पर्वत** पु० एका ऋषीचें नांव.

**पलायमान** (वर्त० का० धा० **परा+अय्** धातूचें प्र० ग० आ०प० जाणें, **परा** ह्यांतील **रा** ह्या अक्षराला **ला** असा आदेश होतो ) पळणारा.

**पलाश** पु० पळसाचें झाड.

**पल्लव** पु० न० कोंवळें पान.

**पा** द्वि० ग० प० प० रक्षण करणें, पालन करणें.

**पात** पु० पडणें, पतन.

**पातित** ( भू० धा० क० **पत्** धातूचें प्रयोजक ) पाडलेला, टाकलेला.

**पात्र** न० योग्य ( दानास ).

**पान्थ** पु० प्रवासी, वाटसरू, पथिक.

**पापकृत्** वि० (**पाप** न० पातक, **कृत्** केलेला ) ज्यानें पाप केलें आहे असा, पापी.

**पापहर** वि० पाप दूर करणारा.

**पारयिष्णुतम** वि० कोणतेंहि कृत्य उत्तम रीतीनें सिद्धीस नेण्यास समर्थ.

**पारिक्षित** पु० परिक्षिताचा मुलगा.

**पार्थ** पु० पृथेचा मुलगा.

**पावक** पु० अग्नि.

**पावन** वि० पवित्र करणारें, पवित्र.

**पाश** पु० जाळें, फांस.

**पिञ्जर** पु० न० कुंकूं.

**पिण्डद** वि० पिण्ड देणारा.

**पिण्डालक्तक** पु० तांबडा रंग.

**पिनाकिन्** पु० शिव.

**पिशुन** पु० दुष्ट.

**पिशुनता** स्त्री० दुष्टता.

**पिष्** स० ग० प० प० पीठ करणें, दळणें.

**पीडाकर** वि० दुःख देणारें.

**पीयूष** न० अमृत.

**पुंस्** पु० पुरुष.

**पुण्डरीक** पु० एका पुरुषाचें नांव; न० कमल.

**पुण्यकृत्** वि० पुण्यवान.

**पुण्यपुरुष** पु० सदाचारी मनुष्य.

**पुनरुक्तभूत** वि० ( **पुनरुक्त** पुनः सांगितलेलें अ० सांगणें, **भूत** झालेलें ) पुनः सांगितल्याप्रमाणें झालेलें.

**पुनर्भू** स्त्री० पुनर्विवाह झालेली विधवा.
**पुर्** स्त्री० शहर.
**पुरद्वार** न० नगराचें दार, वेस.
**पुरंधि** पु० एका देवतेचें नांव.
**पुरस्** क्रि० वि० अ० पुढें.
**पुरस्तात्** क्रि० वि० अ० पुढें.
**पुरोधस्** पु० उपाध्याय.
**पुरोहित** पु० उपाध्याय.
**पुष्** न० ग० प० प० पोषण करणें.
**पुष्कर** पु० एका पुरुषाचें नांव.
**पुष्टि** स्त्री० पोषण.
**पुष्पमित्र** पु० एका राजाचें नांव.
**पुष्पस्रज्** स्त्री० ( **पुष्प** न० आणि **स्रज्** स्त्री० माळ ) फुलांची माळ.
**पुष्पिणी** स्त्री० पुष्पयुक्त.
**पू** न० ग० उ० प० पवित्र करणें.
**पूर्ण** भू० धा० क० **पॄ** धातूचें, भरलेलें.
**पूर्णपात्र** न० उत्साहप्रसंगीं चाकरांस व इतरांस देणगी देतात ती.
**पूर्व** वि० सर्व० पूर्वीचें, पूर्वेकडील.
**पूर्वरात्र** पु० ( **पूर्व** पूर्वीचा, **रात्रि** स्त्री० रात्र ) रात्रीचा पहिला भाग.
**पूर्वाह्ण** पु० दिवसाचा पहिला भाग.
**पृ** अ० **पॄ** तृ० ग० प० प० भरणें.
**पृच्** प्र० व स० ग० प० प०, द्वि० ग० आ० प० आणि द० ग०, उप० **सम्** , संगति करणें, संबंध ठेवणें.
**पृत्** स्त्री० सेना.
**पृथग्जन** पु० हलकट मनुष्य.
**पृथु** वि० मोठें.
**पॄ** तृ० ग० व न० ग० प० प० भरणें.

**पौराणिक** पु० पुराण सांगणारा.
**पौरुष** न० पराक्रम.
**पौर्णमासी** स्त्री० पौर्णिमा.
**प्रकृति** स्त्री० प्रजा; प्रधानादि कामदार; स्वभाव.
**प्रकृष्ट** वि० उत्कृष्ट, मोठें.
**प्रचण्ड** वि० उग्र, तीक्ष्ण.
**प्रचार** पु० प्रघात.
**प्रच्युत** भू० धा० **प्र+च्यु** पडणें ह्या धातूचें.
**प्रजापति** पु० ब्रह्मदेव.
**प्रजापशुकाम** ( **प्रजा** स्त्री० संतति, **पशु** पु० गाई, म्हशी इ०, **काम** पु० इच्छा ) संतति आणि गाई, म्हशी ह्यांची इच्छा करणारा.
**प्रजापीडनज** वि० ( **प्रजा** स्त्री० रयत, **पीडन** न० जुलूम, आणि **जन्** धातूचें **ज** उत्पन्न होणारा ) रयतेवर जुलूम केल्यानें उत्पन्न होणारा.
**प्रणिहित** भू० धा० क० **प्र+नि+धा** धातूचें, ठेवलेलें; **सम्यक्प्रणिहित** व्यवस्थित ठेवलेलें, चांगल्या दाबांत ठेविलेलें.
**प्रतापनिधि** पु० ( **प्रताप** पु० उष्णता ) उष्णतेचा सांठा.
**प्रतिकार** } **प्रतीकार** } पु० पीडा दूर करण्याचा इलाज, उपाय.
**प्रतिनिविष्ट** वि० स्वेच्छाचारी, हट्टी, हेकट.
**प्रतिपक्ष** पु० शत्रु.
**प्रतिबिम्ब** न० प्रतिमा, पडछाया, जशी आरशांतील.

**प्रतिषिद्ध** भू० धा० क० **प्रति+सिध्** धातूचें, मना केलेलें, वर्जित.

**प्रतिहारी** स्त्री० द्वारपालिका.

**प्रत्यग्र** वि० अथवा क्रि० वि० नवीन, ताजें.

**प्रत्यच्** वि० पश्चिमेकडील.

**प्रत्यहम्** अ० ( **प्रति** प्रत्येक, **अहन्** न० दिवस ) प्रतिदिवशीं.

**प्रत्युज्जीवन** न० पुनः जिवंत करणें.

**प्रत्युत्पन्नमति** वि० ( **प्रत्युत्पन्न** भू० का० धा० **प्रति+उद्+पद्** ह्या धातूचें ) समयस्फूर्ति ज्यास आहे असा, तीक्ष्ण बुद्धीचा.

**प्रत्यूष** पु० सकाळ, पहांट.

**प्रदीप्त** ( भू० धा० **प्र+दीप्** प्रकाशणें ह्या धातूचें ) चांगला प्रकाशणारा.

**प्रदेश** पु० प्रान्त.

**प्रद्युम्न** पु० मदन.

**प्रधी** वि० कुशाग्रबुद्धि.

**प्रपन्न** वि० ( भू० धा० **प्र+पद्** धातूचें ) शरण आलेला.

**प्रभवितृ** पु० प्रभु.

**प्रभात** वि० ( भू० धा० **प्र+भा** धातूचें ) नाहींसा झाला (अंधकार) व दिसूं लागला ( उजेड ); न० प्रातःकाल.

**प्रभाव** पु० पराक्रम, मोठेपणा.

**प्रमति** पु० एका पुरुषाचें नांव.

**प्रमद्वरा** स्त्री० एका स्त्रीचें नांव.

**प्रमाद** पु० चुकी.

**प्रयाण** न० गमन, निघणें.

**प्रयुक्त** भू० धा० क० **प्र+युज्** धातूचें, योजिलेला.

**प्रवासिन्** पु० प्रवास करणारा.

**प्रवृत्त्युपलब्धि** स्त्री० ( **प्रवृत्ति** स्त्री० बातमी, **उपलब्धि** मिळविणें ) बातमी मिळविणें.

**प्रव्रजित** भू० धा० **प्र+व्रज्** धातूचें, निघून गेलेला, संन्यासी झालेला.

**प्रसन्न** भू० धा० **प्र+सद्** धातूचें, संतुष्ट.

**प्रसव** पु० उत्पन्न केलेला पदार्थ,उत्पन्न.

**प्रागल्भ्य** न० धीटपणा.

**प्राच्** वि० पूर्वेकडील.

**प्राण** वि० ( बहुवचनान्त ) प्राण.

**प्राणाघात** पु० प्राणाचा नाश.

**प्रादुस्** क्रि० वि० अ० ( क्रियापदाशीं जोडतात ) उघड, प्रगट.

**प्रान्त** पु० किनारा, कांठ.

**प्रापितवत्** भू० धा० कर्तरि प्रयोजक **प्र+आप्** धातूचें, मिळवून देता झाला.

**प्राप्तकाल** वि० ( **प्राप्त** भू० धा० **प्र+आप्** धातूचें, मिळविलेलें, **काल** पु० वेळ ) ज्याचा काल प्राप्त झाला आहे असें, ज्या प्रसंगीं जें योग्य तें.

**प्रायस्** अ० बहुतकरून.

**प्रार्थना** स्त्री० मागणें.

**प्रियदर्शन** वि० ज्याकडे पाहिलें असतां संतोष होतो असा.

**प्रियशर्मन्** पु० एका ब्राह्मणाचें नांव.

**प्रियसंवास** पु० ( **संवास** पु० एकत्र राहणें ) एकमेकांवर प्रीति करणाऱ्या मनुष्यांचें एकत्र राहणें,

**प्री** न० ग० उ० प० प्रीति करणें, संतुष्ट करणें.

**प्रीत** भू० धा० क० **प्री** धातूचें, संतुष्ट.

**प्लवंगम** पु० माकड.

**प्लुष्** प्र० ग० व न० ग० प० प० जाळणें.

**प्सा** द्वि० ग० प० प० खाणें.

**फ.**

**फण्** प्र० ग० प० प० जाणें.

**फल्** प्र० ग० प० प० फळ येणें, सफळ होणें.

**फलग्रहि** वि० फल घेणारा अ० एखाद्या कृत्यानें ज्याला नफा झाला असा.

**फलमूलादि** वि० फळें, मुळें वगैरे.

**फूत्कार** पु० स्फुंदणें.

**ब.**

**बटु** पु० मुलगा.

**बत** अ० आश्चर्यार्थी, दुःखार्थी इ०.

**बन्ध्** न० ग० प० प० बांधणें.

**बन्धन** न० कैद, प्रतिबन्ध.

**बल** न० सैन्य.

**बहिरुपाधि** पु० ( **उपाधि** पु० कारण, गुण ) बाहेरचें कारण.

**बहिस्** अ० बाहेरचें, बाहेर.

**बहु** क्रि० वि० फार, विपुल.

**बहुविध** वि० नानाप्रकारचें.

**बाणजाल** न० ( **जाल** न० समूह ) बाणसमूह.

**बाणपथ** पु० ( **पथिन्** पु० मार्ग ) बाणाचा मार्ग.

**बाणवृष्टि** स्त्री० ( **वृष्टि** स्त्री० वर्षाव ) बाणांचा वर्षाव.

**बालातप** पु० सकाळची सूर्यप्रभा.

**बालिका** स्त्री० मुलगी.

**बाष्प** पु० न० अश्रु.

**बाहुक** पु० सारथ्याचा वेष घेतलेल्या नळाचें नांव.

**बिभीषण** पु० रावणाच्या एका भावाचें नांव. हा रामसाह्य करणारा होता.

**बुद्धिलक्षण** न० ( **बुद्धि** स्त्री० मति, **लक्षण** न० खूण ) बुद्धीची खूण.

**बुभुक्षित** वि० भुकेला.

**बृहद्रथ** पु० मगधदेशाचा राजा, जरासन्धाचा बाप.

**बोध** पु० जागें करणें.

**ब्रह्मन्** न० ब्रह्म; पु० यज्ञांतील एक ऋत्विज. ह्याचें काम यज्ञाची देखरेख करण्याचें आहे.

**ब्रह्मवर्चसिन्** वि० वेदांनीं प्रकाशमान, वैदिक कर्मांच्या योगानें ज्यास तेज प्राप्त झालें आहे असा.

**ब्रह्मादि** पु० ( **ब्रह्मन्** पु०, **आदि** प्रथम ) ब्रह्मदेव आदिकरून.

**ब्राह्म** पु० आठ विवाहप्रकारांपैकीं एक. हा प्रकार ब्राह्मणांत चालू आहे.

**ब्रू** द्वि० ग० उ० प० बोलणें.

**भ.**

**भक्तिमार्ग** पु० ( **भक्ति** स्त्री० प्रीति, निष्ठा, **मार्ग** पु० रस्ता ) मोक्षसाधक ईश्वरभजनाचा मार्ग,

**भग** पु० एका देवतेचें नांव; दैव, भरभराट.

**भग्न** भू० धा० क० **भञ्ज्** धातूचें, मोडलेलें, पळून गेलेला ( रणभूमीपासून ).

**भज्** प्र० ग० उ० प० घेणें, आश्रय करणें; **वि+भज्** विभागणें; **सम्+वि+भज्** वांटेकरी करणें, देणें.

**भञ्ज्** स० ग० प० प० नाश करणें, मोडणें.

**भट** पु० योद्धा.

**भण्** प्र० ग० प० प० बोलणें.

**भयाक्रान्त** वि० ( **आक्रान्त** भू० धा० क० **आ+क्रम्** धातूचें, व्यापलेलें ) भयानें व्याप्त.

**भव** पु० संसार.

**भवन** न० घर.

**भवितव्यता** स्त्री० दैव.

**भा** द्वि० ग० प० प० दिसणें, भासणें, प्रकाशणें.

**भाग** पु० वांटा, हिस्सा.

**भागधेय** न० नशीब.

**भाग्ययोग** पु० ( **भाग्य** न० दैव, सुदैव, **योग** पु० संबंध ) सुदैवाचा योग.

**भाज्** द० ग० उप० **सम्+वि,** वांटेकरी करणें, देणें.

**भानु** पु० सूर्य.

**भानुमती** स्त्री० धृतराष्ट्राचा वडील मुलगा जो दुर्योधन त्याची बायको.

**भार्गव** पु० एका ऋषीचें नांव.

**भाव** पु० पदार्थ, वस्तु.

**भाष्** प्र० ग० आ० प० उप० **प्रति,** उत्तर देणें.

**भाष्यकृत्** पु० भाष्य करणारा अ० एखादा विषय स्पष्ट करणारें संभाषण लिहिणारा, टीकाकार.

**भास्कर** पु० सूर्य.

**भित्ति** स्त्री० भिंत.

**भिद्** स० ग० उ० प० चिरणें, विदारण करणें.

**भिन्न** वि० निराळें.

**भी** तृ० ग० प० प० भिणें.

**भीषण** वि० भयंकर.

**भुक्ति** स्त्री० ताबा, भोगवटा.

**भुज्** स० ग० प० प० उपभोग करणें; आ० प० जेवणें, खाणें.

**भुजंगम-भुजग** पु० नाग, साप.

**भू** स्त्री० पृथ्वी.

**भू** उप० **अभि,** पराभव करणें; **परि+भू** धिक्कारणें.

**भूतसमागम** पु० प्राण्यांचा समागम.

**भूरि** वि० पुष्कळ.

**भूष्णु** वि० होणारा.

**भृ** तृ० ग० उ० प० धारण करणें, पोषण करणें.

**भृश** वि० पुष्कळ.

**भेक** पु० बेडूक.

**भोगकरी** स्त्री० सुख देणारी.

**भोगतृष्णा** स्त्री० ( **भोग** पु० उपभोग, **तृष्णा** स्त्री० इच्छा ) उपभोगाची इच्छा.

**भ्रंश्** प्र० ग० आ० प० व च० ग० प० प० पडणें.

**भ्रम्** प्र० ग० व च० ग० प० प० भटकणें, फिरणें.

**भ्रस्ज्** ष० ग० उ० प० भाजणें.

**भ्राज्** प्र० ग० आ० प० प्रकाशणें.

**भ्राश्** प्र० ग० आ० प० प्रकाशणें.

**भ्रू** स्त्री० भुवई.

**भ्लाश्** प्र० ग० आ० प० प्रकाशणें.

**म.**

**मघवन्** पु० इन्द्राचें नांव.

**मङ्गल** न० शुभ.

**मङ्गलकाल** पु० ( **मङ्गल** न० शुभ आणि **काल** वेळ ) शुभ वेळ.

**मङ्गलप्रदीप** पु० शुभ दीप.

**मञ्जु** वि० मनोहर, मधुर.

**मण्डन** न० भूषण, अलंकार.

**मण्डप** पु० मांडव.

**मण्डल** न० वर्तुळ, मंडळ.

**मत** न० अभिप्राय, उपदेश, मसलत.

**मत्त** वि० भू० का० धा० उन्मत्त.

**मथिन्** पु० घुसळण्याची रवी.

**मदर्थे** क्रि० वि० मजकरितां.

**मद्य** न० मादक रस, दारू.

**मधुपर्क** पु० एखादा पाहुणा आला असतां त्यास मध, दहीं इत्यादि देणें.

**मधुरम्** क्रि० वि० गोड.

**मधुलिह्** पु० भुंगा.

**मध्यम** वि० मध्यम; न० कमर.

**मध्याह्न** पु० ( **मध्य** मधला, **अहन्** न० दिवस ) दिवसाचा मध्य, दोन प्रहर.

**मन्** उप० **अव**, अवमान करणें, दुर्लक्ष्य करणें.

**मनस्विन्** वि० बुद्धिमान.

**मनुज** पु० मनुष्य.

**मनुजन्मन्** पु० ( **मनु** पु० मनुष्यांच्या मूळपुरुषांपैकीं एक ) मनूपासून उत्पन्न झालेला, मनुष्य.

**मनोरथ** पु० इच्छा.

**मन्त्र्** द० ग० आ० प० गुप्त विचार करणें, मसलत करणें.

**मन्त्राक्षर** न० वेदांचें अ० मन्त्रांचें अक्षर.

**मन्थ्** न० ग० प० प० घुसळणें.

**मन्दता** स्त्री० मंदपणा, म्लानता.

**मन्दभाग्यता** स्त्री० ( **मन्द** जड, **भाग्य** नशीब, **मन्दभाग्य** दुर्दैवी ) दुर्दैव.

**मय** पु० एका शिल्प्याचें नांव.

**मयूख** पु० किरण.

**मराली** स्त्री० राजहंसीण.

**मरुत्** पु० देव.

**मरुत्त** पु० एका राजाचें नांव.

**मरुत्सुत** पु० वायुपुत्र, मारुति.

**मर्यादा** स्त्री० सीमा, हद्द.

**मस्ज्** ष० ग० प० प० बुडणें.

**मस्तक** पु० न० डोकें.

**महत्** न० मोठेपणा.

**महत्व** न० मोठेपणा, सामर्थ्य.

**महाज** पु० मोठा मेंढा.

**महाजव** वि० ( **महत्** मोठा, **जव** पु० वेग ) मोठा वेगवान.

**महानुभाव** वि० कुलीन.

**महाभिषेक** पु० (**महत्** वि० मोठा, **अभिषेक** पु० पाणी शिंपडणें, जसें एखाद्या राजास गादीवर बसविते वेळीं ) मोठा राज्याभिषेक.

